# निवेदन

प्रा. माटे सत्कार समितीतर्फे आज प्रा. बापुसाहेब यांचा जो सत्कार होत आहे त्या समयीं हा ग्रंथ वाचकांच्या हातीं देण्यास सत्कार-समितीला फार आनंद होत आहे. समितीच्या विनंतीस मान देऊन ज्या लेखकांनी अल्पकाळात लेख लिहून दिले त्यांची समिति आभारी आहे. ग्रंथाचे प्रकाशक श्री. य. गो. जोशी यांची समिति अतिशयच ऋणी आहे. त्यांच्या साहाय्यावाचून हा ग्रंथ इतक्या त्वरेनें प्रकाशित करणें केव्हांच शक्य झालें नसतें. त्याचप्रमाणें श्री. आबा सरदेशपांडे, आदर्श मुद्रणालय, पुणें, यांनीं व त्या मुद्रणालयांतील कामगारांनीं ठरलेल्या थोड्या मुदतींत इतर कामें बाजूला सारून हें पुस्तक पुरें करून दिलें याचेंहि समितीवर फार उपकार झाले आहेत. अखिल महाराष्ट्रभर प्रा बापूसाहेब यांचे जे शिष्य व चहाते आहेत त्यांच्या मनांतील भावना या ग्रंथातून व्यक्त होत आहेत असे आम्हीं समजतो.

२२-२-४७

**सी. बी. अग्रवाल,**
अध्यक्ष-माटे सत्कार समिति.

# अनुक्रमणिका

# आमचे मित्र : प्रा. बापूसाहेब माटे : १

प्रा. म म. द वा. पोतदार

आपल्या एखाद्या मित्राला ६० वें वर्ष लागलें तर मित्र म्हणून वाटणारा आनंद किती तरी मोठा आहे. त्याची कल्पना खरा मित्रभाव ज्यांच्या मनात असेल त्यानाच येईल परंतु असा आपला मित्र आपल्या सार्वजनिक सेवेमध्यें, विद्वत्तेमुळें व अन्य काहीं विशेष गुणामुळें समाजात मान्यतेला चढलेला असेल तर त्या आनंदात ज्या एका अभिमानाच्या सुगंधाची भर पडते त्याचा अनुभव विशेष सुखप्रद असतो.

आमचे मित्र बापूसाहेब माटे यांची ओळख झाल्याला सुमारें ३५ वर्षे तरी होऊन गेलीं आहेत, म्हणजे आमच्या आयुष्यापैकीं सुमारें निम्मा भाग आम्ही उभयतांनीं एकत्र आणि एकाच गावात एकमेकांच्या समोरासमोर काढलेला आहे. एकमेकांचीं चरित्रं आणि एकमेकांचें साहचर्य ३०-३५ वर्षांच्या दीर्घ कालात लाभल्यामुळें आम्हाला वाटणारा आनंद किती मोठा आहे याची कल्पना अनुभवानेंच येईल

आम्ही उभयतांनीं शिक्षणाच्या व्यवसायात बहुतेक सारें आयुष्य काढलें आणि त्यातलीं बरीच वर्षे एकाच जागीं आम्हीं काम केलें आहे. माटे सातारा जिल्ह्यातून पुणें जिल्ह्यात आले आणि प्रस्तुत लेखक यानें आपलें बहुतेक आयुष्य पुणें शहरातच काढलेलें आहे माटे यांच्या शिक्षणात व्यत्यय आला. परंतु प्रस्तुत लेखकाला त्याचा अनुभव आला नाहीं माटे यांची पहिली शैक्षणिक कामगिरी पुण्यातील प्रसिद्ध न्यू इंग्लिश स्कूल या संस्थेत झाली आणि प्रस्तुत लेखकाची शिक्षण आणि शिक्षणविषयक कामगिरी पुणे येथील नूतन मराठी विद्यालय या प्रसिद्ध संस्थेत झाली परंतु काहीं विलक्षण योगायोगानें माटे यांना आपल्या कामगिरीचें क्षेत्र बदलावें लागलें आणि न्यू इंग्लिश स्कूल सोडून माटे नू म. विद्यालयात शिक्षक म्हणून दाखल झाले.

नू. म. विद्यालय या संस्थेच्या चालक मंडळात प्रस्तुत लेखक होता आणि माटे यांच्यासारखा वकुबाचा शिक्षक आपल्या संस्थेला येऊन मिळावयाचा प्रसंग आला तेव्हा त्यानें त्याचें मनापासून स्वागत केलें. यांच्या आर्धी या मंच्या संस्थेत चालक मंडळींत शिरावें की न शिरावें असा प्रश्न माटे यांच्यापुढें उभा राहिला. माटे यांच्या मनाची ओढ आपल्या दलित देशबांधवांच्या उन्नतीकडे या काळींच लागलेली होती. त्यासाठी लागणारें स्वातंत्र्य आणि मोकळीक चालक मंडळाचें बंधन पत्करल्यास लाभण्याचा फारच कमी संभव होता. समाजसेवेचें तें एक मोठें कठीण क्षेत्र व्यापण्याचा माटे यांच्या मनात विचार उचंबळत होता आणि तिकडे त्याचीं पावलें जोरानें वळत होतीं, त्या दृष्टीनें त्यानीं चालक मंडळाचीं बंधनें स्वीकारणें इष्ट झालें नसतें असें वाटून प्रस्तुत लेखकानें त्यास त्यावेळीं तसा सल्ला दिला होता.

माटे यांच्या आयुष्यात योगायोगच पुष्कळ. आज माटे मराठीचे आचार्य आणि मराठी भाषेतील एक श्रेष्ठ लेखक म्हणून समाजापुढे गाजत आहेत. परंतु पूर्वायुष्यात माटे यांच्या वाट्याला इंग्रजी हा विषय कायमचाच ठेवलेला असे. कारण पट्टीच्या इंग्रजी शिक्षकात त्यांची गणना केली जात असे. आमचे संस्थेत येताच माटे यांनीं छाप आणि प्रभाव असा दाट टाकला कीं, सातवी इयत्तेच्या वर्गाची एक-बहुधा ब-तुकडी ही माटे यांच्या मिराशीची तुकडी ठरून गेली आणि इंग्रजी हा त्याचा हातखंडा विषय ठरून गेला. शाळेंत चालू असलेल्या विषय-शिक्षण-पद्धतीमुळें इंग्रजी विषय वाट्यास येऊन माटे मास्तर म्हणजे इंग्रजीचे उत्कृष्ट शिक्षक अशी प्रसिद्धी पावले. संस्थेत येताच जो लौकिक त्यांनीं मिळविला तो कधींहि स्वप्नांतसुद्धा कमी होऊं दिला नाहीं. त्यांच्या तुकडीची एक पोलादी संघटनाच आपोआप बनून जावी असा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा प्रभाव या लहानशा क्षेत्रातहि त्यांनीं पाडला आणि आमच्या शाळेंत इंग्रजी शिक्षणाची एक निर्भेद्य फळी त्यांनीं निर्माण केली. माटे यांच्या अंगावर वर्ग टाकून निर्धास्त बसण्याला शाळेच्या चालकास कधींच संकोच वाटला नाहीं.

मुलांचीं मनें सा काळ आकर्षण करून घेण्याची विलक्षण हातोटी माटे यांच्या अंगीं आहे. तरुण मनें त्यास सहज जाऊन बिलगतात. माटे हे उपजत वयस्वी शिक्षक आहेत. शाळेंत शिक्षकाचें काम करून राहिलेला रार

वेळ त्यांनी निवडलेल्या अस्पृश्य शिक्षणाच्या नवीन कार्यात ते घालवीत. दिवसा शाळा आणि मध्यरात्रीपर्यंत अस्पृश्य मंडळीच्या वस्तीत जाऊन त्यांना शिक्षण देणें त्यांचें चित्त हरण करणें, आणि त्यांना माणुसकीत आणणें या उद्योगात मटे गर्क असत. या नवीन कार्यासाठीं लागणारा पैसा होता होईतों आपल्या हातचा असावा म्हणून त्यांनीं आपल्या अंगच्या शिक्षकी गुणाच्या क्षेत्राचा थोडा विस्तार करून खाजगी वर्गाहि चालविले. मटे यांच्या या खाजगी वर्गात विद्यार्थ्यांची मोठी झुंबड लागलेली दिसे आणि त्यामुळें अनेक दुर्बल शिक्षक त्याजबद्दल असूया धरीत.

मटे यांनी नवीन निवडलेलें अस्पृश्यांना सुधारण्याचें कार्य त्या काळीं आजची प्रतिष्ठा पावलें नव्हतें. गोपाळराव देवधर यांना त्या वेळचे कित्येक पांढरपेशे देशभक्त उपड भंगी म्हणत आणि मटे यांनाहि मनातून का होईना कोणी महार म्हटलेंच नसेल असें वाटत नाहीं. अस्पृश्य लोकांत सुधारणेची आवड उत्पन्न करावयाची हेंहि कठीण आणि स्पृश्य लोकांकडून सहानुभूति मिळवावी तर तेंहि अवघड. अशा दुहेरी कामींतूनहि मटे यांनीं आपलें कार्य चिकाटीनें, सधपणानें, आणि कांहींहि गाजावाजा न करता अनेक वर्षे चालविलें.

मटे यांचा निडच समाजसेवेचा आहे. त्याच्या मनाची तळमळ फार जोरदार आहे. परंतु स्वाभिमानाचा तिखटपणा हाहि त्यांच्या ठिकाणीं तितकाच जोरदार आहे. हे गुण निरनिराळे सुटे सुटे पाहिले असता प्रशसनीय आहेत. परंतु त्यांचा योग्य वेळीं कोणत्या कार्यांत कसा उपयोग करावा याचें तंत्र ज्याला जितक्या प्रमाणात साध्य होतें तितकें त्याच्या यशाचें माप भरतें. मटे यांना आपल्या अंगच्या विविध गुणाचें पुरें माप पदरीं पाडून घेण्याचें भरघोस यश लाभलें आहे असें म्हणता आलें असतें तर आज त्यांच्या ६० व्या वर्षांच्या वेळीं माझ्यासारख्या त्यांच्या मित्राला अतिशय आनंद वाटला असता.

आपल्या एकट्याच्या हिंमतीवर आपल्याला लागणारी अवश्य संघटना उभी करून मटे यांनी कित्येक मोठालीं कामें पार पाडलेलीं आहेत. या कामीं त्यांच्या बरोबर काम करण्याचा ज्यांना योग आला आहे त्यांना मटे यांचे गुणदोष चांगल्या प्रकारें जोखता आले आहेत. अशा सर्वांना हें कबूल

करावें लागेल की, माटे यांच्या जवळ व्यक्तिमत्वाचा एक विशेष ठसा आहे. बुद्धिमान तरुणांना लळा लावण्याचें एक विशेष सामर्थ्य आणि कामाचा व्याप आणि खेप पद्धतदार ठेवण्याची हिंमत त्यांच्या ठिकाणीं आहे. त्याचें मानसिक बळ पाहतांच कणखर आहे. असे असूनहि त्यांना अंगच्या ताकदीच्या प्रमाणांत आपले मनोरथ संपूर्णतया तडीला नेतां आले नसावेत असा आमचा तर्क आहे.

केसरीप्रबोध, महाराष्ट्र सांवत्सरिक आणि विज्ञानबोध असे मोठमोठाले ग्रंथ आणि त्यांच्यासाठीं कराव्या लागणाऱ्या व्यापक मांडणीची खटाटोपाचे आणि यातायातीची हिंमत माटे यांनीं प्रकट करून आपल्या अंगच्या सामर्थ्याचा प्रत्यय समाजास आणून दिलेला आहे. हिंदुत्वकोश या नांवाचा त्यांचा एक विस्तृत ज्ञानकोश त्यांचेजवळ तयार आहे. आपला प्रपंच संभाळून, आपली शिक्षकाची नोकरी उज्वल तऱ्हेनें पार पाडून, आणि वर सांगितलेले मोठाले ग्रंथ आणि त्यांच्या योजना सिद्धीला नेऊनहि माटे यांनीं उपेक्षितांचें अंतरंग, परशुरामचरित्र, पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ, आणि अलीकडे लिहिलेली 'अनामिका' असा सारखे ग्रंथ त्यांनीं लिहून प्रसिद्ध केले. हे ग्रंथ आणि त्यांनीं केलेलीं शेकडों भाषणेंहि पाहिलीं असतां लेखणी आणि वाणी या उभयतांनाहि माटे यांनीं किती यशस्वी रीतीनें राबविलें आहे याचें प्रत्यंतर पहावयास सांपडेल.

माटे यांच्या वाणींत एक प्रकारची रसवती आहे. श्रोत्यांचीं चित्तें आपल्याकडे ओढून घेण्याची मोहिनी त्यांचेजवळ आहे, माहिती आणि विचार यांचा भरपूर साठा त्यांच्या संग्रहीं आहे; वाणी आणि लेखणी यांच्या द्वारें आपल्या समाजाला समृद्ध करण्यासारखें इतकें त्यांचें वैपुल्य त्यांच्याजवळ आहे. समाजाला गोंजारण्याची कला जशी त्यांना अवगत आहे, त्याप्रमाणेंच त्याला रागडसावून कचरावण्याचें सामर्थ्यहि त्यांची वाणी प्रगट करते; परंतु त्यांचा स्वाभिमान जेव्हां फडा काढून उभा राहतो तेव्हां तो कोणच्या परिणामाला जाईल, किंवा कोणाला चपराक देण्यासाठीं तो त्यांना पुढें नेईल हें हमखास सांगता येत नाहीं.

एक मोठ्या हिमायतीचा समाजसेवक म्हणून माटे यांचें वर्णन केलें तर तें यथार्थच ठरेल. उत्कृष्ट बुद्धिमत्ता, पतिताविषयींची अनुकंपा, जागृत परंतु उग्र स्वाभिमान, चिकाटी आणि आत्मविश्वास, आकर्षक वाणी आणि धारदार

लेखणी, मनाची आणि प्रकृतीची हौस आणि तळमळीची श्रमसहिष्णुता इत्यादि विविध गुणांचा माझे यांच्या ठिकाणीं समुच्चयानें उत्कर्ष झालेला आहे. सातारा जिल्ह्यांतील कृष्णा वाळवें सतेज पाणी त्यांच्या वाणीनें आणि लेखणीनें भरपूर प्राशन केलें आहे. त्यांच्या मूळच्या निरोगी प्रकृतीत नेत्ररोगानें जरी मधून मधून उपद्रव निर्माण केला तरी त्यांची कार्यशक्ति आणि बुद्धिशक्ति या अद्यापहि मजबूत आणि तरतरीत आहेत; त्यांच्या मनाचा व्यास दांडगा आहे, आणि म्हणूनच गणितानं त्यांच्या वयाला ६० वर्षे झाली असलीं तरी उत्साहाच्या आणि कर्तृत्वाच्या दृष्टीनें त्यांना वृद्धपण सूचित आलेलें नाहीं. त्यांच्या गुणाचें तारुण्य असेंच पुढेंहि टिकावें आणि आमच्या समाजाला त्यांची रसदार फळें भरगच्च लुटावयास सांपडावींत अशी त्यांच्या मित्रपरिवाराची इच्छा आहे.



# माझें जीवितविषयक तत्त्वज्ञान : : २

प्रा. श्री. म. माटे, एम्. ए.

माझे एक प्रकाशक मित्र यांनीं या विषयावर मला लिहावयास सांगितलें. तें काम पत्करताना मला बरें वाटलें, पण तें प्रत्यक्ष करताना मला थोडा धाकच वाटत आहे. माझ्या स्वतःच्या जीवनक्रमात काहीं तत्त्वज्ञान आहे का याचा शोध मी मनानें घेऊं लागलों तेव्हा आपण खरोखर किती कंगाल आहों याची जाणीव मला जास्तच होऊं लागली. जीविताला काहीं तत्त्वज्ञान असणें ही काय सामान्य गोष्ट आहे काय ? मोठमोठ्या धुरंधरांच्या पदराला

धरून त्यांना अडवून विचारलें की, 'तुमचें जीवितविषयक तत्त्वज्ञान सांगा' तर तेही भांबावल्यासारखे करतील. तें तत्त्वज्ञान असूनहि त्यांचे ओळख त्यांना झालेली नसेल किंवा झाली असली तर तें कसें सांगावें हें त्यांना माहीत नसेल. फार काय सांगावें ? तत्त्वज्ञान असावें लागतें याची ओळख-सुद्धां मोठमोठ्या शिकंदर माणसांना असेलच असें म्हणता येत नाही. उपःजत बुद्धीनें आणि प्रवृत्तीच्या आवेगासरशी ते अनेक गोष्टी करीत जातात. मग निरीक्षक लोक त्या त्यांच्या कृत्यात कांहीं संगति आहे का पहातात. कदाचित् एकादा तत्त्वज्ञानाचा स्वयंभू तंतू त्याच्या हाताला लागतो. आपल्या-पैकीं बहुतेक सर्व लोक असे असतात कीं, ज्याच्या जीविताला कसलीहि योजना नसते. त्यांचा जीवितक्रम होत गेलेला असतो इतकेंच. योजना, बेत, आखणी, ध्येय हे प्रकार त्यांना ठाऊकच नसतात. रोजंदारीनें काम करणारा मजूर जसा उद्यांच्यापुढें पहात नाहीं--कारण तें त्याला दिसण्यासारखेंच नसतें; तसा हा प्रापंचिक फक्त उद्याचें तेवढें पहातो. याचें हातावर पोट असतें. कांहीं लोक असे असतात कीं जे जीविताकडे डोळसपणानें पहातात; कांहीं योजना, हेतु, किंवा ध्येय जीविताच्या आरंभरयानीं कायम करतात; पण याची गति याच्यापुढें जात नाहीं. योजना पार पाडावयास, हेतु सिद्धीस न्यावयास आणि ध्येय गांठावयास अनुकूल प्रयत्न असावे लागतात, परिस्थितीचीहि अनुकूलता असावी लागते; व ज्याला नशीब नशीब म्हणून म्हणतात तें सन्मुख असावें लागतें. पण याचे प्रयत्नच जर होत नाहींत तर बाकीची अनुकूलता असूनहि त्याची योजना मनातच राहील. त्याचा बेत जेथल्या तेथें जिरेल आणि त्याचें ध्येय स्वप्नरूप ठरेल.

कांहीं थोडे असे असतात, कीं ज्यानीं आपल्या जीविताचा नकाशा आख-लेला असतो व त्या नकाशाला अनुसरून त्यांचे प्रयत्न होतात. परंतु त्यांना परिस्थिति अनुकूल नसते व नशीबहि पाठमोरेंच उभें रहातें. याहून थोडे असे कीं, ज्यांना पहिलीं तीन असतात, पण ज्यांचें नशीब पंगू असतें. क्वचित् एखादा माणूस असा असतो, कीं जो जीविताचा नकाशा आरंभींच आंखतो, त्याला अनुसरून प्रयत्न करतो, त्याला परिस्थिति अनुकूल असते व नशिबाचा वारा त्याला अनुकूल वहातो. असा माणूस अत्यंत यशस्वी होतो. बाकीच्या ध्येयवादी लोकांच्या दारात अपयशाचा उकिरडा केवढा तरी सांठलेला असतो.

माझ्या स्वत ऱ्या जीवितावी मी पहाणी केली म्हणजे माझी गणना मला दुसऱ्या प्रकारच्या लोकात करावी लागते जीविताच्या आरंभी मी काही योजना अ राखलेली होती व तिला अनुसरून मी म्हणाहि केलेले आहेत, पण परिस्थिति व नशीब दो ही मला सर्वथा प्रतिकूल असत आली आहेत व म्हणून मला जावेतात यश मिळालेले नाही असेहि झालेले असणे शक्य नाही की, पुरेसा पाँच अंगी नसल्यामुळे परिस्थिति ही मला अनुकूल बनवून घेता आली नसेल पण नशीब मात्र मला सारखे प्रतिकूलच राहिलेले आहे. परिस्थिति व नशीब ही कोणी कोणी एक करतात मला तसं वाटत नाही

मी इग्रजी सातव्या इयत्तेत असताना, तेव्हाच्या देशाभिमानाच्या कल्पने प्रमाणे, सरकारी नोकरी करावयाची नाही अशी शपथ मी घेतली होती व ती मी आजपर्यंत नेकीने पाळली आहे तसेच स्वदेशी साखर खाईन, परदेशी खाणार नाही अशीही शपथ मी तेव्हा घेतलेली होती आजारीपणा व प्रवास ही कचित्प्रसगी सोडून ही शपथ मी चागली पाळली आहे परदेशी कापड वापरणार नाही ही माझी तेव्हाची तिसरी शपथ होती व तीहि मी कसोशीने पाळला आहे सरकारी नोकरी करावयाची नाही असे मी ठरविले तेव्हा मला ती मिळण्याचा चागला सभव होता माझ्याबरोबर बी ए झालेले लोक सरकारी नोकरीत शिरून आज सेवानिवृत्त झालेले मी पहातो सरकारी नोकरीचा योग मला पुढे तीन वेळा आला व तीनदा वेळा मी तो गुपीत घालविला कारण माझी शपथच होता की, सरकारी नोकरी करणार नाही ! मी एम् ए झाल्य वर मला पोलिसखात्यात ऐशी रुपयावर घेण्यास ते राजी तयार होते माझ्या ध्यानीमनी नसता माझ्या एका शिक्षक मित्राच्या द्वारा मला हे आमत्रण आले होते ! मी ते नाकारले पुढे हैदराबाद येथे उस्मानिया युनिव्हर्सिटी प्रस्थापित झाली तेव्हा 'तू अर्ज कर' म्हणून कै वासुदेवराव पटवर्धन यानी मला घरी बोलावून नऊन आग्रह केला त्याना मी मानीत असे त्यांच्या भिडस्तव मी अर्ज टाकला पण त्या बाबतीत मी कसलीही खटपट केली नाही, की पुनर्विचारणाही केली नाही कारण मला ती नोकरी नकोच होती पुढे डेक्कन कॉलेजमध्ये व एल्फिन्स्टनमध्ये मराठी प्रोफेसराच्या दोन जागा झाल्या, तेव्हा त्यातील एक जागा मला मिळवून देण्याचा प्रि पटवर्धन याचा हेतु व आग्रह होता माझ्या घरी त्यानी

मला बोलावणें पाठविलें होतें, पण मी ती जागा पत्करण्याचें अमान्य केलें. एकदा आपण केलेली प्रतिज्ञा आता शेवटास गेलेली पाहून मला मनापासून समाधान वाटतें. साखरेच्या शपथेस आता कांहीं गोडी राहिलेली नाहीं। कारण विलायती साखरच कोठें मिळेनाशी झालेली आहे. कापडाचेंहि तसेंच आहे. स्वदेशी कापड इतकें चांगलें मिळतें कीं विलायतीकडे कोणी ढुंकावयाचेंसुद्धा नाहीं पण जेव्हां स्वदेशी साखर महाग व ओंगळ असे व स्वदेशी कापड महाग व जाडेभरडें असें तेव्हांही आपण स्वदेशीचाच हट्ट धरला याचें समाधान मला आता वाटतें. कै. लोकमान्य टिळकांच्या तेव्हांच्या प्रतिपादनात या गोष्टींना फार महत्त्व असे. आपल्या तरुणपणातील पुढाऱ्याचें आपण हें शेवटपर्यंत ऐकलें याचा आनंद वाटतो.

दुसऱ्याच ऐकून ज्या गोष्टी ढोबळ तत्त्वज्ञानाच्या रूपानें माझ्या जीवितात कायम झाल्या त्यात सरकारी नोकरी करावयाची नाहीं ही एक कायमच्या महत्त्वाची होती. पण सरकारी नोकरीच्या जोडीला मी आणखी एक बाब आणून ठेवली व ती मी ए -च्या वर्गात असतानाच मी निकालात काढली. वकिलीचा धंदा करावयाचा नाहीं, हेंही माझें ठरलेलें होतें, याचें मुख्य कारण तरी हेंच झालें कीं माझे वडील बंधु सातारास प्रॉसिक्यूटर असताना त्यांच्या तोंडून त्या धंद्यातील नैतिक कमीपणाविषयीं मी पुष्कळ वर्णनें ऐकलीं होतीं व माझें मन त्या धंद्याविषयीं अगदीं कलुषित झालें होतें. पण याहीपेक्षा जास्त महत्त्वाचा असा एक निश्चय मी आपल्या मनाशीं केला होता. पुण्यातच रहावयाचें. हें शहर सोडून बाहेर जावयाचें नाहीं कारण पुणें म्हणजे सर्व चळवळींचें माहेरघर, तेव्हां आपणाला जर कांहीं करावयाचें असलें तर त्याला पुण्यात राहणें अवश्य आहे असें माझ्या मनानें घेतलें होतें त्या माझ्या निश्चयापासूनही मी कधीं ढळलों नाहीं. शिक्षकाचा धंदाच मी करीत राहिल्यानें माझी सांपत्तिक स्थिति बेताचीच राहिलेली पाहून माझ्या वडील भावाला वाईट वाटे व तो म्हणे कीं, 'मी तुला चांगला वकील हो म्हणून सांगत होतों, तें तू ऐकलें नाहींस !' पण त्याच्या या टपक्याच मला कधींही रास्त वाटलेलें नाहीं. पुण्यातून हलण्याविषयीं असाच एक प्रकार झाला. दे. ए. सो. च्या न्यू इ. स्कूलमध्यें मी कायम व्हावें म्हणून अर्ज केला, पण मी कायम झालों तरतों कीं माझी बदली बाहेरच्या शाळेत होणार नाहीं म्हणून मी न्यू.

इ. स्कूलमधील नोकरी सोडली व न्यू. म. वि. त आलों. ठरलेल्यातून मी चळलों नाही याचें मला असें वाटतें. म्हणजे इतक्या गोष्टी झाल्या सरकारी नोकरी करावयाची नाहीं, वकिली करावयाची नाहीं, स्वदेशीची व्रत पाळा वयाची, पुण्यातून हलावयाचें नाहीं. यातील दोन म्हणजे वकिली न करणें व पुण्यातच राहणें हीं मीं माझ्या बुद्धीनें ठरविलेलीं होतीं सातान्यास देवधर मास्तराच्याकडे पाहून आपण डे. ए. सो. त जावें असें प्रथम प्रथम वाटे, पण पुढें कॉलेजात रेंगाळत चाललेला माझा अभ्यासक्रम व पुण्यातील सार्वजनिक जीविताचा अर्थ याची बेरीज होऊन ती कल्पना मीं अगदी निश्चितपणे टाकली.

एम्. ए. झाल्यावर, आधींपासूनच्या माझ्या शिक्षकाच्या पेशाला मी धरून राहिलों पण माझें मन स्वस्थ नव्हतें १९१६ सालीं मीं श्री. न. चिं. केळकर यास विचारलेलें आठवतें कीं, मला आपण केसरींत घेता काय? मला लिहिण्याची सवय व बोलण्याची सवय फार दिवसांची होती व आपण राजकारणांत पडावें असें मला वाटे. परंतु केळकर यांनी नकार दिल्यानंतर मी काहीं महिने घुटमळतच होतों न्यू इ. स्कूलमध्ये प्रो. नाईक यांच्या संगतींत व्यायाम, म्युनिसिपल स्वच्छता, असलीं काहीं काहीं कामें मीं केलीं, पण त्यांनीं माझें समाधान होईना पुढें हरीभाऊ फाटक व इर्डीकर यांच्या संगतींत कन्झ्यूमर्स असोसिएशन काढून त्यांतील नफा मुलांना व्यापारी शिक्षण देण्याच्या कामीं खर्च करावा यासाठीं ती असोसिएशन काढण्यासाठीं मी पुष्कळ काम केलें, पण तें अगदीं फसलें दरम्यान माझें मन कै. देवधर यांच्या शिक्षणानें, तुकारामबोवांच्या वाचनानें, माझ्या घरच्या मूळच्या गरीबीनें व भावांनीं व आईनें सोसलेल्या दैन्याच्या जाणिवेनें अस्पृश्यांच्या प्रश्नाकडे वळलें या प्रश्नाच्या चिंतनानें माझ्या जीविताला कायमचें वळण लागलें, तें आपल्या मनानें तत्त्वज्ञान ठरवून आपण तसें वागत आलों आहों याचें पुरेसें समाधान मला लाभलें आहे.

डिप्रेस्ड क्लासच्या चळवळींत तुम्हीं कोणाच्या उपदेशानें पडलां असें कोणी कोणी विचारतात त्याचें उत्तर वर थोडेंसें आलेंच आहे तें आता पुरें करतों टिळक मंडालेहून परत आल्यानंतर विशेषतः १९१६ सालापासून राजकारणाला तुफान भरती आली पण पुढें टिळक व स्वामी श्रद्धानंद इ०

लोक अस्पृश्यांच्या प्रश्नाविषयी फार कळकळीने व तळमळीने बोलत, व हा प्रश्न सुटला पाहिजे असे म्हणत. मला तें खरें वाटे. पण केवळ दर्जाचे कोणीच पुढारी त्या उद्योगाला लागलेले मी पाहिले नव्हते. कांहीं वरील परिच्छेदात सांगितलेल्या कारणामुळे व या विषयाचें पुढाऱ्यांनी वर्णिलेलें महत्त्व लक्षात घेऊन आपण लहान सारे, पण थोरांच्या वाटा झाडण्याचें तरी काम करावें म्हणून या उद्योगास लागलो. मोठे लोक मोठ्या उद्योगात गुंतलेले व लहान त्यांच्या अनुयायीपणात गुंतलेले असें दिसत असे. आणि लहान तर लहान, पण विषय जर महत्त्वाचा आहे तर आपण त्यात पडावें असें मला उपजत बुद्धीनेंच वाटलें असेंच म्हणावयास हवें. कारण मी कोणाचें म्हणणें पतकरून या कामात पडलों नाहीं. मला खरें तेंच सांगितलें पाहिजे. कोणाला यात थोडी अल्पता वाटली तर काय करावें?

कै. व्ही. आर. शिंदे यांचें एक मिशन मोकरवाडीत होतें. त्याचे मार्ग व मतें काय आहेत हें पहावयास मी मधून मधून त्यांच्याकडे जाई. शिंदे हे मूर्तिमंत करुणाबुद्धि होते. माझ्या मनाचा धर्म तोच आहे. त्यांच्याविषयीं मला आदर उत्पन्न झाला, पण त्यांचें सामाजिक तत्त्वज्ञान व त्यांचे मार्ग मला आवडेनात. कारण शिंदे हे ब्राह्मसमाजी झालेले होते. शेवटपर्यंत त्यांचें व माझें नातें गोडीचें व सलोख्याचें राहिलें. त्यांच्या विचाराचें मर्म मला व माझ्या विचाराचे मर्म त्यांना माहित झालेलें होतें. सर्व सामाजिक सुधारणांत 'अस्पृश्यता-निवारण' हा प्रश्न मीं निराळा काढला व त्याचा स्वतंत्र विचार केला. इतर सुधारणांच्या लक्ष्यात त्याचें नुकसान होतें असें मला वाटू लागलें. तसेंच हिंदुसमाजाच्या पोटात राहूनच, म्हणजे निराळा पंथ न काढता, हें काम केलें पाहिजे असें मला वाटू लागलें व या कामाला साधुसंतांच्या वाङ्मयाचा व इतिहासाचा पाठपुरावा आपल्याला होईल असेंहि माझ्या ध्यानीं आलें. समाजाच्या पोटातच राहून ढवळाढवळ केली म्हणजे जे सामाजिक प्रश्न सुटावयास हवा असतो तो खरोखरच सुटतो, समाज सुधारतो. समाजाच्या निरनिराळ्या थरात एक तऱ्हेची गोड चिकटी माजविता येते. हें धोरण ठरविण्यात मी जरा हुशारीनें वागलों असें मला वाटतें.

हें धोरण एकदा कायम केल्यानंतर दलित (डिप्रेस्ड) लोकांच्यात प्रत्यक्ष मिसळल्याविना आपल्याला त्यांचें काहीं बरें करता यावयाचें नाहीं हें पाहून मी

त्यांच्या शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला. त्याचें शिक्षण म्हणजे प्राथमिक शिक्षणच. या कामासाठीं त्यांच्या आळींत माझी जा–ये सुरू झाली व त्यांच्या जीविताकडे जवळाईनें पहाण्याची संधि मला मिळाली. ही गोष्ट माझ्या मनावर पुरती बिंबली कीं मानवी जीविताचा विकास करून घेण्याची थोडीहि संधि आपण डिप्रेस्ड लोकांना देत नाहीं. ती पूर्णपणें देणें म्हणजे खरें खरें अस्पृश्यतानिवारण होय. सृष्टीनें दिलेल्या मनबुद्धीच्या सामर्थ्यबीजाच्या विकसनास व विकसित झालेल्या सामर्थ्यांच्या वापरास संधि देणें हे आपलें खरें खरें काम आहे. या धोरणाला अनुसरून सतत वीस वर्षें मी हा अस्पृश्यतानिवारणाचा विषय मला सावला तसतसा सोडवण्याची खटपट केली. या कार्मी जीवितविषयक तत्त्वज्ञानाची आणखी एक ओळख मला झाली. आपण जर एकादी चळवळ हातीं घेतली तर तिला लागणारें द्रव्यबळ आपलें आपण उभें करण्याची शिकस्त करावी, इतरांकडे तोंड वेंगाडूं नये हे मला अवश्य वाटू लागलें. आज माझा असा कयास आहे कीं स्वाभिमानबुद्धीमुळेंच मला ही कल्पना सुचली असावी. या कल्पनेस अनुसरून मी या कार्मी माझी शिकस्त केली. मी एम्. ए. झालेला असलों तरी मला पुण्यासारख्या ठिकाणीं केवळ साठ पासष्ट रुपये तेव्हां मिळत असत; पहिल्या महायुद्धात ८० रु. मिळत असतील. हा माझा पगार झाला. माझा आदा जर एवढाच असता तर हें सामाजिक कार्य माझ्यानें रेटलें नसतें. पण सध्याकाळच्या वेळीं मी एक इंग्रजीचा क्लास सुरू केला होता. त्यावर मला बरी कमाई होऊं लागली. जसजसा पैसा मिळूं लागला तसतसा मी या सामाजिक कामाचा व्याप वाढवूं लागलों. एम्. ए. झालों तेव्हां मला लोकांचें सुमारें ८०० रु. देणें होतें. तें फेडून होतांच मी या विषयावर माझी सारी प्राप्ति खर्चूं लागलों. श्री. अण्णासाहेब भोपटकर या ईर्षावान् आणि त्यागी गृहस्थांनें व म्युनि. नें मला मदत केली, हे खरेंच आहे. पण स्वार्थत्याग करावा हें माझें जीवनविषयक तत्त्वज्ञान बनून राहिलें आणि त्याच्या बळावर मोठमोठालीं कामें करता'' आलीं. एकादें काम करावयाचें असलें तर आपण आधीं त्याग करावा व मग लोकांना बोलावें हा माझा देहस्वभाव बनून गेला आहे. आणि तें बरें आहे. त्यामुळें आपण कोणाचे मिंधे रहात नाहीं.

परंतु केवळ पैसा खर्च करणें एवढ्यानें समाजसेवेचें खरें सुख कोणालाहि

प्राप्त होणार नाही आपल्या शरीराच्या व मनबुद्धीच्या सर्व शक्ती हाती घेत घेतलेल्या कामात खर्च करणें हा माझा हव्यासच झाला त्या माझ्या तेव्हांच्या हव्यासानें मला आता बरें वाटतें जीवितांत केव्हा तरी एकदा पुष्कळ वर्षे मला सारख्या कामात राबून जनहितासाठीं तनमनधन आपल्याला खर्च करता आलें याचा मला आता आनंदच नव्हे तर हर्ष वाटतो प्रथचात टुकीनें वेळापरि माझे कांहीं रसिक स्नेही मला मनातून हसत असत, हें मला माहीत आहे सकाळीं उठल्यापासून दहा वाजेपर्यंत मांग, महार, चांभार वगैरे जे कोणी येतील त्यांच्या तक्रारी ऐकणें, त्यांची नोंद करून घेणें, कोणास अर्ज लिहून देणें, त्यांची भांडणें मिटविणें, त्यांच्यातील विद्यार्थ्यांना विशेष प्रकारें परामर्श घेणें अशा कामात माझा सगळा वेळ जाई संध्याकाळीं शाळा सुटली म्हणजे मी माझ्या राजगड क्लासला जाई व रात्रीच्या सुमारास घरीं येई जेवण आटोपून दिवा लावून आमच्या रात्रीच्या शाळेत शिकवि ण्यास किंवा ठिकठिकाणीं सुरू असलेल्या कामावर देखरेख करावयास बाहेर पडे तो रात्रीं ११॥, ११ ला परत येई सुट्टीच्या दिवसात सभा, परिषदा इत्यादींची खटपट करीत असें पैशाचा तुटवडा फारसा कधीं वाटला नाहीं याचा अर्थ इतकाच कीं त्या वेतानेंच मी कामें अंगावर घेई कोणापुढे वर्गणीसाठीं हात पसरणें माझ्या जिवावर येत प्रकृति चांगली दणकट असल्यामुळें मला कधींच दमल्यासारखें वाटत नसे आणि डिप्रेस्ड लोकांचें बरें व्हावें अशा मनाचा हव्यास जबरदस्त माझा जो काय बुद्धीचा पतूप असेल तो मी बुद्धीनें या कामीं खर्च करी तनमनधनाचा उपयोग परोपकारीं खर्च असा सतत खर्च करता आला यामुळें जग थोडा तरी सार्थकीं लागला असें मला वाटतें हेंच जीविताचें तत्त्वज्ञान

इतकेंच की प्रश्नाचें अवघडपण, त्याचा पल्ला व त्याचें प्राचुर्य आणि आपल्या प्रयत्नाचा उणेपणा याचा बोध मला उत्तम झालेला होता. केलें, केलें, म्हटलें तरी त्यानें प्रश्न किती सुटला हा प्रश्न असतो. हा विचार मनात सतत बाळगून आमच्या कामाला प्रसिद्धी देण्याचें मी सतत टाळीत असें. यानें आमचें एक नुकसान झालें हें खरें. आमची जेवढी प्रसिद्धि होणें युक्त होतें तेवढीहि झाली नाहीं. पण प्रश्नाचें विशाल रूप आणि प्रयत्नाचें लघु रूप हीं लक्षात घेता मी केलें तें बरोबर केलें असें मला वाटतें. आपलीच टिमकी वाजविणें वाईट असतें, त्यानें भलतीच जबाबदारी अंगावर येते आणि लोक त्या दृष्टीनें आपल्याकडे पाहू लागतात. हे सारें प्रसिद्धिविन्मुखतेमुळें साधलें असें वाटतें.

या कामात आणखी एक लक्षात घेण्यासारखा प्रकार होता. आम्ही कोणाकडून द्रव्याची याचना करण्याचा परिपाठ ठेवलेला नसल्यामुळे आम्हाला स्वत:च्या मताप्रमाणें स्वच्छंदपणें वागता येत असे. आमच्या मंडळात मत, व्होट, ठराव, उपसूचना हे प्रकार मुळींच नसत. श्री. अण्णासाहेब हे अध्यक्ष व मी चिटणीस येवढीच संस्था होती. जे तरुण लोक आमचें काम पसंत पडून साह्याला येतील ते सभासद असा खाक्या होता. त्यामुळे मतभेदाचें वारें आम्हाला कधींच बाधलें नाहीं. जों जों मदत करणारे जमतात तों तों आपलें मतस्वातंत्र्य कमी होत जातें. मदत करणारे पैसा देतात व वांछा बाळगितात कीं, आपल्या मताचाहि याच्या कारभारात मान रहावा. मला स्वत:ला हें अगदीं आवडत नाहीं. काय करावयाचें हें माझें मी ठरविलेलें होतें व ठरवीत होतों. त्यावर मी कोणाचें मत घेणार नव्हतों व अमूक माणूस एवढा आहे, म्हणून आपल्या मतावर त्याची छाप पडू देणें हें मी कधीं केलेलें नाहीं. माझें मत जर टिकण्यासारखें नसेल व लोकोपयोगी रहाणार नाहीं तर मी आपला गाशा गुंडाळीन, पण आपल्याला संमत नसलेला मत-संप्रदाय खांद्यावर घेऊन ओरडत सुटणें माझ्यानें मुळींच होत नाहीं. सार्वजनिक स्वरूपाची संस्था म्हटलें कीं, त्या संस्थापकाला व कार्यवाहाला संस्थेतील ऐदी लोकांच्या मताची फारच जिकीर होते व भांडणतंडणें उत्पन्न होऊन एक-मेकांना कह्यात कसें ठेवता येईल याच्या मननात त्याचें मन फार खर्ची पडतें. मी ही भूमिका सहसा पतकरीत नाहीं. एकाद्या कामाचा पतकर पूर्ण

रीतीनें माझ्याकडे असला तर तें मी हातीं घेतों. नाहीं तर दूर सरकतों—पण यामुळे मला संस्था संस्थापक होता आलेलें नाहीं, हें मात्र खरें आहे—एक फार मोठा मोका या मतस्वातंत्र्याच्या मुद्यावर मीं नाकारलेला आहे !

आणखी एक मोठा गमतीचा विचार सांगावयास हवा. एकादें कार्य किंवा एकादी संस्था जरी सर्वस्वी आपल्या मताची ठरता आली तरी त्या कामाला किंवा संस्थेला आपला सगळाच्या सगळा वेळ देऊन तें काम पुढें ढकलावें कीं आपली चरितार्थाची व्यवस्था निराळी ठेवून उर्वरित वेळेंत हें काम करीत रहावें असा तिढ्याचा प्रश्न मनापुढें उभा रहातो. अष्टौप्रहर तेंच काम केलें तर तें काम अर्थातच झपाट्यानें चालू लागतें हें खरें, पण मग आपला स्वतःचा चरितार्थ त्याच कामातून चालविणें भाग पडतें आणि हें एकदा पत्करलें तर काम पुष्कळ होतें हें निर्विवाद आहे. पण संस्थेतून आपला खर्च आपण चालवितों ही जाणीव त्रास देते. काम जर फार मोठें होत असलें व तें करणारा माणूस आधींच मोठा असला तर त्यानें आपल्या प्रपंचाची सोय त्यातून केली तरी चालण्यासारखें असतें, पण इतरांनीं हें केल्यास त्याची किंमत कमी होते असें मला वाटतें. हा केवळ पोट चालविण्यासाठीं त्यात राबत आहे असें लोक समजतात व पैसे देणारे तर त्या माणसाला मिंधा करूनच ठेवतात. तेव्हां हें करू नये, आपल्या चरितार्थाची सोय निराळी करावी. तर सबंध दिवस त्या कामाला देतां येत नाहीं व त्या मानानें कामाची गती व व्याप कमी रहातात. माझें मत या तिढ्यात कधीं शिरलेंच नाहीं. दोन वेळां अगदीं अनाहूत असे प्रसंग आले होते कीं जेव्हां मी याच कामात सर्वस्वी राबावें व यातूनच पगार खावा असा मित्रांचा सल्ला होता. पैकीं एक मी मतस्वातंत्र्य गमावेल या मुद्यावर नाकारला व दुसरा आत्ताच सांगितलेल्या मुद्यावर नाकारला. जें काम केवळ जनहितबुद्धीनें आपण सुरू केलें त्यातून पोट चालविणें मला प्रशस्त वाटलें नाहीं. त्यातही गरीब अनाश्रित लोकांसाठीं वर्गण्या जमा करावयाच्या आणि त्यातलाच कांहीं भाग आपल्या चरितार्थाला लावून घ्यावयाचा हा विचार मला सर्वथा दुःसह होता. स्वतः मिळवावें, आपला प्रपंच चालवावा आणि त्यागबुद्धीनें बाकीचें धन जनहितासाठीं खर्चावें ही भूमिका मी पहिल्यापासून पत्करलेली आहे व तीच बरोबर आहे असें मला वाटतें. पण यामुळें काम कमी होतें हें मात्र

खरें. शेवटीं हा प्रश्न आपल्या रुचीचा, मानापमान बुद्धीचा, असा ठरतो. एकाद्याला एक पद्धत आवडेल व एकाद्याला दुसरी आवडेल. मला ही आवडली कीं काम थोडें कमी झालें तरी चालेल. पण आपण सार्वजनिक पैशावर पोट चालवूं नये व विशेषतः गरीबासाठीं जमा केलेल्या धनावर तर मुळींच चालवूं नये.

येथें एक विकल्प मनात येतो. "गरीब लोकासाठीं जमा केलेल्या पैशातून आपलें पोट चालविणें हे दुःसह वाटत असणें हें ठीक आहे; पण त्या कामीं जर निघर्टून त्याग दाखविला म्हणजे केवळ भीठभाकरीपुरतें द्रव्य घेतलें तर मग मनाला खरखर लागण्याची काहीं जरूरी नाहीं. अगदीं थोडा पैसा उचलावा म्हणजे गरीबाचें अन्न आपण खाल्लें असें होत नाहीं." असें कोणाकोणाचें मत असतें. विवेक संस्थाचे चालक असे आहेत कीं जे केवळ पोटापुरतें द्रव्य संस्थेतून घेतात व म्हणून ज्याना नैतिक मिंधेपणा वाटण्याचें कारण रहात नाहीं. त्या पैशाच्या मानानें दिवसभर राबण्यानें संस्थेचें मात्र खरोखर कल्याण होतें हा विचार बरोबर आहे; पण माझ्या मनःप्रवृत्तीला हा मुळातच मानवत नाहीं. तेवढेंसुद्धा घेता कामा नये असें मला वाटलें याला काय करावें? वर जें म्हटलें आहे कीं हा गुदस्थ रुचीचा व मानापमानाचा प्रश्न असतो तेंच खरें आहे. यात माझ्या बाबतींत आणखी एक प्रवृत्ति आड आली असती व मलतेच व्रत घेतल्यानें प्रपचात माझी फजिती झाली असती.भीठभाकर खाऊन रहाणें मला खेपलें नसतें. कपडा जरी विशेष चागला घालीत नसलों—कारण माझ्या स्वदेशी व्रतानें माझ्या पोशाखाची रचा एकदा कायम झालेली आहे—तरी घरीं मी चागलेंचुगलें खाणारा आहे. जाडें भरडें कदाच मी खात नाहीं. जर एकाद्या वेळीं कदाच खाऊन रहाण्याचा प्रसग आला तर मला बिलकुल चैन पडत नाहीं, इतकेंच काय एकाद्या दिवशीं स्वयपाक वाईट झालेला असला तर संध्याकाळपर्यंत मला त्याची आठवण असते! माझें बाळपण सगळें गरीबींतच गेलें आणि माझ्या भावडाचीहि हीच किंवा याहून केविलवाणी स्थिति होती, पण आम्ही कर्ते झालों तसतसे रहाणीची ढब सर्वांनीं बदलली. खाण्यापिण्यात तर आम्ही गरीबीचा मर्यादि राहू दिला नाहीं. आम्हा सर्वांच्याच स्वभावातलें हें एक वैशिष्ट्य दिसतें. अर्थात् एकादें ध्येय पतकरून जन्मच्या जन्म कदान्नात घालविणें खरोखर माझ्याच्यानें झालें

नसतें. घरातल्या माणसांना त्यावर पोसणें तर मला अत्यंत दुःखप्रद झालें असतें म्हणून गरीबासाठीं जमा केलेल्या धनांतेशीं काहींहि आपण न उचलणें हें धोरण मीं ठरविलें तें योग्यच ठरविलें असें मला वाटतें. 'होल टाईम वर्कर' मी झाला असतों तर काम जास्त झालें असतें हें खरें, पण आताच सांगितल्याप्रमाणें प्रवृत्तीप्रमाणें, अगदीं मीठभाकरीपुरतेंच धन घ्यावें असें मला वाटलें असतें आणि शेवटीं तें मला जमलें नसतें

हा विचार येथेंच संपत नाहीं आपल्या चरितार्थाचें साधन स्वतंत्र ठेवणें, हा विचार जीवितविषयक तत्त्वज्ञानांत सुद्धां मान्यता पावेल असें वाटतें. जीविताचे *अपयशाचे प्रसंग फार असतात, तसा आपल्या जीविताचा नकाशाच* विसकटण्याचा संभवहि फार असतो काहीं ध्येयाचें म्हणून करावयास निघावें पण त्यात शेवटीं अपेशी व्हावें असें फारदा होतें अशा अपयशाच्या प्रसंगीं जर आपला चरितार्थहि त्याच कामावर अवलंबून असला तर आपल्या फजीतीला पारावार उरणार नाहीं तें अपेश यायला नको असेल तर मताप्रत वाटेल तसे बदल करावे, कोणाचेंहि मत गिळावें व आपल्याला असेंच म्हणावयाचें होतें असें म्हणावें असले प्रकार करणें अटळ बनतें मग अपेश वगैरे काहीं नाहीं! जें होईल तें बरोबरच व जें मिळेल तें यशच, व म्हणून संस्था चालू ठेवायाचीच व पोटहि चालावयाचें पण हें जर पत्करण्यासारखी मन प्रवृत्ति नसेल तर संस्था चालणार नाहीं, व म्हणून पोटही चालणार नाहीं म्हणून मध्य वयात किंवा उतार वयात कोठें तरी जाऊन पडावयाचें असें होतें या दृष्टीनें पहाता आपल्या चरितार्थाचें साधन स्वतंत्र ठेवणें हें अवश्य आहे. कितीतरी संस्था अशा आहेत कीं ज्यांचे मूळ हेतु व धोरणें हीं अगदीं वेडींवाकडीं होऊन गेलेलीं आहेत व त्याचे चालक तेथेंच जोर देऊन राहिले आहेत मी जर संस्था काढून बसलों असतों व त्यांतून चरितार्थ चालविला असता तर माझ्यावर बिकट प्रसंग आला असता १९१७ सालीं मी अस्पृश्यांच्यासाठीं खटपट करू लागलों व १९३७ सालीं मी ती आपण होऊन बंद केली सुरू केली तेव्हा मी कोणाचें मत व धोरण प्रमाण मानलें नव्हतें व बंद केली तेव्हाहि कोणाचें मत व धोरण मी प्रमाण मानलेलें नव्हतें चळवळीचें आटलेलें द्रव्यसाधन, शरीराची कष्ट करण्याची नाउमेद ज्यांच्यासाठीं करावयाचें त्यांचें औदासीन्य व विरोध, थोर पुढाऱ्यांच्या मनाशीं मेळ बस.

ध्याचा असंभव ही दिसून येतांच मी आपण होऊन चळवळ बंद केली. म्हणजे मी तिच्यातून मलशतः बाहेर पडलो. मी स्वतन्त्र होतों म्हणून मला हें साधलें. जर का छत्रया असती व तिच्यातून माझा प्रपंच चालत असता तर मी स्वत.ची फरपट करून घेतली असती व वाटेल तें भ्रांत मत पतकरून बसलों असतों; व तें केलें नसतें तर उतार वयात प्रपंचाचें काय करावयाचें अशा भयानक स्थितीत येऊन पडलों असतों. त्या अरिष्टातून मी वाचलों याचें कारण हेंच की मी माझ्या चरितार्थाचें साधन स्वतन्त्र ठेवलं होतें. विवेक सत्या अंशा आहेत, की ज्यात इतकें निकराचे व निकालाचे प्रश्न येतच नाहीत. त्यांच्या चालकाची अशी स्थिति होण्याची भीति नसते, पण भारीव व ध्येयविषयक सत्यात हा संभव फार—म्हणून जीवितातील तत्त्व म्हणून हें धोरण मी सभाळलें हें फार बरें झालें.

श्रद्धा शब्दाचा जो नेहमींचा रूढ अर्थ आहे तो बुद्धिवादी माणसांना आपल्या आचारधर्मांत पतकरयत नाही. पण बुद्धीनें जें बरोबर आहेसें ठरलें त्याच्यावर मात्र दृढ श्रद्धा उत्पन्न व्हावयास हवी असते. या श्रद्धाबळावाचून हातून काही व्हावयाचें नाही. लोक करमणुकींत दंग असताना, किंवा दिवसाच्या श्रमाचा परिहार करीत असताना आपण रोज रात्रींच्या वेळीं हातात कंदिल घेऊन, घरापासून दोन दोन मैल लांब कोठेतरी गलिच्छ वस्तींत जातों, साध्या मुळाक्षरांची ओळख तेथल्या अर्भकाना व जुनवान लोकांना करून देतों, रात्रीं अपरात्रीं परत येतों, या हेलपाट्याचा भावी समाजजीवनात एक अब्जांश तरी इतका तरी अर्थ होतो का असें मी स्वत लाव कितीदा तरी विचारी, व त्याचें होकारार्थी उत्तर स्वत सच देत असें. खोऱ्यानें एक ओंजळभर माती दूर होते. अशीं एक अब्ज खोरीं मारलीं म्हणजे सबंध डोंगरसुद्धा खाली करता येईल हे खरें सरें गणित आहे. म्हणून खोऱ्याच्या एका घावावर ही बौद्धिक श्रद्धा असावयास पाहिजे. माझे मित्र हरिभाऊ फाटक यांच्याशीं सडकेनें या तऱ्हेचें पुष्कळ बोलणें होई. आमची बौद्धिक श्रद्धाच अशी होती की अवश्य तितक्या माणसांनीं, अवश्य तितके दिवस, अवश्य तितकें मनापासून काम केलें तर हा प्रश्न खास सुटेल. असें असल्यामुळें या एकाकी श्रमाचें मला काहीं वाटत नसे. आपण प्रयागून वगैरे पुष्कळ सूत्ररूप

वाक्यें वाचतों, पण त्या वेळीं आपल्याला वाक्यांचें व्याकरण कळतें इतकेंच काय तें जेव्हा त्या सूत्राच्या अर्थाला धरून आचरण सुरू करावें तेव्हा त्याचा खरा अर्थ प्रतीत होतो व्यवहारानें ज्ञानाचा खुलासा होतो शंभराची नोट चिमटींत मावते, पण ती मोडली म्हणजे तिचा शुभ्र अर्थ ओंजळभर भरतो व तो झोळ्यांत भरतो. हाच प्रकार कृतीनें होतो व सूत्रवचनें जिवंत आहेत असें वाटू लागतें.

आणखी एक तात्त्विक विचार माझ्या साह्याला सदैव सिद्ध असे या चळवळीला सुरवात केल्यानंतर थोड्याच दिवसांत हा विचार माझ्या मनांत स्थिर झाला. यशाच्या खालोखाल जर काहीं या जीवितांत संपादण्यासारखें असेल तर तें अपयशच आहे असें माझें मत कायम होऊन गेलें यशाचे धनी फार थोडे, पण यश मिळविणें जरी चांगलें तरी त्याच्या खालोखाल संपादण्यासारखें काय? तर 'अपयश' हें त्याचें उत्तर आहे. ज्यानें अपयश संपादिलें तोहि यशस्वीच होय. इतकेंच कीं त्याचें अपयश म्हणजे अपुरें यश असतें प्रयत्नाचा महिमा आजवर अनेकांनीं गाथिला आहे, त्याचा हाच अर्थ आहे. मला साह्य करणारे सगळे पोरसवदा तरुण लोक असत. त्यांच्या संगतींत माझा बहुतेक जन्म गेला आहे त्यांना या अभागी चळवळींतील ओंगळपणा, अनिश्चितपणा, निरपेक्षता, उपेक्षा इत्यादींमुळें पुष्कळ पुष्कळ निराशा वाटे पण वरील सूत्राचें मर्म समजून सांगितलें तर त्यांना तें उत्तेजक वचन असे. वास्तविक पाहतां आम्ही हा उद्योग करीत असतां, सार्वजनिक जीवितांच्या इतर क्षेत्रांत केवढाले अतिरथी महारथी कामें करीत होते त्यांच्या कामाच्या मानानें आमच्या कामाचा काय पाड? पण काम कितीही लहान असू द्या, त्याचें स्वरूप जर महत् असलें तर आपल्या मनाशीं काहीं तात्त्विक साका बसत जातो या सामर्थ्यानेंच हा वरील विचार होऊन त्यानें मला सतत धीर दिला

चळवळीची स्वतन्त्रपणें उभारणी करणारा माणूस, ती चळवळ सुरू करतांना वयानें बराच मोठा असावा असें एक मला वाटतें आपण तारुण्याची तारीफ पुष्कळच करतों, पण या कामीं कौतुकाचा भाग जितका असतो तितका तारतम्याचा नसतो, वयानें लहान पुढारी किंवा कर्ता हा कौतुकाचा विषय होईल, पण त्याच्या हातून होणाऱ्या गोष्टी फार वेळा पुरीच्या होतात काहीं तरुण लोक अद्भुत गोष्टी करून त्यावर मरूनहि गेले हें मलाहि

माहीत आहे. पण अशीं उदाहरणें पुष्कळ सापडत नाहींत हेंच खरें महत्त्वाचें आहे. चळवळी-चळवळींत फरक असतो. जेथें सारासारविवेक, धोरण, धावडाणू, जवळची वाट, या उपायांनीं अनेक कामें सहज साधतात तेथें तरुण मनुष्य शब्द व उत्साह यांचा अतिरिक्त व्यय करतो. दुसऱ्याचें म्हणणें समजण्याचा जो संयम हवा असतो तो त्याला आलेला नसतो व वस्तूंची विधायक बाजू पडताळण्याला त्याला सवड नसते. त्याची रसिकता वेताची असते व सहानुभूति संकुचित असते. या उणीवांची चळवळीला बाधा होते. म्हणून चळवळीला पडणारा फिरा ती सुरू करणारा माणूस वयानें मोठा असावा असें मला वाटतें. माझ्या अंगात फार ठळक गुण कांहीं नसतील पण आताच सांगितलेल्या कांहीं सौम्य स्वरूपाच्या गुणाची अल्प तरी वस्ती माझ्या ठिकाणीं झाली होती व त्यामुळें मला पश्चात्तापाचा प्रसंग सहसा आला नाहीं, व फार आदळआपट न करता मला कित्येक गोष्टी साधता आल्या. लोक मूर्ख आहेत व आपण त्यांना सुधारणारे कोणी मोठे असामी आहों या विचाराची बाधा मला कधींच झाली नाहीं.

आजवर जें कोणी केलें नाहीं किंवा लिहिलें नाहीं तें आपण करावयास निघालों आहों किंवा सांगावयास निघालों आहों अशी लोकविलक्षण अथवा जीवितातिरिक्षण भूमिका घेणारे जे मनस्वी बुद्धीचे लोक आहेत त्यांची गोष्ट निराळी. बाकीचे जे कोणी जनहितास्तव कांहीं करू पाहातात त्यांनीं मागील चांगल्या गोष्टींचा संग्रह करावा व त्यात कांहीं नव्या गोष्टींची भर घालावी असें मला वाटतें. माझ्या ल्हानशा कामांत माझी भूमिका हीच होती. हिला च मी 'सनातनी सुधारक' ही शब्दसंहति लावलेली होती. या गोष्टीवर माझा कायम विश्वास आहे. आपल्या जीवनातील बहुतेक विचार वाडवडिलांच्या रूपानेंच आलेले असतात, म्हणून मागच्या लोकांनीं जें चांगलें केलेलें असेल तें निवडून घेऊन कायम ठेवण्याचें सनातनीपण व जें नवें घेण्यासारखें आहे तें निवडून घेण्याचें सुधारकपण हीं दोन एकत्र झाल्यानें काम मजबुतीनें होत जातें; म्हणून या दीर्घ विचाराला सनातनी सुधारकपणा हें नाव मी दिलेलें आहे व तें युक्त आहेसें मला वाटतें. या दृष्टीनें अस्पृश्यता निवारणाच्या कामांत पूर्वी जें कांहीं झालें असेल तें इतिहासांतून वाङ्मया-तून, धर्मग्रंथांतून, व चालीरीतींतून उचलून घेणें प्रशस्तच ठरतें. त्यामुळें

पूर्वजांशी आपला वैचारिक संबंध निगडित रहातो पण पूर्वीच्या लोकांना एकादें श्रेय दिलेलें अनेकांना आवडत नाहीं त्याचा थोडा अंश असतो कीं पूर्वजांनीं काहीं केलेलें नाहीं, आपणच काय तें करू लागलों, तर त्यांचीं नांवें कशाला घ्यावीं ? पण हें मत मला कधींच भावलें नाहीं धर्म, समाज कारण इत्यादींपैकीं जें ठेवून घेण्यासारखें असेल तें ठेवून घेतलेंच पाहिजे पण जुन्यावर चिडलेल्यांना जुन्यांत ठेवून घेण्यासारखें काहींच नसतें, असें वाटतें व यामुळें अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत जुन्यांना त्याचें श्रेय दिलें तर काहींना आवडत नाहीं मला हें अगदीं नापसत आहे याच धोरणानें मी वागत होतों अर्थात् या लोकांचा माझ्यावर मोठा रोष असे

अस्पृश्यतानिवारणाचें जें काम मीं आपण होऊन पतकरलेलें होतें त्यांतील माझी उपयुक्तता संपली असें दिसताच, मी त्या कामांतून खुबीनें निवृत्त झालों हें बरें केलें असें वाटतें. उगाच कोठें तरी डोई देऊन मनाविरुद्ध काहीं करीत रहाणें मला सोयस्करसें नाहीं चळवळीचें आर्थिक साधन माझें मीच होता होईतों उत्पन्न करी तें प्रथम कमी व मग बंद झाल्यावर एक बाजू खचल्यासारखी झाली वर्गण्या गोळा करणें माझ्या प्रवृत्तींत नाहीं पुढें ज्या डिप्रेस्ड लोकांच्यासाठीं एखादी गोष्ट करावयाची त्यांना स्वतंत्र पुढारीपण लाभलें व इतरांनीं या कामांत का ढवळाढवळ करावी असें त्यास वाटू लागलें हें त्यांच्या प्रगतीचेंच लक्षण आहे तिसरें म्हणजे ज्यांना डिप्रेस्ड लोकांसाठीं केवळ कागदोपत्रीं चळवळीच्या पलीकडे काहीं करावयाचें आहे त्यांना शारीरकष्ट करण्याची धमक व्हावी माझी ही धमक पळाची उलटून गेल्यावर कमी झाली व शेवटीं या चळवळींत महात्मा गांधी उतरल्यानंतर अगदीं टोकाचें बोलण्याची जी प्रथा त्यांनीं पाडली व त्याच्या पाठोपाठ चें बोलणें हें घातक आहे असें त्यांनीं प्रतिपादण्यास जी सुरुवात केली, तीमुळें माझ्या करण्याबोलण्याची मातब्बरी राहिली नाहीं जो आत्यन्तिक बोलेल तो खरा हें बहुजनसमाजाला—म्हणजे या कामीं डिप्रेस्ड लोकांना पटणारें पण मला शुद्ध विचारदृष्ट्या व धारणदृष्ट्याहि पतकरेना अर्थात् या कारणांनीं ही चळवळ आपल्यापुरती आपण बंद करावी असा विचार मीं केला. याव, मी योग्य नेंध केलें कारण जेथें तुमची जरूर नाहीं व जें तुम्हाला पटत

नाहीं येथे केवळ त्या कार्याच्या नावाला भुलून काहीं तरी करीत रहाणें हें चूक व आत्मवचनेचें आहे असें मला वाटतें.

त्या चळवळींत मी होतों व जी केल्याच्या स्मरणानें मला शाश्वत आनंद होतो तिच्या बाबतींत माझ्या जीविताशीं तत्त्वज्ञानरूपानें निगद्ध झालेल्या विचारांचें टिपण आतापर्यंत मी केलें. आता जीविताच्या इतर अगांत तत्त्वज्ञानरूप जे विचार व ज्या प्रवृत्ति मला महत्त्वाच्या वाटतात त्या सागतो.

परोपकाराची प्रवृत्ति सृष्टीच्या योजनेतील एक अवश्य अंग आहे असें मला वाटतें दुःख, अन्याय, अज्ञान यांच्या निवारणाची व घ्वसनाची ही व्यवस्था आहे ही प्रवृत्ति ज्याना सृष्टीनें दिलेली आहे त्यानीं तिचा वापर केलाच पाहिजे. म्हणून परोपकारासाठीं झगडणाराना जरी व्यवहारशानी लोक हसले व आत्महित न जाणणारे म्हणून म्हणाले तरी तें त्याचे प्रापंचिक शहाणपण आपण न मानलें चालतें ज्याना स्वतःचें रक्षण करता येत नाहीं, ते लोक सर्व तऱ्हांनीं नालायक असतात असें नाहीं, ते रक्षण्यास योग्य असेच असतात म्हणून तर शिपाई लोक आपण स्वतः रात्रीं पडतात व त्याचे रक्षण करतात हाच न्याय परोपकारालाहि लागू आहे ज्याच्यावर तुम्ही उपकार करता ते सर्व तऱ्हांनीं नालायक नसतात, ते रक्षण्यास योग्य असतात, म्हणून चळवळ करणारे लोक एक तऱ्हेचे शिपाईच ठरतात आणि रात्रीं पडून त्याचें रक्षण करतात ही सृष्टीची व मानवी व्यवहाराची एक योजनाच आहे. यासाठीं परोपकाराची प्रवृत्ति बाळगणाराना इसता कामा नये हा प्रपंच—भोळा असून आत्मनाशास प्रवृत्त झाला असें दूषण त्याला लागू पडण्यासारखें नसतें

तेवढ्यापुरतें प्रपचात थोडेंसें नुकसान होणार हें क्रमानेंच येतें तें प्रपचातील सर्वांनीच सहन केलें पाहिजे पण जे लोक आपल्या प्रवृत्तीच्या मार्गे लागतात व प्रपचातील माणसाना आपल्यामागें केवळ नाग्यासारखें लोंबत ठेवतात त्याच्याबद्दल मला यत्किंचितहि आदर वाटत नाहीं. त्यानीं प्रथमच गोसावी व्हावयास हवें होतें प्रपच तर हवा, त्यांतील सर्व सुखें चाखण्यास हवींत, पण त्या प्रपचात त्याच्यामुळे हीं सुखें लाभतात त्याच्यावर नेहमी करवर करावी आणि त्याना नेहमा बुभुक्षित, दीनवाणे, आणि कष्टी ठेवावें हें सामाजिक पातकच आहे चळवळ करणाराला जनहित आवेगाचा जो अनुभव असतो, तो त्याच्या बायकापोरानाहि असतो असें मानणें चूक आहे तीं इतर पाशांनीं

त्यांच्याशीं निरुद्ध रहातात. लोक त्याची जी तारीफ करतात तिनें हीं माणसें गुदमरून जातात. संस्कृतीचा फायदा या चळवळ करणारांना मिळतो व हे मात्र समजतात कीं, आपल्या ध्येयाशीं हीं माणसें एकरूप झालेली आहेत ! म्हणून जीवितांतील एक अवश्य सूत्र म्हणून मला हें अगत्याचें वाटतें कीं, जनहितसाधकांनींहि स्वतःच्या प्रपंचातील माणसांची आबाळ करूं नये.

परमार्थाचें विवेचन व चिंतन हें मला जीविताशीं कायमचें जखडलेलें असें वाटतें. ज्याला मन व बुद्धि आहे तो हें करणारच, पण प्रपंच करणें न करणें याच्याशीं त्याचा कांहीं संबंध आहे किंवा तें न केल्यामुळें माणसाला सद्गति मिळत नाहीं असें मला मुळींच वाटत नाहीं. सद्गतीचाहि अर्थ मला माहीत नाहीं. परमार्थचिंतन हा एक शुद्ध जिज्ञासेचा विषय म्हणूनच मी मानतों. परमार्थाविषयीं जीं मतमतांतरें आहेत तीं सर्व अनुमानें आहेत व त्यांतलें त्यांत बरें कोणचें हें बुद्धिदृष्ट्या पहाणें येवढेंच काय तें करता येण्यासारखें आहे असें वाटतें.

माझ्या बोलण्यावरून पुष्कळांचा असा समज झाला आहे कीं मी परमार्थाचा वैरी आहें! हा समज अगदीं अगदीं चूक आहे. परमार्थाचें चिंतन मला अत्यंत अवश्य व सुखकर वाटतें व तें मी आपोआपच करतों. परंतु ज्याला जनदृष्ट्या परमार्थ समजतात त्यांतील प्रमाद, हेत्वाभास व वैयक्तिक गफलती यांच्या विरुद्ध मात्र मी पुष्कळदा बोलतों व म्हणून खुद्द परमार्थाच्याच विरुद्ध मी आहें असा समज झाला आहे. सूक्ष्मतम कार्यकारणाची चिकित्सा आपणच मनाशीं करणारा कोणीहि परमार्थाचाच विचार करतो असें समजलें पाहिजे.

आपण काय करावें हें आपल्या मनःप्रवृत्तीनें ठरतें. अमुक करावयाचें असा बौद्धिक कौल घेऊन एखाद्या कामाला सुरुवात केली पण जर मनाची प्रवृत्ति त्या कामाकडे नसेल तर तें काम अपल्या हातून नीट होणार नाहीं व तडीस तर नाहींच जावयाचें. ज्यांत मन प्रवृत्ति रमेल तें करता येतें. आपल्या बाकीच्या सर्व शक्ती या प्रवृत्तीला शरण जातात व ती हवेल तसा स्वतःचा उपयोग होऊं देतात. न आवडणारी गोष्ट करीन म्हटल्यानें होणार नाहीं व आवडणारी करणार नाहीं म्हटल्यास न ती व्हावयाची रहाणार नाहीं. 'प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति' हें श्रीकृष्णाचें वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. म्हणून अमक्यानें अमुक

का केलें व तमकें का केलें नाहीं यांचें उत्तर या वचनात सापडतें असें मला वाटतें. इंग्रजींत जिला Impulse म्हणून म्हणतात तिनें म्हणजे मनाच्या त्या आवेगानें शरीर तो तो व्यायाम करूं लागतें. जगतात आजवर जे मोठमोठाले कर्ते लोक झाले त्यांनीं सर्व तन्हेचा विचार करून मग कार्यनिश्चिति केली होती असें म्हणणें अनैतिहासिक आहे. कर्तृत्वाचें वर्धमान प्राप्त होताच प्रकृतीचा कल प्रबळ ठरला व त्याप्रमाणें ते सर्व कांहीं करीत गेले. हें जसें श्रेष्ठ कार्यकर्त्यांनें तसें लहान कार्यकर्त्यांचेंहि लक्षण आहे. आपण अमूक अमूक सामाजिक काम केलें व सध्या जें कांहीं इतर लोकोपयोगी करीत असेन तें का केलें व करतों असा प्रश्न स्वतःच्या मनाला मी विचारला म्हणजे ' प्रकृति तिथा मन प्रकृति ' हें एकच उत्तर मला सुचतें. ज्ञान पुष्कळ असतात, पण त्यांतलें आपलें कोणतें हें त्या मन प्रकृतीनें ठरतें.

तथापि माझें जीवितविषयक तत्त्वज्ञान याहून कांहीं नवें नाहीं. प्रत्येक पिढी अब्ज अब्ज माणसांची, अशा दहा सहस्र पिढ्या भविष्यकाळांतून 'एक दोन, एक दोन ' असें करीत भूतकाळात विलीन झालेल्या आहेत. केवढें हें अफाट मानव्य ! यांतील जे अगदीं ताडमाड उंच होते तेसुद्धा या रगाड्यात दडपून गेलेले आहेत. मग माझ्यासारख्या क्षुद्र माणसाची काय कथा ! त्याचें कसलें तत्त्वज्ञान आणि कसलें जीवित ! लिहिण्याची व छापखान्याची कला निघाली आहे म्हणून चार दिवस ते कदाचित् टिकून राहील एरवीं टिकण्यासारखें यात काय आहे ? परंतु प्रकाशक मित्रांनीं हा विषय दिला व लिहायास सांगितलें. स्वत त्याच जीवितापासुन थोडें दूर सरून, या जीविताला कांहीं टिकाऊ विचाराचा म्हणजे तत्त्वज्ञानाचा आसरा होता का असें मनाला विचारलें व चवरस बुद्धीनं पाहिलें तेव्हा मला हे परिच्छेद लिहाविसे वाटले आणि मानवी प्रपंचात स्वत चें लघुत्व किती आहे याचा मनाला नेहमी जाचणारा प्रत्यय पुन्हा एकदा आला !

---

# माझ्या कामांची रूपरेषा : : : ३

श्री म माटे

या पुस्तकाच्या संपादकांनीं आपल्याला पडलेली एक अडचण मला सांगितली मी ज्या अनेक सार्वजनिक चळवळी गेल्या तीस वर्षांत केल्या आहेत, त्यांची हकीगत संपादकांच्या मनांत या पुस्तकांत घालावयाची होती परंतु ती कोणी लिहावी हा प्रश्न त्यांना पडला आजवर शेंकडो विद्यार्थी माझ्या संगतींत राहून गेलेले आहेत परंतु या चळवळींचें सामग्र्यानें आणि ममत्वानें अवलोकन केलेला एकहि विद्यार्थी त्यांना सांपडण्यासारखा नाहीं कोणी कांहीं वर्षें, कोणी कांहीं वर्षें असे माझ्या संगतींत राहून गेले, अर्थात् त्यांना त्या त्या वर्षांपुरती माहिती असेल, पण एकाच लेखांत जवळजवळ तीस वर्षांची हकीगत सांगतां येणें हें मात्र कोणालाहि शक्य नव्हतें म्हणून अगतिक होऊन संपादकांनीं मलाच सांगितलें कीं, तुम्ही स्वतःच ही हकीगत लिहून द्या माझें स्वतःचें चरित्र मी पुढें मागें केव्हां तरी लिहिणारच आहे आणि त्यांत या सार्‍या हकीगती पुष्कळ तपशिलानें मी सांगणार आहें परंतु आत्मचरित्र लिहिण्याची वेळ इतकी नजीक आली आहे असें मला अजून वाटत नाहीं आणि तें जेव्हां लिहावयास घेईन तेव्हां जर असें वाटूं लागलें कीं, हें लिहिण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं तर तो बेत मी सोडूनहि देईन पण पुढचें काहीं का होईना आजची संपादकांची अडचण दूर करण्यांत कांहींच दोष नाहीं असें मला वाटतें मागें रा देशमुख यांनीं 'माझें जीवितविषयक तत्त्वज्ञान' या विषयावर मला लिहावयास सांगितलें होतें तो लेख पुढें वसंत मासिकाच्या संपादकांनीं प्रसिद्ध केला प्रस्तुत पुस्तकाच्या संपादकांनीं तो यांत आरंभींच टाकला आहे त्या लेखांतील मजकुराला जर पूर्तता यावयाला हवी असेल तर मी केलेल्या तीस वर्षांतील लहानमोठ्या चळवळींचा छोटासा इतिहास येथें माझा मीच देणें हें संपादकांना सोयीचें आणि प्रसंगास उचित ठरेल असें वाटलें

१९१५ सालीं मी एम्. ए. झाल्यानंतर आरंभींच्या लेखांत सांगितल्याप्रमाणें, पुण्यासच राहण्याचा निश्चय मीं कायम करून टाकला. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें मी बारा सालच्या शेवटींच नोकरी धरली होती. आणि शिक्षक म्हणून माझा जम फार लौकर बसला. तेव्हांचे सुपरिंटेंडेंट कै. विष्णु बळवंत नाईक यांची अपेक्षा अशी असे कीं, शिकविण्याच्या पलीकडे विद्यार्थीवर्गासाठीं किंवा जनहितासाठीं शिक्षकांनीं आणखी कांहीं काम करावें. जनहितासाठीं कांहीं करावें हें लो. टिळकांच्या चरित्रानेंच तेव्हांच्या सर्व तरुण लोकांना माहीत झालें होतें. इतरांना सांगण्याचा कांहीं विशेष अधिकार प्रो. नाईक स्वतःकडे कधीं घेतहि नसत. त्यांतल्या त्यांत त्यांचा जास्त आग्रह हा कीं शिक्षकांनीं विद्यार्थ्यांसाठीं कांहीं करावें. पोटाच्या धंद्याच्या पलीकडे आपल्याला कांहीं करता यावें या हेतूनेंच मी जाणूनबुजून पुण्यास राहिलों होतों, म्हणून प्रो. नाईकांच्या प्रेरणेनें विद्यार्थ्यांत व्यायामाची आवड पसरविण्याचा उद्योग मी हातीं घेतला, आणि विद्यार्थ्यांकडून व्यायाम करून घेण्याच्या कामीं त्यांच्यावर सक्ति करावी लागली तरी ती आपण करूं अशी उमेद प्रो. नाईक यांनीं धरली. No exercise no food, म्हणजे व्यायाम केला नाहीं तर जेवायचेंही नाहीं हा मंत्र कै. गणुकाका वझे मास्तर यांनीं आम्हांला दिला. त्याचीं छापील कार्डें काढून तीं विद्यार्थ्यांना वाटलीं आणि सर्वांचा मिळून असा बेत ठरला कीं चवथ्या यत्तेपासून सातवीयत्तेपर्यंतच्या सर्व विद्यार्थ्यांना नगाऱ्याच्या ठेक्यावर जोर काढावयास लावावयाचें. न्यू स्कूलचे तेव्हांचे मोठे होशी तालीम मास्तर श्री दातार यांनीं आणि मी विद्यार्थ्यांच्या बरोबर जोर काढण्याचें आश्वासन दिलें. रमणबागेंत उत्तरेच्या कुसवाला लागून जो लांबलचक कट्टा होता तो झाडून, साफ करून, सारखून जोर काढण्याला लायक करण्याचें ठरलें. परंतु, कोठें माशी शिंकली हें मला कळलें नाहीं आणि नाईक यांनीं या जागेचा बेत बदलला. पुढें कबुतरखान्याच्या उत्तरेला समोरच कारखान्याची एक मोठी जागा डे. ए. सोसायटीनें घेतलेली होती. तेथें हें जोर काढण्याचें काम सुरू करावें असें ठरलें. परंतु नाईक यांच्या मार्फत, कोणीतरी व्यत्यय आणीत होतें हें खास. त्यामुळें तोही बेत रहित झाला. आणि मी या उद्योगांत मतप्रचारासाठीं जे बरेच दिवस घालविले होते ते वायां गेले.

यानंतर प्रो. नाईक यांचें लक्ष गावांतील कचऱ्याच्या पेट्याकडे गेलें.

तीस वर्षांपूर्वीची त्याची अवस्था आजही शिल्लक आहे. योग त्या म्युनिसिपल अधिकाऱ्याकडे प्रो नाईक, प्रो. एम. के. जोशी वगैरे या विषयासंबंधीं बोलून आलों. आणि शाळेंतील विद्यार्थी व शिक्षकवर्ग जर शहरातील स्वच्छतेचें हें काम आपण होऊन हातीं घेत आहे तर म्युनिसिपालिटी त्यांच्याशीं खासच सहकार्य करील असें आश्वासन त्यांनीं दिलें. परतु आमच्या पक्षानें कामाची तयारी आणि त्यांच्या पक्षानें सहकार्याची सदिच्छा हीं जरी असलीं तरी म्युनिसिपल अधिकाऱ्यांनीं सांगितलें कीं केराच्या पेट्या पुन्हां पुन्हां उपसल्या तरच रस्ते स्वच्छ होतील आणि या पेट्या पुन्हां पुन्हां उपसून नेण्याइतक्या पुरेशा बैलगाड्या हव्या, व म्युनिसिपालिटी गरीब असल्यामुळें इतक्या बैलगाड्या ठेवणें तिला सध्या तरी शक्य नाहीं. कोणत्या रस्त्यावर काम सुरू करावयाचें आणि केर पेट्यांतच टाका असें लोकांना शिकवावयाचें याचा आमचा नकाशा तयार झालेला होता. या रस्त्यांची आम्ही पहाणी करूनही आलों होतों, आणि स्वयंसेवकांची योजनाही झाली होती. परतु म्युनिसिपल बैलांच्या अभावीं आम्हांला हें काम सोडून द्यावें लागलें. याही कामीं विद्यार्थी वर्गांत मतप्रचारासाठीं मला बरेच दिवस घालवावे लागले होते. परतु ते आताच सांगितलेल्या कारणामुळें वाया गेले !

यानंतर मी शाळेंतल्या भानगडींत पडलों नाहीं. कोणत्याशा कारणानें श्री. हरिभाऊ फाटक यांची आणि माझी ओळख झाली आणि प्रो. नानासाहेब हर्डीकर यांच्या सहकार्यानें आम्ही एक कन्झ्युमर्स असोसिएशन काढण्याचें ठरविलें. या मंडळींतील सर्व सभासदांना महिन्याच्या महिन्याला किती माल लागतो हें पहावयाचें व घाऊक रीतीनें तो खरेदी करून या सदस्यांना वाटून टाकावयाचा. अर्थात् बाजारातल्यापेक्षां हा माल गिऱ्हाइकांना खासच स्वस्त मिळणार होता. परतु, प्रापंचिक लोकांना स्वस्त माल मिळवून देणें हा या चळवळींतील आमचा मूळ हेतु नव्हता. आम्ही असें ठरविलें कीं काहीं नफा सदस्यांना द्यावा, पण उरलेला नफा बाजूस ठेवून मुलांना व्यापारी शिक्षण देण्याच्या कामावर तो खर्च करावा. त्यावेळींच सुशिक्षित तरुण लोकांना नोकऱ्या मिळण्याची ददात पडूं लागली होती आणि म्हणून त्यांचें मन व्यापाराकडे वळविण्याचा आमचा हेतु होता. मतप्रचाराचें काम आम्ही जोरानें सुरू केलें. पण आम्ही दोघे किती सांगणार? मग एका

सदस्यानें तो संदेश दुसऱ्याला पोंचवावा, दुसऱ्यानें तिसऱ्याला पोंचवावा असा प्रचार सुरू झाला आणि आमच्या या मंडळांत सुमारें पन्नासएंशीं सभासद जमा झाले. आम्हाला मोठी उमेद वाटूं लागली आणि लोक प्रापंचिक असले तरी स्वतःचा थोडा तरी नफा तरुण पिढीच्या शिक्षणासाठीं खर्च करावा ही बुद्धि त्यांनीं धरावी याचें आम्हांला मोठेंच कौतुक वाटूं लागलें. शेवटीं एकदा श्री. जोग यांच्या वाड्यांत या सर्व सदस्यांची सभा आम्ही भरविली, आणि आज कायमचा निकाल लावून माल खरेदीला सुरुवात करावयाची असेंहि ठरविलें. पण सभा भरतांच प्रापंचिक म्हणजे कोण आणि लोकहिताची इच्छा बाळगणारे म्हणजे कोण याचा एकदमच निकाल झाला. जमलेल्या लोकांतील बहुतेकांनीं असें आग्रहानें सांगितलें कीं जरा तुमची ही कल्पना चांगली असली तरी ती आम्हांला पतकरतां येत नाहीं, जेवढा सगळा नफा होईल तेवढा आमचा आम्हांला मिळावा म्हणजे आम्हांला माल खूपच स्वस्त मिळेल ! हरिभाऊ, मी आणि हर्डीकर केवळ सर्दच होऊन गेलों. एका आतिष्ट आकडेबहाद्दऱ्यानें आपलें नेहमींचें वादंग सुरू केलें आणि स्वार्थत्यागाला आधींच विन्मुख असलेल्या लोकांना कांहीं व्यावहारिक तत्त्वज्ञानाचीहि जोड करून दिली. आमचा सगळा डमला हातोहात कोसळून पडला. आलेल्या अनुभवानें शहाणे होऊन आम्ही झटकन् दूर सरकलों आणि तुम्ही नसलात तरी आम्ही ही संस्था चालवूं अशी बढाई मारणाऱ्यांच्या हातीं आम्ही ती संस्था केली. परंतु त्यांना कांहींच करावयाचें नव्हतें. दोन लोक जर फुकटच्या फाजील रवावयास तयार असले तर राबवून घेऊन लागणारा माल जास्तींत जास्त स्वस्त मिळविण्याची व्यवस्था त्यांना हवी होती ! हे लोक बारा वाटा निघून गेले आणि आकडेपंडितांना फुशारकी देण्याचें श्रेय मात्र लाभलें. तथापि, हरिभाऊंनीं व मी ही व्यापारी शिक्षण देण्याची कल्पना एकदमच टाकली नाहीं. कशी जमवाजमव केली, हें आतां मला आठवत नाहीं. पण थोडासा पैसा उभा करून आम्ही एका तरुण विद्यार्थ्याला नारळ, काजू इ. जिनसांची खरेदी विक्री कशी करावी, त्याची पारख कशी करावी याचें ज्ञान संपादन करण्यासाठीं म्हणून गोव्याकडे पाठविलें. पांचच दिवस म्हणजे च गेले दोन महिने झाले तरी त्याच्याकडून एक अक्षरहि लिहून येईना. तेव्हां व्यापारी शिक्षणाचें एक वेळ असो, पण

या माणमाला तरी काहीं बरें वाईट झालें नाहीं ना अशी चिंता आम्हाला पडली शेवटीं गोव्याला गेलेल्या गृहस्थाचें पत्र पंढरपुराहून आलें ! त्यानें लिहिलें कीं "मी फार आजारी आहें, येथें येऊन पडलों आहें" अर्थात् व्यापारी ज्ञान संपादन करण्याचा नवा हिय्या या माणसानें केला नाहीं आमची ही चळवळ येथें संपला हीं पञ्चाऐंशीं गि ढाईकें जमविण्याच्या कामीं हरिभाऊ आणि मी आम्ही इतके हेलपाटे घातले होते कीं आमचा एकेक तरी वहाणाचा जोड खचित फाटला असेल

यानंतर आगेमागें केन्द्रातरी शनवारपठेंत नातूंच्या हौदासमोर कोणत्याशा एका घरात आम्ही एक मोफत वाचनालय काढलें आणि त्याचें नाव 'आर्य मोफत वाचनालय' असें ठेविलें त्या वेळीं निकडेतिकड मोफत वाचनालयें काढण्याची वावटळ उठली होती वाचनालय मोफत असे यामुळें अर्थात् वाचकांचा तुटवडा केव्हाच पडला नाहीं परंतु, केंव्हा तें आता आठवत नाहीं पण हें वाचनालयही गावांतील इतर अनेक मोफत वाचनालयांबरोबरच नाहींसें झालें

या साऱ्या चळवळी जरी आम्ही करीत आलों तरी अस्पृश्यता–निवारणाच्या प्रश्नानें त्यावेळीं आमचें मन फारच व्यग्र झालेलें होतें लो टिळक यानीं फार वर्षांमागें म्हणजे कदाचित् १९०५ द साली असेल, कर्नाटकातील गुर्लहुसुर या एका दूरच्या गावीं व्याख्यान देताना अस्पृश्यतानिवारणाविषयी फार कडकडीत विचार प्रगट केले होते महाराष्ट्रात या प्रश्नाविषयीं प्रार्थनासमाजाचे लोक अधून मधून बोलत असत परंतु, खरा पद्धतशीर प्रयत्न कै विठ्ठलराव शिंदे यानीं सन् साल्पासून सुरू केला होता यांच्यादी आधीं पुणें शहरात अस्पृश्य लोकाच्यासंबधान काहीं चळवळी झालेल्या होत्या परंतु त्या त्यांच्या इतिहासांतमा झालेल्या होत्या प्रत्यक्ष काम विठ्ठलराव शिंदे यांचेंच काय तें होतें स्वामी श्रद्धानंद, लाला लजपतराय, प मालवीय, म गांधी हे सर्व या विषयाच्या संबधानें फार कळकळीन बोलत आणि हा प्रश्न निकालात निघाला पाहिजे असें पुन्हा पुन्हा आग्रहानें मागत टिळकानीं तर एकदा असें विधान केलें कीं प्रत्यक्ष परमेश्वरानें जर सांगितलें कीं अस्पृश्यता पाळणें बरोबर आहे, तर तू परमेश्वरच नव्हेस असें मी त्याला सांगेन हा विषय पहिल्यानें कै शिवरामपंत दवचर यांच्या तोंडून मी शाळेंत असतानाच मला माहीत

झालेला होता. राजकारणाला जों जों भरती यावी तों तों या विषयाची बोंच त्याला कुठेतरी लागे. संत–वाङ्मय मी चांगलें वाचलेलें होतें. त्यातही मला हा विषय स्थान भरण्याइतपत आढळला होता. पण सगळयाच्यावर म्हणजे माझ्या घरच्या मूळच्या गरिबीनें या गरीब लोकांच्या दुःस्थितीकडे माझें लक्ष आग्रहानें वळलें. अमुक माणसानें सांगितलें आणि म्हणून मी हें अस्पृश्यांचें काम करूं लागलों असें मुळींच नाहीं. आताच सांगितलेलीं विविध कारणें सर्वीं पडलीं आणि शेवटीं त्यांच्या दैन्याच्या जाणिवेनें मी प्रत्यक्ष कामाला लागलों. हिंदुसमाजातील इतर कोणी लोक गरीब असले तरी नशीब काढाव-यास त्यांना धर्म आड येत नाहीं आणि म्हणून बाकीच्या गोष्टी जर अनुकूल असल्या तर आज लहानपणीं गरीब असलेला मनुष्य म्हातारपणीं सुखासमा-धानात रहातांना दिसतो. अस्पृश्य लोकांना ही नशीब काढण्याची संधि मुळींच मिळत नाहीं; धर्मानेंच त्यांना दूर ठेवलेलें आहे. माणसाच्या अंगा-तील बीजरूप शक्तींचा विकास होण्याला त्याला संधि मिळणें अवश्य आहे. परंतु ही संधि आपल्या धार्मिक चालींमुळें त्याला मिळत नाहीं व म्हणून तो कायमच्या दैन्यात रहातो. अस्पृश्यतेनें या लोकांचें जर कोणचें खरेंखरें नुक-सान केलेलें असलें तर तें हें आहे कीं त्यांच्या गुणविकासाला कसलीही संधि त्यांना मिळत नाहीं आणि विकसित झालेल्या गुणांच्या वापरालाही मिळत नाहीं. ही संधि त्यांना मिळवून दिली म्हणजे त्यांच्यावरची आपत्ति गेली असा अस्पृश्यतानिवारणाचा अर्थ मीं केला. सामाजिक आचार म्हणजे काय, आणि समाज बांधणीचीं तत्वें म्हणजे काय यातील फरक आपण ओळखलाच पाहिजे. अस्पृश्यतानिवारण म्हणजे काहीं ठरलेले सामाजिक आचारविचार मोडणें येवढाच अर्थ रूढ होऊन बसला होता. परंतु, ते आचार मोडले तरी अस्पृश्यांची तक्रार मिटली असती असें मला वाटत नाहीं. काहीं लोकांना उत्कर्षाची संधीच नाकारणें हें जें हिंदुसमाजाच्या बांधणींतील एक तत्व होतें तें नष्ट केल्यावर हा प्रश्न सरासरा सुटला असें होईल असा विचार आपल्या मनाशीं ठरवून मी कामाला लागलों.

हा तात्विक फरक जरी ध्यानात घेण्यासारखा असला तरी अस्पृश्यतानि-वारणाचें नित्याचें काम करावयाचें म्हणजे शिक्षणाच्या मार्गानेंच जाणें भाग होतें. म्हणून १९१७ सालीं, महिना आतां आठवत नाहीं, टिळकरोड

वरील मांगवाड्यांत, पिंपळाच्या कट्ट्यावर मी माझी पहिली शाळा सुरू केली. त्यावेळीं ' टिळक रोड नव्हता. लकडी पुलावरून स्वाराच्या गेटाकडे जावयाचें म्हणजे सदाशिवपेठच्या रस्त्यानें बुधवारच्या चौकांत किंवा रामेश्वराकडे जावें आणि तेथून स्वाराच्या गेटाकडे जावें अशी चाल असे. हा मांगवाडा टिळकरोड मध्यें घुसल्यानें आता दुभंगलेला आहे. पूर्वी तो सलगच असे. पावसाळ्याच्या दिवसांत नव्या पेठेकडून येणारें सारें पाणी या मांगवाड्यांतून नदीकडे वहात जात असे. आळी अगदीं घाणेरडी, दिवाबत्ती चुकूनसुद्धा असावयाची नाहीं अशी मोठी चमत्कारिक वस्ती ही होती. परंतु आता मी जास्त तपशील देत बसत नाहीं.

येथील शाळा चांगली चालू लागल्यावर साळी महेघाटाच्या अलीकडे एक चांभारवाडा आहे, तेथें दुसरी एक शाळा आम्ही चालू केली. हरिभाऊ फाटक हे या कामांत माझ्या बरोबर असत. पुढें काहीं दिवसांनीं नदी काठीं नारायण पेठेंत सध्या जेथें अनाथ हिंदु महिलाश्रम आहे तेथें पिछाडीच्या बाजूस आम्ही तिसरी शाळा सुरू केली. नंतर मंगळवार पेठेंत एका लहानशा चढावर महाराची वस्ती आहे तेथें महादेवाच्या देवळांत चवथी शाळा चालू झाली. आता अनुक्रम न देता येवढेंच सांगतों कीं, चिमण्या गणपतीशेजारील चांभारवाडा, हत्तीमहालांतील चांभारवाडा, कसब्यांत कागदीपुऱ्याच्या अलिकडील चांभारवाडा, कागदीपुऱ्याच्या पलीकडील ओढ्याच्या काठचा मांगवाडा, मोठगजांतील चांभारवाडा, सान्याच्या मांगवाड्यांतील मांगवाडा, घोरपडे पेठेंतील चांभारवाडा, रविवार पेठेंतील ढोरवाडा, कामाठी पुऱ्यांतील महारवाडा, गुलटेकडीवरील मांगवाडा, भांबुर्ड्यांतील मांगवाडा, भांबुर्ड्यांचा महारवाडा, गणेशपेठ नागझरी चांभारवाडा, गाडीतळ महारवाडा, कातडखाना मांगवाडा इ. ठिकाणीं केव्हा केव्हा बावीस शाळा पण नेहमीं अठरा शाळा आम्ही चालू लागलों. पहिल्या पहिल्यानें माझ्या हाताखालीं शिकणारे विद्यार्थी या ठिकाणीं शिकवण्याचें काम करू लागले. मतप्रचाराचा माझा केवळ धडाका होता. आणि शाळेंतील विद्यार्थी हें माझें बळ होतें. परंतु, लवकरच मला दिसू लागलें कीं आज दोघांनीं शिकवावयास जावें, उद्या दोघांनीं शिकवावयास जावें असें केल्यानें कामांत सातत्य रहात नाहीं म्हणून हळूहळू मी शिक्षकांच्या कायमच्याच नेमणुका करून टाकल्या. इतक्या शाळा एकदम

निघाल्या नव्हत्या हे लक्षात घ्यावें. हे नेमलेले शिक्षक, ज्यांना या माझ्या कामाचें महत्त्व पटलेलें आहे असा माझ्या विद्यार्थ्यांतीलच असत. या शिक्षकांना मी पगार देऊं लागलों. वाचकांनी क्षमा करावी. मला खरें तें सांगितलें पाहिजे. या पगाराचा बोजा मीच उचलूं लागलों. हळुहळू म्युनिसिपालिटीनें आम्हांला ग्रँट्‌ही दिली. परंतु, ग्रँट मिळाली कीं आणखी जास्त खस्ता काढून मी माझा व्याप वाढवूं लागलों. आणि असा तऱ्हेनें होत होत हें काम बावीस शाळा-पर्यंत गेलें. काम सुरू झालें तेव्हां माझा मासिक पगार समोर पासष्ट रुपये असावा आणि पुढें निवृत्तीपर्यंत, म्हणजे मी नोकरींतून निवृत्त होण्याच्या आधीं दोन तीन वर्षेंपर्यंत तो एकशेंविसाच्या पुढें कधींही गेला नाहीं. परंतु, माझा एक इंग्रजीचा खाजगी क्लास होता. आणि ती माझी कामधेनू होती. तिच्या प्रसादानें मला हा येवढा खर्च करता येऊं लागला. एखाद्या वेळीं अडलें पडलें तर श्री. अण्णासाहेब भोपटकर यांच्याकडून मी थोडेसे पैसे आणी, पण हें केवळ अपवादादाखल होय. माझ्या क्लासांत कांहीं कांहीं वेळा तर काळीच अडीचशें मुलें असत. त्यामुळें डिप्रेस्ड क्लासेसचे विद्यार्थी, अनाथ विद्यार्थी-गृहांतील मुलें आणि इतर कांहीं गरीब मुलेंहि सोडून दिलीं तरी या क्लासांतून मला चांगला पैसा मिळे. माझें सुदैव असें कीं हा पैसा निराश्रित लोकांच्या कल्याणासाठीं खर्चावा ही बुद्धि मला झाली आणि टिकून राहिली. या सर्व शाळांत मिळून केव्हां केव्हां पचवीसापर्यंत पण नेहमीं वीसबावीसपर्यंत शिक्षक असत. आणि मुलें आणि मुली मिळून साडेपांचशें विद्यार्थी असत. या सर्व शाळा रात्रीच्या चालत हें ध्यानांत घ्यावें. मी स्वतः त्यांतल्या अनेक शाळांत शिकविलें आहे. रात्रीं आठ वाजता घरून निघावें आणि हा शिकवण्याचा उद्योग आवरून अकरा वाजता परत यावें असें वर्षानुवर्षे चाललें होतें. मात्र पुढें, पुढें इतक्या थोरल्या शाळा तपासण्याचें काम करणें हाच उद्योग मला करावा लागला.

आमच्या घरीं एक मोठें गिरणीसारखेंच सुरू असे पाट्या, पेन्सिली, वह्या, पुस्तकें, दौती, नकाशे, फळे, दिवे, कुलुपें, सामानाच्या पेट्या हें सर्व सामान आम्हीं फुकटच पुरवीत होतों. या सामानाचा मोठा साठा माझ्या घरीं ठेवावा लागे. अर्थात् हे शिक्षक पाठ्यासाठीं आले, हे शिक्षक दिव्यासाठीं आले, असा प्रकार सारखा चाले. शाळा म्हटली कीं ती त्या त्या वस्तींत एका

नंत्या प्रदेशाचें केंद्र बनून राही आळंदीतील सगळा तजवीज या ठिकाणी मास्तरांच्याकडे जमा होत आणि मास्तर लोक त्या माझ्याकडे आणून गुदरीत. यर्स्तोत काही साप वगैरे उद्भवलो तर औषधाची योजनाही आम्ही करीत असू आणि एकादशीच्या दिवशी प्रवचन करण्याचाही प्रघात आम्ही ठेवला होता, मिळून कामाची मोठी धूम असे

पण एकीकडे हे शाळांचें काम चालू असताना मतप्रसारासाठी येवल्या काळात निरनिराळ्या प्रसंगाला मिळून मी शेंकडों सभा केल्या असतील, शाळा, कॉलेजें, जिल्हामंडळें, गणपति उत्सवाच्या जागा, म्हणजे जेथें कोठें हा विषय मांडता येईल, तेथें तेथें तो मांडणे हें मी आपलें कामच बनविलें होतें. काहीं संस्था आपण होऊन मला बोलवीत आणि काही ठिकाणीं मी मुद्दामच जात असें. स्पृश्य लोकांना अस्पृश्यतानिवारणाची कल्पना पटविणें हा जसा एक फार मोठा उद्योग होता तसाच अस्पृश्य लोकांना शिक्षणाचा, स्वच्छतेचा व व्यसनें सोडण्याचा महिमा पटविणें हाही एक तितकाच महत्त्वाचा प्रश्न होता. आणि यासाठीं वर सांगितलेल्या निरनिराळ्या अस्पृश्य वस्त्यांत आमची व्याख्यानांची मोहिमच असे, याशिवाय, परिषदा भरविणें, लोकांनीं भरविलेल्या परिषदेंत आपला विषय नेऊन घालणे, विद्वानांच्या बैठकी भरविणें हे उद्योग करावे लागत मला आता वाईट वाटतें कीं, मी माझ्या कामाची दैनंदिनी ठेवली नाहीं नाहीं तर या वीस वर्षांच्या चळवळींचा बारीकसारीक तपशिलानें गडगच भरलेला केवढातरी इतिहास मला लिहिता आला असता. असो ब्राह्मण परिषद, विद्वत् परिषद, शंकराचार्यांच्या भेटी, परगावाहून आलेल्या शास्त्रीमंडळींबरोबर चर्चा, हेंही प्रकार सारखे चाललेले असत

मतप्रसारासाठीं पुण्याच्या बाहेर म्हणजे महाराष्ट्रांत मी पुष्कळ हिंडलों. ज्या गावांना मी गेलों त्यांतील बहुतेक गावीं अस्पृश्यता-निवारण हा विषय लोकांच्या कानावर पहिल्यानेंच पडला, असें मला निश्चितपणानें सांगता येईल कोणत्याही गावाला गेलों म्हणजे दुपारीं जमल्यास एखादी सभा घालीत करीत असे संध्याकाळीं सर्व गावाची म्हणून थेटर, धर्मशाळा, किंवा चौक या ठिकाणीं सभा करी आणि रात्रीं अस्पृश्यांच्या वस्तींत तिसरी सभा करीं. या वेळा त्या त्या लोकांच्या सोयीच्या म्हणून ठरविलेल्या असत या प्रचाराच्या जोडीला आळंदीच्या यात्रेतील फडकऱ्यांच्या गाठी घेणे हेंही काम मी करीं.

प्रत्येक फडकऱ्याची शिष्यशाखा बरीच मोठी असते त्याच्या मनात जर या विषयाचा रिघाव झाला तर त्याची शिष्यशाखाही आपल्या मताची बनेल असा माझा भोळाभाव होता, पण इतक्या वर्षांत एकहि फडकरी मला भेटला नाही आणि अर्थात्च त्याच्या अनुयायांनी आमच्या या प्रचाराकडे ढुंकूनही पाहिलें नाही. भरले या जत्रांचा प्रचारासाठी फायदा करून घेणे हेंही अवश्यच असे. अशा ठिकाणीं कांहीं वेळा ठरावही होत, परंतु हे ठराव केवळ आम्हीच करीत होतों आणि त्यांना ठराव हें नांव देत होतों ! तथापि एक गोष्ट खरी की मतप्रचाराचें काम मात्र नि सशय होत असे सांगावयास हरकत नाही कीं माझी मतप्रसाराची पद्धति कधीं आक्षेपार्ह नसे अगदी कट्टर सनातनी समाजापुढें सुद्धा माझीं झालेलीं भाषणें आहेत, पण त्यांनी तीं सयपणें, इतकेंच नव्हे तर फार विचारपूर्वक ऐकून घेतलेलीं आहेत मतप्रचार प्रत्यक्ष सुरू करण्याच्या आधीं मी स्वत आणि माझ्या स्वयंसेवकांनी सुमारें शंभर अस्पृश्य वस्त्यांची तपशीलवार पहाणी केलेली होती. बीसपचवीस प्रश्नांची एक यादी केलेली असून त्या प्रत्येक प्रश्नाला अनुसरून प्रत्यक्ष डिरेक्ट वस्तींत चौकशी करावी आणि मिळालेलीं उत्तरें तक्त्यावर उतरून घ्यावीं असा शिरस्ता ठेवला होता या सर्व तक्त्यांच्या परिशीलनानेच मी माझीं मतें बनविलेलीं असल्यामुळें कोणी मला कोठें हटकील अशी भीति वाटत नसे, आणि स्पृश्य समाजात तर मी जन्मलेलों आणि वाढलेलों असल्यामुळे त्यांची मतें तर मला चांगलींच माहीत होतीं त्यामुळें अपुऱ्या माहितीमुळें प्रतिपादनात उद्भवणारे दोष माझ्या मतप्रचारात उमटल्याचें मला आठवत नाहीं

या विषयाला अनेक बाजू आहेत इतिहास, आर्थिक स्थिति, सामाजिक वागणी, धर्मशास्त्राची बाजू , मानव्याचें नवें उत्थान, सेवावृत्ति, संतांनी आपल्या वाङ्मयात काढलेले या बाबतींतील उद्गार, ख्रिस्ती मिशनऱ्यांचे प्रयत्न, मुसलमानांचे आक्रमण, व्यसनाधीनता, धंद्याची हलाखी, अस्पृश्यता-निवारणाचा इतिहास असे कितीतरी मोटविषय या कामीं अभ्यासण्याजोगे आहेत. त्यांचा यथाशक्ति अभ्यास करून जेथें जो अध्याय सुरू करणें युक्त आहेसें दिसेल तेथें तो मी सुरू करीत असे वारकऱ्यांपुढें संतवचनांच्या आश्रयानें बोलावयाचें, कॉलेजचे विद्यार्थी असले तर आधुनिक दृष्टीकोनाच्या दृष्टीनें बोला-

धयाचें, श्रोते कोणी अर्थवादी असले तर धयाच्या दृष्टीनें बोलावयाचें, सनातनी समाज असला तर आपण जसेच्या तसे राहिलों आहोंत आणि आपल्या चालीरीतींत आणि धर्मकल्पनात यत्किंचितही फरक पडला नाहीं असें मानणें म्हणजे केवळ भ्रम आहे, हें उदाहरणानीं दाखवून द्यावयाचें, शास्त्री पंडितांशीं प्रसंग असला तर स्मृतींतील वचनें आणि आर्यधर्मांतील उदार तत्त्वज्ञान यांच्या आधारानें बोलावयाचें, डिप्रेस्ड समाजच असला तर त्यांना दीनता, नागरिकत्वाचे हक्क मात्र करून घेण्याची आवश्यकता, व्यसनापासून निवृत्ती इत्यादिकासंबंधानें बोलावयाचें अशी वहिवाट मी ठेवली होती समकालीन लोक किंवा पुढल्या काळांतील लोक कितपत माहितगारानें बोलतील याचा अदाज मला करवत नाहीं. परंतु, हा प्रश्न सोडविण्याची महाराष्ट्रांतल्या ज्या लोकांनीं खटपट केली असेल, त्या लोकांच्या रांगेंत ते मला कुठेंतरी बसवितील असा माझा अदाज आहे

अस्पृश्यतानिवारक मंडळाच्या धोरणासंबंधानें सर्वच लोकांत एक तऱ्हेची अप्रियता असे आणि याचें कारण इतकेंच कीं, या लोकांच्या ज्या ठरलेल्या पठडी होत्या त्यांच्याहून कांहीं तरी निराळें आमचें मंडळ बोलत असे सनातनी समाजाला असें वाटे कीं हें काम केवळ वाटेपणाचें आहे, आणि जरी हे पूर्वींच्या साधुसंतांच्या आणि धर्मसुधारकांच्या वाङ्मयाचा आश्रय घेत आहेत व म्हणून यांचें बोलणें जरी लक्ष देण्यास पात्र असलें तरी आपला मूळचा मुद्दा आपण सोडला उपयोगाचा नाहीं कारण शास्त्राप्रमाणें आणि आपल्या भावनेप्रमाणें अस्पृश्यता टिकलीच पाहिजे जुन्या पिढीतील सुधारकांनीं अस्पृश्यता निवारण, जातिभेद, आहारविहार, विवाहसुधारणा या सर्वांची गल्लत करून बोलण्याचा परिपाठ ठेवला होता आणि त्याला यांतील एका गोष्टीची सुधारणा हवी असेल त्याला आपल्या बाकीच्या सुधारणा मान्य झाल्याच पाहिजेत आणि तरच तो खरा सुधारक असा त्याचा आग्रह असे आणि डिप्रेस्ड लोकांना तर असें वाटे कीं, हा गृहस्थ काम पुष्कळ करतो हें खरें, पण हा जुन्या समाजावर तुटून पडत नाहीं, आणि आपल्या बाजूनें मत सांगताना जालीम एकांतिकपणा दाखवीत नाहीं, व म्हणून तेहि मनांतून नाखूषच असत. परंतु याला आमचा कांहीं इलाज नव्हता. हिंदुसमाजाच्या पोटांत राहूनच म्हणजे एखादा नवा पंथ न काढतां हें काम करतां येईल असें आमचें मत

आहे जुनी प्रत्येक गोष्ट टाकाऊ आहे आणि म्हणून तिच्यावर हल्ला चढविला पाहिजे असें आम्ही समजत नाहीं. जुनी संस्कृति ही उपेक्षेला किंवा अवहेलनेला सदैवच पात्र आहे असें आम्हाला वाटत नाहीं. सारासार विवेकानें आणि आपली बुद्धि चालवून जुन्या संस्कृतींतील ज्या गोष्टी ठेवून घ्यावयास हव्यात त्या ठेवून घेतल्याच पाहिजेत व ज्या नवीन घ्यावयाच्या त्या नीट तपासून घेतल्या पाहिजेत असें आम्ही आग्रहानें म्हणतों आणि याच आमच्या मताला सनातनी सुधारक हें नाव मी दिलें अनेक लोकांनीं या शब्दपद्धतीची टवाळी केलेली आहे. परंतु ते जेव्हा गंभीर विचाराला प्रवृत्त होतील तेव्हा त्यांना कळून येईल कीं या पद्धतीला फारच मोठा अर्थ आहे माणसांना विचाराच्या गुंतागुंतीचा फार लवकर कंटाळा येतो आणि चांगल्या वाईटाचा झालेला संकर निवडण्याचें काम त्यांना नकोसें होतें त्यांना कांहींतरी निकालाच हवें असतें, मग तें किती का एकांतिक असेना! परंतु, सुधारणापर्वांत येवढा कडकडीत निकाल पुन्हा पुन्हा लागू शकत नाहीं आणि वाईट मतें तेवढीं जुन्या लोकांच्या प्रतिभेला व चांगलीं मतें मात्र नव्या लोकांच्या प्रतिभेला स्फुरलीं असें तर खचितच झालेलें नसतें म्हणून अस्पृश्यतानिवारण म्हटलें तरी मागचानें ताडकन् जुन्याशीं कांहींमोडच केली पाहिजे व सर्वच सांस्कृतिक कल्पनांवर एकदम दंडा उगारला पाहिजे ही भूमिका तर्काला विमुख आहे असेंच आम्ही मानतों. या धोरणानें आमच्या मंडळाचें काम चालू असल्यामुळें आमच्या संघाचें ममत्व कोणच्याच पक्षाला फारसें उत्पन्न झालें नाहीं ही गोष्ट अगदीं खरी आहे

फार तपशीलानें लिहावयाचें नाहीं असें ठरलेलें असल्यामुळें आणखी एकच परिच्छेद लिहून विषयाची ही बाजू संपवितों मी हा सगळा उद्योग खरी मनोभावें, अंग मोडून आणि सर्व प्रकारचें शक्तिसर्वस्व खर्च करून करीत होतों, तरी पुढं डिप्रेस्ड समाजातही माझ्या प्रयत्नासंबंधानें अवहेलनेची बुद्धि बाळगणारे पुष्कळ लोक होते आणि स्पृश्य समाजांत तर, कांहीं थोडेसे आरपे पाईक लोक सोडले तर, कोणी माझ्याकडे उपेक्षेनें पहात, कोणी तुच्छतेनें पहात, हा भ्रमकार माजविणारा आहे असें कोणी समजत, व अधिकार नसतांना यानें भलत्याच कामाला हात घातला आहे असा ऐट कोणी आणीत. परंतु थोड्या वर्षांतच हें सारं मी पचविलें होतें असें दिसून येऊं लागलें कीं डिप्रेस्ड लोकांना त्यांचे स्वत चेच खुद पुढारी मिळाले न हेत, स्पृश्यसमाजाचे

पुढारी एकांतिक आणि निर्वाणीची भाषा बोलू लागले आहेत; या कामात करावे लागणारे प्रत्यक्ष शरीरकष्ट माझ्याच्याने पहिल्यासारखे होत नाहीत, आणि शेवटीं, सर्व करावयास लागणारा पैसा रसत. मिळविणें हें अशक्य होत आहे. तेव्हां मी आपण होऊन या प्रश्नांतून बाहेर पडलों, कारण जेथें आपली जरुरी नाहीं तेथें ओझें देऊन रहाणें, किंवा एकांतिकपणें बोलणाऱ्या स्पृश्य पुढाऱ्यांनीं पुकारलेलीं मतें माथ्यावर घेऊन गावांत सांगत सुटणें हें माझ्याच्यानें होण्यासारखें नव्हतें. अलीकडे अलीकडे मात्र हिंदुसमाजाच्या मनात माझ्याविषयीं पुन्हा अनुकूल फरक पडू लागला आहे! जे पूर्वी विद्यार्थी होते, ते आता पुढारी बनलेले आहेत, त्यांना माझीं मतें, माझ्या कार्यपद्धति आणि मी केलेले श्रम हीं पूर्णपणें व सबळून माहीत झालेलीं होतीं अर्थात् ते जेव्हां जेव्हां बोलवितील तेव्हां तेव्हां जें कोणचें वैचारिक सहाय्य मला करता येईल तेवढें मी अजूनही करीत असतों.

या अस्पृश्यतानिवारणाच्या खटपटींतूनच एक निराळी संस्था मला काढावी लागली. तिचें नाव समाजविचारमंडळ. अस्पृष्टांच्या प्रश्नाचा विचार करीत असतांना मला एकंदर हिंदु समाजाच्या संबंधानें पुष्कळच वाचन करावें लागलें प्रांतोप्रांताच्या तमाम लोकांची पहाणी त्या त्या ठिकाणच्या सरकारनें केली व प्रत्येक प्रांताच्या प्रत्येक जातीविषयीं इत्थंभूत माहिती देणारे मोठमोठाले ग्रंथ त्या त्या प्रांताच्या सरकारनें प्रसिद्ध केले याला आज कित्येक वर्षे होऊन गेलीं आहेत ज्याला हिंदुसमाजाचा अभ्यास करावयाचा असेल त्यानें हें वाङ्मय वाचलेंच पाहिजे त्याप्रमाणेंच अठरानें एकाहत्तर सालापासून जे शिरगणतीचे रिपोर्टस प्रसिद्ध झाले आहेत तेहि फार उद्बोधक माहितीनें गडगंज भरलेले आहेत यांचेंहि वाचन तितकेंच अवश्य आहे. अस्पृष्टांचा प्रश्न पहातां पहातां हिंदु समाजातील जातिसंस्था, शुद्ध हिंदुधर्म, इत्यादिकांचें सूक्ष्मावलोकन करणें मला प्राप्तच झालें. आणि म्हणून धर्मशास्त्राचे मुख्य मुख्य ग्रंथ, महाभारत व आताच सांगितलेले जातिविषयक ग्रंथ, शिरगणतींचीं इतिवृत्तें आणि अनेक युरोपियन लोकांनीं हिंदुसमाजाविषयीं लिहिलेले ग्रंथ यांचा अभ्यास करणें हें केव्हां हौस म्हणून आणि केव्हां अवश्य म्हणून आपोआपच घडून आलें. या ग्रंथांत मिळालेली माहिती, आलेलीं मतें, व यांच्या विचारानें मला काढता येण्यासारखीं अनुमानें हीं

समाजाच्या पुढे मांडण्याचा उपक्रम मी सुरू केला शिवाजी मंदिर हें आमचें मुख्य व्यासपीठ होतें! आमची जातिसंस्था, आमची ग्रामसंस्था, अमेरिकेंतील जातिभेद, आमचा आहार, युरोपियन लोकांनीं केलेल्या जातिसंस्थेच्या मीमांसा अशाप्रकारच्या विषयावर मी पंचवीस तीस तरी व्याख्यानें सहज दिलीं असतील. यांच्याच अनुषंगानें न्या. रानडे यांचे सामाजिक आणि धार्मिक विषयावरचे ग्रंथ आणि सामाजिक परिषद निघाल्यापासून महाराष्ट्रांतील थोर थोर सुधारकांनीं समाजसुधारणेसंबंधानें आणि धर्मासंबंधानें प्रगट केलेल्या विचारांचे सामाजिक परिषदेनें प्रसिद्ध केलेले रिपोर्टस यांचेंहि अध्ययन मला करावें लागलं व त्याच्या आधारानें या समाजविचार मंडळांत मला जें काय मतें सांगता आलीं तीं मी सांगू लागलों.

ज्या कामांत अस्पृश्यांचा प्रत्यक्ष संबंध येत नसेल, पण ज्याला सामाजिक महत्त्व मात्र आहे, त्या कामाच्या खटपटी समाजविचार मंडळातर्फे कांहीं सहकाऱ्यांच्या साहाय्यानें मी करू लागलों हे सहकारी मुख्यत माझ्या विद्यार्थीवर्गांतूनच पुढें आलेले असत ज्यांना अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न इतकासा महत्त्वाचा वाटत नसे, पण हिंदुसमाजाची ज्यांना थोडीबहुत काळजी वाटे, ते लोक या समाजविचार मंडळांत मोठ्या आस्थेनें काम करीत या दिवसांत मी जीं अनेक प्रकारचीं टिपणें करून ठवलीं त्यांचा मला अजूनही उपयोग होत आहे शंकराचार्यांचे वाद, शारदाविलाचा वाद, ब्राह्मण समाजासंबंधींचे वाद, येथील सनातन धर्माभिमानी मंडळींनीं उत्पन्न केलेले वाद, येथें किंवा बाहेर भरणाऱ्या ब्राह्मण सभा, हिंदुधर्म सभा यांत उद्भवणारे वाद हे रोखावयास आणि सुधारणेची बाजू, समाजापुढें मांडावयास या समाजविचार मंडळाचा उपयोग आम्हाला होत असे बऱ्याच तरुण लोकांच्या समूहापुढें या सर्व विषयांच्या संबंधानें मी दर रविवारीं तप शीलवार बोलण्याचा क्रम ठेवला होता, आणि या कामीं मतें सांगण्यापेक्षा तरुण लोकांना माहिती जास्त सांगावी यावर माझा कटाक्ष असे माहिती पेक्षा माणसांना मतच जास्त असतात, आणि म्हणूनच तीं पुष्कळदा चुकीचीं ठरतात माहिती जर भरपूर असली तर अनुमानें काढावयास फारसें शहाणपण लागत नाहीं. निदान एखादें मत लवकर समजावयास या माहितीचा उपयोग फार होतो म्हणून या तरुण लोकांना मी मतें फारशीं सांगतच

नसे. शिवाय येवढ्या लहान वयात मोठमोठ्या विषयाच्या संबधानें मतें ठाम करून टाकणें हें त्या तरुण लोकांच्या मनाच्या वाढीच्या दृष्टीनें सुद्धा गैरच झालें असतें. पण मी असें एक पाहिलें आहे कीं, या आमच्या समाजविचार मंडळात अनेक वर्षें टिकून रहाणारे तरुण लोक मला भेटले नाहींत. कोणी अभ्यासाच्या शाखाच बदलत, कोणी नोकरी धरीत, कोणी स्थलांतर करीत, पण मुख्य म्हणजे बौद्धिक अभ्यासाला कंटाळणारे लोक फार. ते प्रसंगोपात्त उत्पन्न झालेल्या एखाद्या खटपटींत सामील होतील, पण टिपणें काढणें, निरनिराळ्या माहितींची तुलना करणें, अर्थसिद्धि सांठी कोश उपयोगात आणणें आणि शेवटीं खरें म्हणजे शुद्ध ज्ञानाच्या अभ्यासाची लज्जत धरणें हे गुण फार थोड्यांच्या अंगीं असतात. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे आणि श्री रा. ना. नातू हे दोनच तरुण लोक असे आढळले कीं त्यांच्या ठिकाणीं आताच सांगित लेले सर्व गुण उत्पन्न झालेले आहेत. हे लोक कोणचीं मतें पत्करतील व तीं सांगतील वगैरे हें मला सांगता येणार नाहीं. पण ते अभ्यासू पंडित होतील यांत काहींच शंका नाहीं.

अभ्यास हें या समाजविचारमंडळाचें एक प्रमुख अंग होतें, म्हणून केवळ या अभ्यासासाठीं एखाद्या जातीची बारकाईनें पहाणी करावी असें आम्हीं ठरविलें. जातीची पहाणी करणें, हें फार अवघड काम आहे. त्या त्या जातीं तील माणसाचें परिपूर्ण सहाय्य असल्याशिवाय हें काम कधींही तडीस जावयाचें नाहीं. आमच्या येथें असें आहे कीं कुणाला काहीं थोडी माहिती विचारावयास जा, कीं तुम्ही कोण आम्हाला विचारणार असा प्रश्न त्यानें केलाच म्हणून समजावें, म्हणून त्यातल्या त्यात पुढारलेल्या जातींपैकीं एखादी घ्यावी असा विचार आम्ही आपल्या मनाशीं ठरविला. अस्पृश्यतानिवारक मंडळ आणि समाजविचारमंडळ, या आमच्या दोनही मंडळांत प्रभु ज्ञातीतील विद्यार्थी पुष्कळ असत आणि चळवळींत प्रत्यक्ष सहकार्य करणारे या जातींतील कितीतरी तरुण लोक मला लाभले होते. प्रभुज्ञात ही संख्येनें लहान पण उत्तम सुशिक्षित आणि माझा मित्रपरिवारही या जातींत मोठा. म्हणून याच जातीची पहाणी करण्याचा बेत मी मनाशीं केला. परंतु माझे प्रभुमित्र आणि सहकारी कै. नानासाहेब शिंदकर यांनीं मला सांगितलें कीं हें काम यशस्वी व्हावयाचें नाहीं. तुम्हाला ही माहिती प्रभुज्ञातीकडून मिळावयाची नाहीं. दें

त्याचें म्हणणें मला खरें वाटलें. कारण प्रभु अभ्यासकांनीं जर ब्राह्मण समाजातील पहाणीचा बेत केला असता तर ब्राह्मण समाजातील लोकांनींसुद्धां त्यांना ही माहिती खचितच दिली नसती. अभ्यासकाची भूमिका ही जातिनिरपेक्ष असूं शकते हे ब्राह्मणांच्या जातीतही मला आढळून आलें नाहीं! अर्थात् नानासाहेबांनीं निम्म सहा मी प्रमाण मानला आणि ब्राह्मण समाजाची पहाणी करण्याचें ठरवलें. घटना, मूळवस्ती, कुलगोत्र, शाखाप्रवर, इतिहास, इतिहासातील महत्त्व, अभ्यास, आर्थिक स्थिति, सध्याचे व्यवसाय, स्त्री पुरुष मुलें यांची संख्या, मुलांच्या वयांतील अंतर किमान इ. अनेक प्रश्नांच्या अनुषंगानें चिंतन व चर्चा करून आम्ही एक प्रश्नावलि तयार केली. वास्तविक पहाता या प्रश्नावलींत आक्षेपार्ह असें कांहीं नव्हतें. एवढी गोष्ट मात्र खरी कीं कांहीं ठराविक मतांच्या लोकांना या कामांत पुढारीपण किंवा महत्त्व देऊन मगच सुरुवात करावयास हवी होती. पण, तें करण्याची आवश्यकता मला पहिल्यानें तरी वाटली नाहीं. येथील सनातनी मंडळींनीं आणि त्यांच्या सुशिक्षित पुढाऱ्यांनीं—आणि यांतील कांहीं तर वर्तमानपत्रकर्ते देशभक्त म्हणूनही गाजलेले होते—आमच्या योजनेला अगदीं निकराचा विरोध केला. आम्ही आखाडा तर पुरा मोठा मांडला! आमचा नेमका हेतु कोणता आहे, ही योजना निरपवाद कशी आहे, या अभ्यासाची उपयुक्तता किती आहे, आपल्याकडे आलेलीं पत्रकें कशीं भरून द्यावीं इत्यादि विषयाची समजूत घालून देण्यासाठीं घराघरास पोक्त वयाचे वक्ते निवडले आणि पेठापेठांतील देवळांतून त्यांची व्याख्यानें करविलीं. पण आम्ही जों जों जास्त यत्न करूं लागलों तों तों विरोधकांनाही जास्त जोर चढला आणि होता होता हें काम यशस्वी होणार नाहीं असें मला स्वच्छ दिसूं लागलें. पुढें बरेच दिवस गेल्यानंतर श्री. कृष्णराव मराठे यांनीं येथील ब्राह्मण सभेच्यामार्फत टुमणें लावलें कीं “तुम्ही कांहींच करीत नाहीं, ब्राह्मणसमाजाची पहाणी करणें हा फार महत्त्वाचा विषय आहे व म्हणून तें काम तरी तुम्ही हातीं घ्या” सभेनें हें मान्य केलें. पण, प्रत्यक्ष काम करणार कोण हा काय तो नेहमीं प्रश्न असतो! तेव्हां कृष्णराव यांनीं सुचविलें आणि सभेनें पसंत केलें कीं हें काम माटे यांच्या हातीं द्यावें. मग आम्हांला पुन्हां एकदां स्फुरण चढलें. कै. प्रो. नाईक, कै. नानासाहेब आगाशे, बाबासाहेब पोतदार, कलागृहाचे श्री. शंकर-

राव दाते, मी स्वतः, कृष्णराव मराठे, इत्यादींचें सहकार्य सुरू झालें. आमच्या जुन्या प्रश्नावलींतील आशिर्वाईता-कांहीं अश्लील तर-या पोच लोकांनीं काढून टाकली व नवी प्रश्नावलि तयार झाली. आणि पुन्हा प्रचाराचा धूमधडाका सुरू झाला.

परंतु यांहि कामांत पुन्हा एक विघ्न आलें. ब्राह्मण-समाजात पोटजाति आहेतच. ऋग्वेदी देशस्थाचे पुढारी म्हणाले कीं, आम्ही आमची पहाणी स्वतंत्रपणें करणार आहों. यजुर्वेदी देशस्थांनीं सांगितलें कीं अमुक एका जातीला जर तुम्ही ब्राह्मणांत धरणार असाल तर आम्ही सहकार्य करणार नाहीं. ती लहानशी जात मात्र आमच्या या कामाकडे फारच ममतानें पहूं लागली. आमची अगदीं मूळची योजना दशविध ब्राह्मणाच्या पहाणीची होती. सारस्वत ब्राह्मणाच्या कांहीं पुढारी मंडळींनीं आपला नकार आम्हांला मागेंच कळविलेला होता. अर्थे होता होता कोंकणस्थ व कऱ्हाडे हे दोन प्रकारचे ब्राह्मण शिल्लक राहिले! त्यांत पुन्हां आणखी एक तट पडला. पुणें शहरांतील ते जे जुने खानदानीचे सरदार लोक, श्रीमंत लोक, त्यांना या पहाणीची काय जरूर असणार! अर्थात् त्यांनीं हा प्रश्न धुत्कारूनच लावला. शिवाय, जीं गरीब कुटुंबें, त्यांना तर या पहाणीचें महत्त्व मुळांतच कळेना. जे विशेष विद्वान् कॉलेजांत शिकवणारे, पंडित म्हणून प्रसिद्ध त्यांना वाटलें कीं ही मंडळी कोण! हे लोक कांहीं आपल्या तोलाचे नाहींत म्हणून त्यांनींहि उपेक्षाच केली. वास्तविक पहातां, मी कदाचित् सामान्यापेक्षां असेन, पण नाईक आगाशे, पोतदार हे कांहीं सामान्य लोक नव्हते. पण या विद्वानांनीं केवळ गुर्मीवरच आम्हांला दूर ठेवलें. रहातां राहिले मध्यम प्रतीचे या दोन जातीचे लोक! यांच्याकडे पत्रिका गेल्या परंतु, या कामाची कांहींच आस्था नसल्यामुळें दोनदोनदां तीनतीनदां पत्रिका देण्याचा. कांहीं लोकांनीं प्रसंग आणला. माहिती गुप्त ठेवण्याची अगदीं काटेकोर व्यवस्था केलेली होती. भरून आलेली माहिती कोष्टकरूपानें लिहून काढण्याचें काम मग मी सुरू केलें. सुमारें सहाशेंवर ताव या कोष्टकांनीं भरले. बेरजा करून सरासऱ्या काढल्या आणि समितीकडे रिपोर्ट सादर केला. पण रिपोर्ट सादर करतांना निघालेल्या सरासऱ्यांवरून मला जीं अनुमानें काढावींशीं वाटलीं तीं हि मी लिहून दिलीं. पुढें कमिटींत असा सूर निघाला कीं हे तरुण लोक आपल्याला हवीं आहेत तशीं

अनुमानें काढतात म्हणून पोक्त लोकांच्याकडे हें काम सोंपवावें. श्री. यशवंत-राव दाते आणि चिंतामणराव कर्वे यानीं काढलेलीं अनुमानें आमच्यासारखींच होतीं. पण ते जे पोक्त लोक त्यांचीं अनुमानें लवकर निरेखनात त्यांच्या घरीं खेटे घालणें हा माझा एक धंदाच बनला. शेवटीं एका अगदीं अस्सल सनातनी विद्वानाकडे हें प्रकरण गेलें. त्याना सगळें जगच चुकलेलें आहे व म्हणून तुच्छ आहे असें म्हणण्याची सवय आहे. त्यांनीं या लोकांना कळविलें कीं, या कामातील बेरजा चुकीच्या आहेत मग एक डॉक्टर महाशय या उद्योगात शिरले शेवटीं कै. नाईक हे मोठे गणिती आणि समधात विचाराचे होते म्हणून त्यांनीं याचा विचार करावा असें ठरलें महिन्यामागें महिने गेले तरी या कामाला हात घालावयास नाइकाना उसतच होईना. पुढें हॉटगाचें प्रकरण उद्भवलें काहीं दिवसांनीं नाईक दिवगत झाले. माझ्या घरीं असलेल्या त्या हजारों पत्रिकाचा गठ्ठा मी कृष्णराव मराठ्यांच्या कडे रवाना केला पुढें त्या वस्याचें आणि गठ्ठ्याचें काय झालें तें देवाला माहीत ! मी स्वत आणि माझ्या विद्यार्थ्यांनीं महिनोन्महिने केलेले सगळे श्रम अगदीं पाण्यात गेले

एक गोष्ट मात्र मला सांगितली पाहिजे पत्रिका भरून देण्यात ब्राह्मण समाजानें जी आस्था दाखविली ती केवळ अनुकरणीय होय. मी विस्तार करीत बसत नाहीं पण ती पाहिल्यानतर ब्राह्मण जातीच्या पुढारलेपणा-बद्दलचा माझा भ्रम अगदीं नाहींसा झाला युरोपातील लोक अशा प्रकारच्या पद्धतीला माहिती पुरविताना जी आस्था दाखवितात ती पाहिली म्हणजे त्यांच्या प्रगतिपरत्वाचें खरोखर नवल वाटतें ब्राह्मण जात पुढारलेली असेल, पण ती हिंदुसमाजातील इतर जातींच्या मानानें पुढारलेली आहे इतकेंच या जातीचें मन केवळ राजकारण ग्रस्त आहे असो आमच्या पहिल्या वाचा गेलेल्या प्रयत्नाच्या वेळीं पुणें शहरातील पन्नास डॉक्टराना आणि पचवीस वैद्याना रोग्याची माहिती एकत्र करण्याची विनती केलेली होती. आणि ती गुप्त ठेवण्याची सगळी योजना त्याना कळवलेली होती. त्यात मला दोन डॉक्टरानीं आणि एका वैद्यानें अनुकूलता दर्शविली बाकी सर्व उत्तर पाठविण्याचें सौजन्य सुद्धा कोणी दाखविलें नाहीं. समाजविचार मडळाच्या बारीकसारीक कामाविषयीं आता लिहीत नहीं स्त्रियाची अमद्र निंदा करणारीं नाटकें बद करणें, जातिविद्वेष माजविणाऱ्या कपन्याविरुद्ध सर

कारांत खटपट करणें, अशा वारची कितीतरी सामाजिक महत्त्वाचीं कामें आम्ही त्या वेळीं केलीं असतील. आमच्या समाजविचार मंडळाच्या अनेक कामां तील एकाची हकिगत येथें देतों. आधुनिक काळांत सामाजिक सुधारणे संबंधानें ज्या ज्या कल्पना पुढें येतील, त्या त्या सर्वांना विरोध करणें हें आपलें काम आहे असें समजणारे बरेच सनातनी लोक पुण्यांत आहेत. हे लोक आपले विरोध दाखवीत, परंतु त्यांना आधुनिक शास्त्राचा आधार हवा होता. हा आधार पुरविण्याचें काम येथील कांहीं सुशिक्षित लोकांनीं चालू केलें! जातिभेद कमी करण्याचा मुद्दा असो, पुनर्विवाह करण्याचा मुद्दा असो, मुलांना देवी टोंचण्याचा मुद्दा असो, कोणताहि नवा विचार पुढें येवो, त्याला विरोध करण्याचें सनातनी समाजाचें धोरण भौतिक शास्त्राच्या दृष्टीनें बरोबर आहे असें कसें ना कसें सिद्ध करून देण्याचा या मंडळींनीं विडाच उचलला. यांच्यातील एक दोघे मूळचे खरोखरच बुद्धिमान आहेत. त्यांचें वाचनही दांडगें आहे आणि धारणाही मोठी आहे. परंतु, या सर्व शक्तींचा उपयोग त्यांनीं आताच सांगितलेल्या गोष्टींकडे करण्याचें धोरण ठेविलें यामुळें त्यांचे आणि आमचे नेहमींच वाद चालत. एकदा असें झालें कीं, शारदा कायदा होण्याच्या आधीं मुलींचें लग्न कोणत्या वयाच्या आंत होणें उपयोगाचें नाहीं, याची शहानिशा करण्यासाठीं सरकारनें एक कमिटी नेमली होती. या कमिटीच्या कामासंबंधानें सर्व देशभर जोराची चर्चा चालू होती वर सांगितलेल्या सनातनी मंडळींनीं आणि त्यांच्या पाठिराख्या भौतिक शास्त्रवेत्त्यांनीं असा आग्रह सुरू केला कीं आठ वर्षांची जी पूर्वींची मर्यादा सांगितलेली आहे तीच बरोबर आहे बारा वर्षांपर्यंत मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा आणणें हें आधुनिक शास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां अगदीं चूक आहे. युरोप अमेरिकेंत सुद्धां बालविवाह करण्याचीच प्रवृत्ति वाढत आहे आणि तिकडील मोठमोठाले शास्त्रज्ञ याच मताचे आहेत. फॉरेस सॉंडर्स असें म्हणतो, बर्ट्रॅंड रसेल तसें म्हणतो, हॅवलॉक एलीस असें म्हणतो, फ्रॉइड तसें म्हणतो अशी शास्त्रज्ञांच्या नांवाची आणि त्यांच्या अभिप्रायाची बरसातच या लोकांनीं चालू केली. शास्त्रज्ञांचींच नांवें घेतलीं आणि त्यांचींच वचनें उद्धृत केलीं म्हणजे लोक अपोआपच विचकतात आणि मूळ ग्रंथांत तीं तीं वाक्यें कोणत्या संदर्भानें आलीं होतीं हें पाहावयास तर कोणीच जात नाहीं, हें या लोकांना

ठस माहीत होतें. अर्थात्‌च त्यांच्या या शास्त्राच्या देण्यामुळें स्त्रियांच्या बाबतींतल्या त्यांच्या कुग्राम मतांना मोठीच मान्यता मिळण्याचा संभव उत्पन्न झाला. एकदा तर या मंडळींच्या शास्त्रवेत्त्यांनीं असें चक्क सांगितलें कीं मुलींचें वय बारा वर्षांचें झालें म्हणजे त्यांच्या मनःफलकावर परपुरुषाचीं प्रति-बिंबें उमटूं लागतात आणि हाहि एक व्यभिचारच आहे. येथें शास्त्रज्ञानाचा अगदीं कळस झाला असें आम्हांला वाटूं लागलें. शास्त्रसंदर्भ पुरविण्याच्या कामीं या लोकांची पाठशिवणी करणें हें थोडक्या वेळांत सर्वथा अशक्य होतें. मला असें वाटे कीं, यांच्या या बालिश कल्पना भौतिक शास्त्रांना मान्य नसल्या पाहिजेत. पण, हे ज्या नाना प्रकारच्या शास्त्रांचीं आणि ग्रंथांचीं नांवें देत, त्यांचें सत्य ताबडतोब तपासून पहाणें हें आता सांगितल्याप्रमाणें अशक्य होतें म्हणून मी एक निराळाच इलाज योजला. या लोकांचें म्हणणें मी लिहून काढलें आणि युरोपातील निरनिराळ्या शास्त्रज्ञांकडे तें पाठवून दिलें व त्यांना विचारलें कीं, आपल्या नांवावर हीं मतें येथें विकलीं जात आहेत तर अशा गोष्टी यांत कितपत सत्य आहे? थोडे दिवसांनीं मला उत्तरें येऊं लागलीं. कॉन्सॉडर्स, हॅवलॉक एलीस, बर्ट्रंड रसेल म्हणजे ज्यांचीं नांवें या लोकांच्या जिव्हाग्रावर नेहमींच असत अशा सारख्या सहा मोठमोठ्या शास्त्रज्ञांचीं उत्तरें माझ्याकडे आलीं. त्यांत त्यांनीं वर सांगितलेल्या लोकांच्या मताचा स्पष्ट इन्कार केला. बालविवाह हा आम्हांला मुळींच मान्य नाहीं असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें. आणि बारा वर्षांच्या मुलीच्या मनःफलकाचें हें एक अभिनव ज्ञान यांनीं प्रसृत केलें होतें, तें आम्हांला माहितहि नाहीं आणि मान्यहि नाहीं असें त्यांनीं स्वच्छ लिहिलें. मग मी पाठविलेलें सूक्तपत्र, व त्याला आलेलीं या शास्त्रज्ञांचीं उत्तरें हीं भाषांतरासह 'रत्नाकर' मासिकांत सटीक प्रसिद्ध केलीं. आपल्या किल्ल्यावर हा अगदीं अनपेक्षित बाजूनें आलेला भलताच हल्ला पाहून आपले हे तोतये शास्त्रज्ञ अगदीं गडबडून गेले आणि लोकांचीही खात्री होऊन चुकली कीं या लोकांचे शास्त्राधार आपण जरा जपूनच ऐकावयास हवे.

माझ्या सार्वजनिक कामांतील तिसरें महत्त्वाचें काम म्हणजे ग्रंथरचनेचें होय. १९३० सालीं केसरी पत्राला पन्नास वर्षें पुरीं होत होतीं त्या वेळीं या पत्राचा सुवर्णमहोत्सव करावा अशी कल्पना केसरीच्या अभिमानी लोकांत निघाली

लो. टिळक दिवंगत झाल्याला दहाच वर्षें झालीं होतीं. पण ते अजून जिवंतच आहेत असें वाटण्याइतपत त्यांची स्मृति महाराष्ट्रांत जिवंत होती. श्री. तात्यासाहेब केळकर यांनी म. गांधी यांच्याशीं मोठा जोराचा झगडा केसरी पत्रांतून या काळांत केलेला होता आणि म. गांधींची लोकप्रियता जरी भरा-भर वाढत चालली होती तरी महाराष्ट्रांतील लोकांचें केसरीवरचें प्रेम अबाधित राहिलें होतें. उत्सवांत ज्या अनेक गोष्टी करावयाच्या त्यांत एक ग्रंथ कर-ण्याची कल्पना निघाली. या वेळेपर्यंत टिळक पक्षांतील लोकांत मला थोडा बहुत मान उत्पन्न झालेला होता आणि लेखक म्हणूनहि माझ्यासंबंधीं बरें मत बनलें होतें. होतां होतां हा ग्रंथ तयार करण्याचें काम माझ्याकडे आलें. ग्रंथाच्या आरंभीं पांच संपादकांचीं नांवें घातलीं आहेत हें खरें, परंतु, त्याच्या संपादनाची सर्व जबाबदारी माझ्याकडेच आली. हा समारंभ केसरीच्या वाचक वर्गातर्फे व्हावयाचा होता व म्हणून खुद्द केसरी संस्थेचा या कामांत फारसा संबंध रहावयाचा नाहीं असें ठरलें होतें. श्री. अण्णासाहेब भोपटकर हे आमचे पुढारी होते. या माणसाच्या अंगीं धडाडी आणि रेटकपणा हे गुण फार मोठे आहेत. उत्सवाची बाकीची तयारी त्यांनीं मोठ्या हिंमतीनें चालू केली, पण माझ्याकडे सोंपविलेल्या कामांत नसती ढवळाढवळ त्यांनीं कधींहि केली नाहीं. कै. लोकमान्य आणि केसरी यांच्यासंबंधानें केवळ निष्ठापर किंवा अभिनंदनपर असे लेख या ग्रंथांत घालण्याचें मीं अगदीं नाकारलें, आणि ग्रंथाची कल्पनाच निराळी बांधली. जेवढे विषय आधींच्या पन्नास वर्षांत केसरींत येऊन गेले होते तेवढ्यासंबंधानें जी जी माहिती किंवा जीं जीं मतें केसरींत आलेलीं होतीं तीं सर्व साररूपानें या ग्रंथांत यावीं अशी योजना आम्हीं ठरविली. परंतु हें व्हावयास हवें तर पन्नास वर्षांच्या फायलींत एका एका विषयावर कोठें कोठें लिहिलें आहे हें पहाणें भाग होतें, म्हणून सबंध पन्नास वर्षांत केसरींत आलेल्या विषयांची सूचि करण्याचें काम ठरविलें. श्री. श्रीपाद रामचंद्र टिकेकर या कष्टाळू माणसाच्या हाताखालीं चार महिने हें काम चाललेलें होतें. मग या सूचीवरून एकेक विषय कोठें कोठें आलेला आहे त्याच्या याद्या तयार केल्या, तेव्हां दिसून आलें कीं एखादेच महत्त्वाच्या विषयावर तरी केसरीनें उत्कृष्ट लिखाण केलें आहे आणि तें स्मरणांत पात्र आहे. एकेक विषय एकेकानें घ्यावयाचा तर इतके लेखक या

ग्रंथाच्या कामात प्रविष्ट व्हावयास हवे होते. कै. टिळक, श्री. तात्यासाहेब केळकर आणि केसरी ह्यांची लोकप्रियता येवढी की, मी ज्या ज्या लोकांना विनंती केली त्यांनी त्यांनी हे काम करावयाचे मोठ्या हौसेने पत्करले. शिरस्त अशी होती की लेखकाने कचेरीतच यावे, आपल्या विषयाचे सूचीतील सर्व उल्लेख मूळ फायलात उघडून पहावे, त्याचा अभ्यास करावा, टिपणे करावी व रिपोर्ट सकल्न करावे. बहुतेक लेखकांची टिपणे मी कचेरीतच ठेवून घेत असे. जमा झालेल्या लेखकांपैकी काही लेखक माझ्यापेक्षा अधिकाराने व पदवीने श्रेष्ठ होते. परंतु सर्व काम केवळ लोकशाहीच्या नात्याने आणि विना-मोबदला चाललेले होते. रोजरोज रोजरोज मी तर एक महिना रजाच घेतली होती.

या ग्रंथाचे नाव केसरीप्रबोध असे ठेविले. जे कोणी हा ग्रंथ काळजी-पूर्वक वाचतील त्यांना दिसून येईल की केसरीच्या पहिल्या पन्नास वर्षांतील महत्त्वाच्या सर्व लेखातील माहितीचे, मुद्यांचे व विचारांचे सकलन यात झालेले आहे. शाइन घा-या लोकांनी माझ्याशी उत्कृष्ट सहकार्य केले. उत्स-वाच्या बाकीच्या अगाशी प्रत्यक्ष कामाच्या रूपाने माझा फारसा संबंध नव्हता. परंतु ही एक नवीनच कल्पना बनवून हिंमतीने ती मला यशस्वी करून दाखविता आली, यामुळे माझ्या स्वत.च्या शक्तीचासुद्धा काहीसा नवा प्रत्यय मला आला. माझ्या हाताखालून शिकून गेलेले, पण आता चांगले विद्वान् बनलेले तरुण लोक, बौद्धिक व्यवसायात आपल्याशी फार उत्सुकतेने सहकार्य करतात हे दृष्टोत्पत्तीस आले. प्रस्तुतची हकिगत माझ्या कामासंबंधीची असल्या मुळे या कामातील अवांतर गोष्टी मी सांगत बसत नाही. पण एवढे मात्र खरे की अस्पृश्यता निवारणाच्या कामात त्या विषयातील उदात्तपणामुळे जसे शेकडो लोकांनी माझ्याशी सहकार्य केले तसे या सामुदायिक बौद्धिक व्यव-सायात पुरेसा आटोप जर आपण दाखविला तर अनेकांच्या सहकार्याने मोठाले उद्योग उरकता येतात हे मला व लोकांना दिसून आले.

यानंतर श्री तात्यासाहेब केळकर यांच्या एकसष्टीचा समारंभ आला. त्याही वेळी एखादा ग्रंथ प्रसिद्ध करावा अशी योजना ठरविली. केसरीप्रबोधाच्या रचनेमुळे, ग्रंथ करावयाचा म्हणजे ते काम माझ्याकडे यावयाचे हे ठरल्या-सारखेच होऊन बसले. केसरी-प्रबोधात ज्याप्रमाणे रा. टिकेकर यांचे त्याप्रमाणे केळकर ग्रंथात इतिहास-संशोधक श्री. शंकरराव जोशी यांचे

मला सहकार्य लाभलें. किंबहुना ग्रंथांतील मजकुराची निवड करण्याच्या दृष्टीनें शंकरराव जोशी यांनी माझ्यापेक्षांहि जास्त काम केलें. परंतु ग्रंथाची संपादकीय जबाबदारी सर्वस्वी माझ्यावर होती. ज्यांना केळकरांच्या वाङ्मयाचा अभ्यास करावयाचा असेल त्यांनीं या पुस्तकांत आलेले अनेक अधिकारी लेखकांचे लेख मुद्दाम अभ्यासले पाहिजेत. तसेंच केळकर यांच्या वाङ्मयाची पुरेशी ओळख ज्यांना करून घ्यावयाची असेल त्यांनीं या ग्रंथांत दिलेले वेंचे मनःपूर्वक वाचावे. केसरी-प्रबोधांत 'केसरीचा नवा संप्रदाय' आणि केसरीचे 'पांच संपादक' हे दोन लेख मी लिहिले आणि केळकर ग्रंथांत 'केळकरांचें राजकारण आणि वाङ्मय' यावर एक विस्तृत लेख लिहिला.

दरम्यान महाराष्ट्र सांवत्सरिकाची कल्पना रूप घेऊं लागली होती. श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या मनांत प्रचारकांना उपयोगी पडेल अशा माहितीचें एक डायरीवजा पुस्तक तयार करावयाचें होतें. घेतां घेतां ती कल्पना श्री. अण्णासाहेब यांच्या द्वारा माझ्यापर्यंत येऊन पोंचली. सार्वजनिक चळवळींत मीं बरेच दिवस घालवले असल्यामुळें मलाहि असल्या पुस्तकाची वाण भासतच होती. पण ती खिशांत ठेवण्यासारख्या रोजनिशीवजा पुस्तकानें भागेल असें मला वाटेना, म्हणून मीं एक फार मोठी योजना आखली. थोड्याशा चर्चेनंतर ती तात्यासाहेबांना पसंत पडली आणि मग आम्हीं कामाला प्रत्यक्ष सुरवात केली. याहि ग्रंथाच्या वेळीं एका हातीं कारभार ही माझी प्रास्ताविक अट होती. आपण कर कर करावें आणि आपल्या हातांतील कामांत जो फारसें लक्ष घालीत नाहीं अशा एखाद्या माणसानें ढवळाढवळ करावी किंवा त्याच्या शेवटच्या रूपाचा निर्णय करावा हें मला अगदीं आवडत नाहीं. कदाचित् हा माझा दोषहि असेल. आणि हा प्रघात मी जर पाडला नसता तर सामुदायिक अभ्यासाच्या रूपानें जी संकलनात्मक ग्रंथरचना मीं केली, ती कदाचित याहूनहीं चांगली झाली असती. झाली नसती असें निश्चयानें म्हणवत नाहीं. परंतु या प्रघातामुळें माझें काम अगदीं निर्वेध चाले आणि तात्यासाहेब केळकरांच्या सारख्या श्रेष्ठ साहित्यिकानें जेव्हां या ग्रंथाविषयीं फार पसंतीचे उद्गार काढले तेव्हां केवळ भरून पावलों असेंच मला वाटलें. केसरी-प्रबोध आणि केळकर ग्रंथ हीं कामें जशीं मी केवळ हौसेनें अंगावर घेतलीं तसेंच हें सांवत्सरिकाचें कामहि घेतलें. मोबदला

घेऊन काम करणें हा विचारीहि मला आतापर्यंत शिवला नव्हता. अस्पृश्यता निवारणाचें काम मी वीस वर्षें केलें, त्यांत मी जर तन-मन-धन यांपैकीं तिसऱ्या प्रकारानेंहि सर्वांत पडलों नसतों, तर मला त्या लोकसेवेची विशेष मातब्बरी वाटली नसती. आणि माझ्या चित्ताला समाधान लाभलें नसतें, परंतु तें भाग्य मला लाभल्यामुळें मला कोणाचें मिंधेपण आलें नाहीं. केसरी-प्रबोध आणि केळकर ग्रंथ यांच्या संपादनाच्या वेळीं संपादनाच्या कामाबद्दल मी एक पैहि घेतली नाहीं. टिळक, केसरी आणि केळकर यांचा मला विशेष अभिमान, म्हणून ही गोष्ट मी केवळ हौसेनें केली. सावरकरांच्या वेळींहि मला हेंच व्रत चालवावयाचें होतें परंतु तीसएकतीस सालापासून माझें व्रतच फिरल्यासारखें झालें आणि माझ्यावर प्रापंचिक आपत्ती फार मोठ्या आल्या. शेवटीं सावरकरांचें काम विनावेतन करून पुन्हा नव्या धनोत्पादनाला निराळा वेळ उरविणें मला शक्यच नव्हतें. तात्यासाहेबांचा तर मला पहिल्यापासूनच आग्रह होता कीं मी कांहीं घेत जावें. या माझ्या प्रापंचिक अडचणींमुळें मला माझें व्रत सोडावें लागलें. हें कामच टाकून देण्याऐवजीं हें व्रत तेवढ्या-पुरतें सोडावें असें मी ठरविलें. आणि ग्रंथ बाहेर पडून त्याची सर्व वजावाट होईपर्यंत म्हणजे सुमारें चौदा महिन्यांचा पगार मी या वेळीं घेतला. परंतु मनाविरुद्ध घेतलेल्या या मोबदल्याची चुटपुट पुढील दोन वर्षांत आपोआपच नाहींशी झाली. कशी तें लवकरच कळेल.

कुराची विपुलता हीं पुस्तकांतूनच पहाण्यासारखीं आहेत. तथापि या ग्रंथाविषयीं काहीं लोकांचें मत बरें पडलें नाहीं हें मला मान्यच करावयास हवें. पण एखाद्या वेळीं इतक्या वर्षांनंतरसुद्धां अजूनहि त्या ग्रंथाला माझ्याकडे मागणी येते. हजार पानांचा राजशाही आकाराचा ग्रंथ, सर्व उपांगांनीं नटलेला केवळ तीन रुपयांत मिळणारा, आणि मोठमोठ्या जाहिरातींच्या रूपानें आंतील मजकुराचा आधींच खुलासा झालेला, यामुळें या ग्रंथाच्या तीन हजार प्रति हातोहात उडाल्या. केसरी प्रबोध केसरीच्या नांवामुळें गेला, केळकर ग्रंथ केळकरांच्या नांवामुळें खपला- अर्थात् त्या ग्रंथाचें स्वयंभू मोल निःसंशयच मोठें आहे. परंतु, टिळक व केळकर यांच्या नांवाचा फायदा त्यांना खासच मिळाला. हें सावत्सरिक मात्र, केवळ अंगच्या गुणावर खपलें. आणखी दोन हजार प्रती जरा आम्ही जास्त काढल्या असत्या तरी वर्षसहा महिन्यांत त्याहि उडाल्या असत्या.

हें सावत्सरिक दरवर्षी काढावें अशी योजना मी केली आणि तिची सर्व प्रकारची जबाबदारी मी माझ्याच शिरावर घेतली. १९३४ आणि ३५ या दोन वर्षी दीडशें व अडीचशें पानांचे ग्रंथ प्रसिद्ध केले. परंतु, या ग्रंथांना कायमचे गिऱ्हाईक मिळेना आणि दोन्ही वर्षी मी अगदीं तोट्यांत असें व म्हणून तो उपक्रम मी सोडून दिला. पहिल्या सावत्सरिकाच्या वेळीं आपण जें वेतन घेतलें होतें त्याचा वचपा अशा रीतीनें निघाला, यामुळें मिंधेपणांतून मी मोकळाच झालों असें मला वाटूं लागलें. या सावत्सरिकाच्यासाठीं देशी देशींच्या ज्या वकिलाती मुंबईस असतात त्यांच्याशीं ऋणानुबंध जोडण्याचें काम मी सुरू केलें होतें. परंतु, सावत्सरिकाची कल्पनाच टाकावी लागल्यामुळें हे संबंध टिकवून धरण्याची आवश्यकताहि मला वाटली नाहीं.

माझ्या ग्रंथनिर्मितीच्या कल्पना एकांत एक गुंतूनच निघत होत्या. आम्ही कॉलेजमध्यें असतांना असें ऐकलें होतें कीं, मंगळावर कालवे असावे असें खगोल शास्त्र्यांचें मत झालें आहे आणि म्हणून अधिक शोधासाठीं या ग्रहावर आपल्या दुर्बिणी रोंखून ते बसले आहेत. वीसपंचवीस वर्षें होऊन गेलीं तरी या रोंखलेल्या दुर्बिणींतून त्यांना पुढें काय दिसलें हें आम्हांला कळलेंच नाहीं. मला वाटे कीं आपण जरी एकदां सुशिक्षित झालों असलों तरी आपण सुशिक्षित रहात नाहीं. हा विचार बळावत जातां जातां मी आपल्या मनाशीं

अशी योजना आखली कीं, मुख्य भौतिक शास्त्राची गति कोठपर्यंत आली आहे याचा आढावा एकदा पहिल्यानें घ्यावा आणि पुढें दरवर्षी आधीच्या वर्षा मध्यात झालेल्या शास्त्रीय प्रगतीचा याच तऱ्हेचा विशेष घ्यावा आणि हें सर्व, सरळपणें सुशिक्षित'अशा वाचक वर्गाला कळेल आणि मनोरंजक वाटेल, अशा पद्धतीनें करावें ही कल्पना निश्चित करून मी या उद्योगाला लागलो आणि कचेरी थाटून बसलों हें काम खर्चाचें व शारीरिक आणि बौद्धिक दगदगीचें होतें पण हा सर्व बोजा मी आपण होऊन स्वतःवर घेतला परिणामावरून पहाता असें वाटतें कीं, मी हें करावयास नको होतें कारण या कामात मला झालेल्या कर्जाचा शेवटचा एक हजार रुपयाचा हप्ता परवा कॉलेजातून सेवानिवृत्त होताना मीं फेडला !

विज्ञानबोधाच्या रचनेची सर्व योजना माझी मीच केलेली होती मुख्य मुख्य सर्व भौतिकशास्त्रांच्या अद्यायावत् वाढीचा इतिहास चांगल्या तज्ज्ञ लोकांकडून मी लिहून घेतला मला स्वत ला कोणतेंच शास्त्र येत नाहीं परंतु, प्रत्यक्ष शास्त्र मला येत नसलें तरी अनेक शास्त्रांविषयीं मात्र मी बरेंच वाचलेलें आहे ती सर्व माहिती माझ्या मनात बरेच दिवस नांदत असल्या मुळे या विज्ञानबोधाला आपण एक चांगली भरघोस प्रस्तावना लिहावी असा संकल्प मी या योजनेंतच केलेला होता तपशिलानें मजकुराला वजन येतें हा न्याय सर्वांना माहीत आहे म्हणून आपल्या प्रत्येक विधानाला आणि अनुमानाला पोषक असा नानाप्रकारचा तपशील मी जमा केला आणि विज्ञानबोधाला चांगली दोनशें पानांची प्रस्तावना लिहिली या प्रस्तावनेंत धर्म आणि भौतिकशास्त्रें यांच्या झगड्याचें विवेचन मुख्यत केलेलें आहे आणि भौतिकशास्त्राचे जे सिद्धांत बाधित होण्याचा यत्किंचितही संभव आता राहिला नाहीं त्या सिद्धांतांना धर्मांनीच थोरवी दिली पाहिजे असें मत प्रतिपादलें आहे नेहमीप्रमाणें खुद्द मजकुरांतील आणि प्रस्तावनेंतील सर्व मुख्य मुख्य मुद्दे मी जाहिरातींत घातले आणि त्यामुळें वाचकवर्गाला ग्रंथाची यथार्थ कल्पना आली हा ग्रंथ मी कै महादेव गोविंद रानडे यांच्या स्मृतीला अर्पण केला आहे ग्रंथाचा खप उत्तम झाला आणि पहिल्या

छापखान्याला लागणारा, नकाशे, कागद, इत्यादींचीं सारीं बिलें मला चुकतीं करतां आलीं. परंतु या पुस्तकाच्या करणावळीवर म्हणजे लेखकाचा मुशाहिरा आणि कांहीं महिने चालू असलेल्या कचेरीचा खर्च यावर मी दोन हजार रुपये खर्च केले होते ते लोकांकडून आणलेले पैसे मात्र दिवाळ्याचे राहिले. दरम्यान ग्रंथाची विक्री अपेक्षेप्रमाणें होत राहिलेली नाहीं हें मला दिसून आलें. असें होण्याचें कारण मी पुढें केव्हां तरी सांगेन. विज्ञानबोध माझ्या अंगावर पडला पण पुस्तकें जवळ असल्यामुळें केव्हां ना केव्हां वाचून बाहेर पडूं असें मला वाटत होतें कारण या ग्रंथाच्या प्रस्तावनेवर चांगल्या चांगल्या लोकांनीं फार उत्कृष्ट अभिप्राय दिले होते, परंतु दैवयोग असा की पुढें कांहीं वर्षांनीं विज्ञानबोधाच्या उरलेल्या या सगळ्या प्रती मातुल्याच्या वाडींतील चाळीला लागलेल्या आगींत भस्मसात होऊन गेल्या! एकादें मूल जन्माला येतें तें बापाच्या मुळावर येतें आणि आपणहि मरून जातें तसाच प्रकार या विज्ञानबोधाच्या बाबतींत झाला. मौज अशी आहे कीं तरुण लोकांची रुचि या ग्रंथाकडे पुन्हा सध्या वळलेली दिसते आणि जर त्या प्रती जिवंत राहिल्या असत्या तर त्या आतां खात्रीनें खपल्या असत्या. असो.

मी अस्पृश्यतानिवारणाचें काम पंधरा वर्षें केल्यानंतर आणि माझ्या जवळ या विषयाच्या चिंतनाची आणि अनुभवाची चांगली समृद्धी झाल्यानंतर ‘ अस्पृश्यांचा प्रश्न ’ हें पुस्तक मी लिहावयास घेतलें. माझा हा विषय अगदीं तयार असल्यामुळें मी हीं साडेसहाशें पानें फार त्वरेनें लिहून काढलीं. परंतु, येवढें पुस्तक प्रसिद्ध करावयाचें त्राण माझ्यापाशीं नव्हतें. श्री शंकरराव दाते म्हणजे सध्याच्या ‘काळ’पत्राचे संपादक हे माझे जुने विद्यार्थी, सार्वजनिक चळवळींत मोठ्या हौसेनें काम करणारे गृहस्थ. त्यांनीं हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें पत्करलें. आमच्या अस्पृश्यता निवारक मंडळाचे कायमचे अध्यक्ष श्री. अण्णासाहेब भोपटकर यांना हें पुस्तक मीं अर्पण केलें. या विषयाच्या संबंधानें खूपच गाजावाजा झालेला होता, आणि महादेवशास्त्री दिवेकर, श्रीधरशास्त्री पाठक, श्री दप्तरी, घुले शास्त्री इ. अनेक विद्वानांनीं आणि कार्यकर्त्यांनीं आपापलीं या विषयावरचीं पुस्तकें याच सुमारास केव्हां तरी आगेमागें प्रसिद्ध केलीं. कै. अण्णासाहेब शिंदे यांचें पुस्तक "आपांच

प्रसिद्ध झालें होतें या माझ्या पुस्तकांतील एकेक प्रकरण स्वतन्त्रपणें पाहिलें तर तें चांगलें वठलें आहे असें वाटतें परंतु, सगळ्या प्रकरणांची ग्रंथरूपाची जी एकत्र बांधणी ती असावी तितकी सुसंबद्ध नाहीं, हा कोणी काढलेला आक्षेप अगदीं खरा आहे असलेला दोष नाहीं म्हणण्यांत कांहींच मतलब नाहीं पण तो कां उत्पन्न झाला असावा हें सांगण्यास हरकत नाहीं ते प्रसंगाच दिवस होते आणि प्रकरणें जशीं जशीं होतील तशीं तशीं छापखान्यात पाठवून ग्रंथ पुरा करणें अगदीं अवश्य होतें लिखाण समाप्त झाल्यावर तें कांहीं दिवस हाताशीं राहिलें असतें तर पुनर्वाचनानें मला त्याचे दोष दिसून आले असते आणि प्रकरणाचा व कदाचित् मजकुराचा सुद्धा अनुक्रम बदलता आला असता नारायणशास्त्री मराठे, सेनापति शिंदे या अगदीं निराळ्या लोकांनीं आणि सार्वजनिक जीवितांत वावरणाऱ्या किती तरी मोठ्या लोकांनीं या पुस्तकाची फारच तारीफ केली आणि मला अजूनहि असें वाटतें कीं, ज्या कोणाला हा विषय सांगोपांग समजून घ्यावयाचा असेल त्यानें हा ग्रंथ अवश्य वाचावा अस्पृश्य समाजांतील पदवीधर तरुणांनीं या ग्रंथाची मनापासून केलेली तारीफ माझ्या कानीं आली म्हणजे मला खरा आनंद होतो, कारण त्याच्या चांगलेपणाचा हीच खरा कसोटी आहे

दरम्यान लढ्यांच्या रणावर महाराष्ट्रदळाला व शेवटचें यश मिळालें तेव्हां पासून तों आजतागायतचा म्हणजे महाराष्ट्राच्या दिडशें वर्षांचा इतिहास लिहावा ही कल्पना माझ्या मनांत साकार बनत चालली होती आणि म्हणून त्या दृष्टीनें माझें वाचनहि चालू झालें होतें श्री श्रीनिवास पाटणकर ह्या विद्यार्थ्यानें या ग्रंथाचीं टिपणें करण्याच्या कामीं मला फार मोठें साहाय्य केलें इतिहासमंदिरांतील या कालखंडावरील पुस्तकें वाचून टिपणें करणें हेंच मुख्य काम होतें प्रांतिक सरकारनें दरवर्षी प्रसिद्ध केलेले रिपोर्टस, निरनिराळ्या वेळीं बसलेल्या कमिशनांनीं प्रसिद्ध केलेले अहवाल, वसूनें आपलें पुस्तक ज्या सातारच्या दप्तरावर आधारलें आहे तें दप्तर, सशोधकांनीं प्रसिद्ध केलेला या काळांतील पत्रव्यवहार लहानमोठ्या लोकांचीं प्रसिद्ध झालेलीं चरित्रें जमिनीची मोजणी आणि पहाणी या संबंधानें सरकारनें केलेल्या प्रयत्नाचे रिपोर्टस, सत्तावन सालच्या क्रांतियुद्धाचा इतिहास, मुंबई विश्वविद्यालयाची स्थापना

व तिची अद्ययावत वाढ याचा इतिहास, महाराष्ट्रातील निरनिराळ्या संस्थांचे इतिहास, मराठी भाषेची या काळात झालेली प्रगति, वर्तमानपत्रें व मासिकें यांचे इतिहास, धार्मिक व सामाजिक सुधारणाचा इतिहास इत्यादि विषयाचें भरपूर वाचन मी केलें आणि टिपणेंहि तयार केलीं परंतु, ग्रंथ लिहावयास घ्यावा तर तो प्रसिद्ध करण्याच्या साधनाचा अभाव, आणि, प्रकाशकांच्या विषयीं आलेला बराच विपरीत अनुभव यामुळें कामाला हात घालावयास मन तयार होईना. शेवटीं दुर्दैव असें की वर ज्याच्या नावाचा उल्लेख केला आहे तो अतिशय प्रतिभाशाली आणि चपल बुद्धीचा विद्यार्थीच तापानें मरण पावला यामुळें तर माझा हातच मोडल्यासारखा झाला. संकल्पिलेल्या ग्रंथाच्या टिपणाचें एक मोठें थोरलें गाठोडें माझ्यापाशीं अजूनहि पडून आहे पुन्हा कधीं योग आला तर हा ग्रंथ मी अजूनहि लिहून काढीन असें मला वाटतें.

पुण्यास अखिल भारतीय हिंदुमहासभेचें अधिवेशन भरावयाचें ठरलें या प्रसंगीं हिंदुसमाजाच्या संघानें एखादें प्रसंगोचित असें पुस्तक प्रसिद्ध करण्याची कल्पना परिषदसमितीनें काढली. आणि तें काम नेहमींच्या वहिवाटी प्रमाणें माझ्याकडे सोंपविलें. वर सांगितलेल्या पुस्तकांपैकीं एका कोणत्याशा पुस्तकाच्या रचनेंत मी गुंतलों होतों, त्यातच हें नवें काम आलें. परंतु जमवाजमव करून हिंदुसमाजदर्शन या नावाचें पुस्तक मी संपादिलें. हिंदु-समाजाच्या दृष्टीनें पुष्कळ उपयुक्त मजकूर यांत एकत्र केला आहे. मात्र प्रत्येक प्रकरणाला मी एक एक छोटीशी स्वतंत्र प्रस्तावना लिहिली आहे. मी शाळेंत नोकर म्हणून हें पुस्तक श्री अण्णासाहेब भोपटकर यांच्या नावावर प्रसिद्ध झालें. पुढें या पुस्तकावर जप्ती आली. आणि या जप्तीचें लोण मुंबई इलाख्याच्या बाहेरील एका संस्थानातून इकडे आलें अपिलाचें काम बॅ. जयकर यांनीं फारच चांगलें चालविलें आणि शेवटीं वरिष्ठ कोर्टांत हें पुस्तक मुक्त झालें. परंतु जप्तीच्या आधींच या पुस्तकाच्या प्रतींची वाटावाट होऊन चुकलेली होती यामुळें त्यांतील मजकूर आरमीसुद्धा वाया गेला नाहीं.

येथील वसंत व्याख्यान-मालेंत परशुराम या विषयावर फार वर्षांमागें मी एक व्याख्यान दिलें होतें. तेव्हापासून मी परशुराम–चरित्र लिहावें असा आग्रह माझे

स्नेही श्री ताम्हनकर यांनी चालविला होता परंतु, अनेक खटपटीमध्ये आल्याने हें चरित्र लिहिण्याचें काम अडकून पडलें परंतु १९३७ सालीं मी हें काम पुरें करावयास एकदा माझी डोकी घसली आणि ताम्हनकर यांना हें पुस्तक लिहून दिलें हें मी तात्यासाहेब केळकर यांना अर्पण केलें आहे या पुस्तकाला परशुरामचरित्र हें नाव देण्यात मी मोठी चूक केली असें मला वाटतें पुस्तकाच्या नावावरून लोकांना असें वाटतें कीं, हें एक पौराणिक चरित्र असेल पण या पुस्तकाच्या १८४ पानांपैकीं केवळ पहिली तेतीस पानें परशुराम चरित्राला लावलेलीं आहेत बाकीच्या एकशेंसाठ पानांत परशुराम–चरित्राचा अर्थ सामाजिक दृष्ट्या बसविला आहे याच पुस्तकाला पंचमानव हिंदुसमाज असें दुसरें नाव दिलेलें आहे आणि तेंच जास्त समर्पक आहे कारण हिंदुसमाज हा पाच निरनिराळ्या लोकांचा बनलेला आहे हें या पुस्तकांत परशुराम कथेच्या अनरोधानें दाखविलें आहे

१९३० सालापासून काहीं रचना संकलनात्मक केली आणि काहीं स्वतंत्र लेखनाची केला केसरीप्रबोध, केळकरग्रंथ, सावत्सरिक तीनखंड विज्ञानबोध, हिंदुसमाजदर्शन हें सारें संकलनात्मक लक्षण होतें संकलनात्मक असलें तरी माझें स्वत चें म्हणून स्वतंत्र लिखाण यांत पुष्कळच आहे, आणि अस्पृश्यांचा प्रश्न, विज्ञानबोधाची प्रस्तावना, परशुरामचरित्र हा माझीं स्वतंत्र तीन पुस्तकें यावरोबरच झालीं शिवाय, दाढेंवीं वर्षांचा महाराष्ट्र या संकल्पित ग्रंथाच्या टिपणांचें दप्तर हीह याच काळांत तयार झालें म्हणजे १९३० पासून १९३७ पर्यंत एवढी रचना माझ्या हातून झाली या कामामुळे मला चांगली प्रतिष्ठा प्राप्त झाली धनोत्पादन हा माझा हेतूच नसल्यामुळें तें मला मिळालें नाहीं हें म्हणण्यात काहींच मतलब नाहीं अस्पृश्यांचा प्रश्न आणि परशुराम-चरित्र हीं प्रकाशकांनीं छापलीं यांतच मी भूषण मानलें आणि विज्ञानबोधांत तर मी साफ बुडालों आता माझ्या बाकीच्या लिखाणाची हकिगत सांगतों. वाचकांच्या हें मात्र ध्यानात हवें कीं, हा सारा उद्योग मी करीत असताना शाळेतल्या माझ्या नोकरीचें काम चालूच असे व अस्पृश्यता–निवारक मंडळींचें कामहि चालूच होतें

रत्नाकर मासिकांत लहान लहान चरित्रें या नावानें मी एक चरित्रमाला

व तिची अपरावत गाढ माया इतिहास, महाराष्ट्रांतील निरनिराळ्या संस्थांचे इतिहास, मराठी भाषेची या काळांत झालेली प्रगति, वर्तमानपत्रें व मासिकें यांचे इतिहास, धार्मिक व सामाजिक सुधारणांचा इतिहास इत्यादि विषयांचें भरपूर वाचन मी केलें आणि टिपणेंहि तयार केलीं. परंतु, ग्रंथ लिहावयाचा त्याला तर तो प्रसिद्ध करण्याच्या साधनांचा अभाव, आणि, प्रकाशकांच्या विषयीं आलेला बराच विपरीत अनुभव यामुळें कामाला हात घालावयास मन तयार होईना. शेवटीं दुर्दैव असें कीं वर ज्यांच्या नावाचा उल्लेख केला आहे तो अतिशय प्रतिभाशाली आणि चपल बुद्धीचा विद्यार्थीच तापानें मरण पावला. यामुळें तर माझा हातच मोडल्यासारखा झाला. सर्व लिहिलेल्या ग्रंथाच्या टिपणांचें एक मोठें थोरलें गाठोडें माझ्यापाशीं अजूनहि पडून आहे. पुन्हा कधीं योग आला तर हा ग्रंथ मी अजूनहि लिहून काढीन असें मला वाटतें.

पुण्यास अखिल भारतीय हिंदुमहासभेचें अधिवेशन भरावयाचें ठरलें. या प्रसंगीं हिंदुसमाजाच्या संबंधानें एखादें प्रसंगोचित असें पुस्तक प्रसिद्ध करण्याची कल्पना परिषदसमितीनें काढली. आणि तें काम नेहमीच्या वहिवाटीप्रमाणें माझ्याकडे सोंपविलें. वर सांगितलेल्या पुस्तकांपैकीं एका कोणत्याशा पुस्तकाच्या रचनेंत मी गुंतलेलों होतों, त्यांतच हें नवें काम आलें. परंतु जमवाजमव करून हिंदुसमाजदर्शन या नांवाचें पुस्तक मी संपादिलें. हिंदुसमाजाच्या दृष्टीनें पुष्कळ उपयुक्त मजकूर यांत एकत्र केला आहे. मात्र प्रत्येक प्रकरणाला मी एक एक छोटीशी स्वतंत्र प्रस्तावना लिहिली आहे. मी शाळेंत नोकर म्हणून हें पुस्तक श्री अण्णासाहेब भोपटकर यांच्या नांवावर प्रसिद्ध झालें. पुढें या पुस्तकावर जप्ती आली. आणि या जप्तीचें लोण मुंबई इलाख्याच्या बाहेरील एका संस्थानांतून इकडे आलें. अपिलाचें काम बॅ. जयकर यांनीं फारच चांगलें चालविलें आणि शेवटीं वरिष्ठ कोर्टांत हें पुस्तक मुक्त झालें. परंतु जप्तीच्या आधींच या पुस्तकाच्या प्रतींची वांटावाट होऊन चुकलेली होती. यामुळें त्यांतील मजकूर आरमीसुद्धा वाया गेला नाहीं.

येथील वसंत व्याख्यान-मालेंत परशुराम या विषयावर फार वर्षांमागें मी एक व्याख्यान दिलें होतें. तेव्हांपासून मी परशुराम-चरित्र लिहावें असा आग्रह माझे

स्नेही रा ताम्हनकर यानीं चालविला होता परतु, अनेक खेंगटीमध्यें आलीं आणि हें चरित्र लिहिण्याचें काम आठनऊ वर्षे रेंगाळत पडलें परतु १९३७ सालीं मी हें काम पुरें करावयास एकदा माडी ठोकून बसलों आणि ताम्हनकर याना हें पुस्तक लिहून दिलें हें मी तात्यासाहेब केळकर याना अर्पण केलें आहे या पुस्तकाला परशुरामचरित्र हें नाव देण्यात मी मोठी चूक केली असें मला वाटतें पुस्तकाच्या नावावरून लोकाना असें वाटतें कीं, हें एक पौराणिक चरित्र असेल पण या पुस्तकाच्या १८४ पानापैकीं केवळ पहिलीं तेवीस पानें परशुराम चरित्राला लागलीं आहेत बाकीच्या एकशेंसाठ पानात परशुराम-चरित्राचा अर्थ सामाजिक दृष्टया बसविला आहे याच पुस्तकाला पचमानव हिंदुसमाज असें दुसरें नाव दिलेलें आहे आणि तेंच जास्त समर्पक आहे कारण हिंदुसमाज हा पाच निरनिराळ्या लोकाचा बनलेला आहे हें या पुस्तकात परशुराम कथेच्या अनरोधानें दाखविलें आहे

१९३० सालापासून काहीं रचना सकलनात्मक केल्या आणि काहीं स्वतत्र लेखनाची केली केसरीप्रबोध, केळकरग्रथ, डाव सरिव तीनखड विज्ञानबोध, हिंदुसमाजदर्शन हें सारें सकलनात्मक लेखाण होतें सकलनात्मक असलें तरी माझें स्वत चें म्हणून स्वतत्र लिखाण यात पुष्कळच आहे, आणि अस्पृश्याचा प्रश्न, विज्ञानबोधाची प्रस्तावना, परशुरामचरित्र हीं माझीं स्वतत्र तीन पुस्तकें याबरोबरच झालीं शिवाय, दाहेंशे वर्षांचा महाराष्ट्र या सकलित ग्रथाच्या टिपणाचें दप्तर हेंहि याच काळात तयार झालें म्हणज १९३० पासून १९३७ पर्यंत एवढी रचना माझ्या हातून झाली या कामामुळे मला चागली प्रतिष्ठा प्राप्त झाली धनोत्पादन हा माझा हेतूच नसल्यामुळें तें मला मिळालें नाहीं हें म्हणण्यात काहींच मतलब नाहीं अस्पृश्याचा प्रश्न आणि परशुराम चरित्र हीं प्रकाशकानीं छापलीं यातच मी भूषण मानलें आणि विज्ञानबोधात तर मी साफ बुडालो आता माझ्या बाकीच्या लिखाणाचा हकिगत सागतों वाचकाच्या हें मात्र ध्यानात हवें कीं, हा सारा उद्योग मी करीत असताना शाळेंतल्या माझ्या नोकरीचें काम चालूच असे व अस्पृश्यता-निवारक मडळाचें कामहि चालूच होतें

रत्नाकर मासिकात ल्हान ल्हान चरित्रें या नावानें मी एक चरित्रमाला

लिहिली होती. पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ या नावानें ही चरित्रें मी एक वेळीं या चरित्राच्या भाषेसंबधानें अनेक रसिकांनीं प्रशंसापर उद्‌गार काढले त्यातील काहींनीं म्हटलें कीं ही खास मराठी भाषा आहे. म्हानशी प्रस्तावना लिहितांना खास मराठी भाषा या शब्दप्रयोगाला अवतरण चिन्हें मी घालण्याचें विसरलों आता क्षणभर असें जरी मानून चाललें कीं, माझ्या भाषेला मी खास मराठी भाषा असें म्हटलें तरी तो फार मोठा गुन्हा होत नाहीं, पण कै बापूसाहेब आवेकर यांनीं या दोन तीन शब्दांचें मोठेंच बखेडें केलें आणि माझ्या भाषेवर मोठा कडाका उडविला. परंतु आतां इतकीं वर्षे मध्यंतरी गेल्यानंतरसुद्धा या पुस्तकाच्या भाषेचा मोकळ्या मनानें गौरव करणारे शेंकडों लोक मला भेटतात. या पुस्तकाच्या पाचसहाशें प्रती विज्ञानबोधाबरोबरच जळाल्या. परंतु त्याला अजूनहि गिऱ्हाईक असल्यामुळें मी हें पुस्तक पुन्हा छापविलें आहे.

पुढें माझे विद्यार्थी पु. रा. भिडे यांच्या आग्रहावरून मी प्रकार पत्रात लिहू लागलों. श्री वि. श्री. मोडक, व श्री रा. ना. नातू यांचा मला सारखा आग्रह असा कीं, मी काहीं तरी ललित लिहावें. भीतभीतच मी हें लिखाण करू लागलों. लघुकथा म्हणजे काय हें मला इंग्रजी शतकांला त्या कथा शिकविण्याचा प्रसंग आला तेव्हा कळलें. तोंपर्यंत मला या वाङ्मय-प्रकाराची माहितीच नव्हती. परंतु, जरी लघुकथेच्या तत्त्वाविषयीं स्थूलरूप माहिती मी गोळा केली तरी प्रत्यक्ष लिखाणात या माहितीचा उपयोग मी केव्हाच केला नाहीं. किंबहुना लघुकथा हें नाव माझ्या ललित लेखनाला देताहि येणार नाहीं. सुचत यादेल असें कथारूप वाङ्मय लिहावयाला मी सुरुवात केली. प्रकार पत्रातून या कथा येऊ लागल्यानंतर तरुण वाचक वर्गाचे जे अभिप्राय माझ्या कानावर येऊ लागले ते पाहून माझ्या अंगात कदाचित् असत असलेल्या कथन–कौशल्याची मला नवीच प्रतीति आली, आणि वाङ्मयाच्या एका निराळ्या दिवाणखान्यात आपण शिरत आहों असें मला वाटू लागलें. उपेक्षिताचें अंतरंग हें पुस्तक प्रसिद्ध होताच त्याचा सगळीकडे केवळ जयजयकार झाला. लहानापासून थोरापर्यंत आणि विद्यार्थ्यांपासून विद्वानांपर्यंत घटणाऱ्या स्त्री पुरुषानीं या पुस्तकाची वाहवा केली.

ज्ञान मानवी जीवितांत कायमचें रुजून गेलेलें आहे. इतकें की, तें ज्ञान आहे याची जाणीवही आपल्याला नसते. त्याच्या खालोखाल असलेल्या विवाद्य ज्ञानाचा पसारा फारच मोठा असतो. ज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत आणि उपशाखेंत, मग तें ज्ञान सूक्ष्मशास्त्रांचें असो किंवा स्थूलशास्त्रांचें असो, त्यात कितीतरी वाद (controversies) असतात. यांतील सर्व मुख्य वाद एकाच कोशांत आणून ठेवावे असा माझा फार दिवसांचा हेतु आहे. साधनांची अनुकूलता झाली तर हिंदुत्वकोश आणि ट्रॉटस्कीचा इतिहास यांच्या मागोमाग या वादकोशाच्या रचनेसहि मी हात घालीन. सध्यां तरी असा बेत आहे. पुढें काय होईल तें होईल.

---

# रसवंतीची जन्मकथा : : : ४

डॉ. ग. य. चिटणीस, माजी संपादक 'चित्रा'

प्रो. श्रीपाद महादेव माटे यांनी 'रसवंतीची जन्मकथा' हें पुस्तक १९४३ च्या नोव्हेंबरमध्यें स्वतःच प्रकाशित केलें. पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर एक दोन दिवसांनीच त्याची एक प्रत माझे मित्र श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या घरीं मी पाहिली. सहज कुतूहलानें मी ती चाळू लागलों. चाळतां चाळतां या पुस्तकानें माझें मन वेधून घेतलें. मी तें पुस्तक पाध्यांच्याकडून मागून घेतलें आणि दोन तीन तासांच्या आंतच भराभर वाचून काढलें. त्यानंतर हें पुस्तक संग्रही असावें म्हणून मी त्याची एक प्रत बाजारांतून विकत आणली आणि सावकाशीनें हेंच पुस्तक मी पुन्हा वाचून काढलें. हें पुस्तक वाचून माझ्या मनावर काय परिणाम झाला तो मी एक दोन मित्रांजवळ बोलून दाखवला. त्यांनीं या पुस्तकावर सविस्तर अभिप्राय मी लिहावा अशी इच्छा प्रदर्शित केली. पण कांहीं कारणामुळें बरेच दिवस मला या पुस्तकावर लिहितां आलें नाहीं. मुंबई साहित्य-सभेच्या विद्यमानें झालेल्या एका चर्चेंत प्रो. वि. ह. कुलकर्णी यांनीं या पुस्तकावर चौफेर हल्ला चढवला. अर्थात् या पुस्तकाचें समर्थन करण्याचें काम माझ्याकडे ओघाओघानें आलें आणि तें मी आनंदानें स्वीकारलें. प्रो. कुलकर्णी यांची टीका पूर्वग्रहदूषित होती असें मला अजूनहि वाटतें. इतकेंच नव्हे तर टीका करण्यापूर्वी त्यांनीं हें पुस्तक नीट वाचलें नसावें अशी मला दाट संशय येतो.

यानंतर कांहीं दिवसांनीं 'चित्रा' साप्ताहिकाच्या स्तंभांत याच विषयावर

मी एक लेखमाला सुरू केली त्याच्याबद्दल प्रो माटे यांनी स्वीकारलेल्या भूमिकेशी सहमत असल्यामुळे या लेखमालेत मी त्यांची भूमिका निरनिराळ्या त हेने विशद करण्याचा प्रयत्न केला माझी अशी वल्पना होती की, प्रो वि द कुलकर्णीसारखे या पुस्तकाचे टीकाकार उत्तर देण्याचा प्रयत्न करतील त्यांनी तसे केले नाही यावरून प्रो माटे यांनी आपल्या पुस्तकात माडलेले मुद्दे निर्विवाद आहेत असे म्हणायला मुळीच हरकत नाही माट्यांची भूमिका विकृत करून किंवा इतर असंबद्ध बाबींचा अवलंब करून त्याच्यावर टीका करणे सोपे आहे आणि अशी टीका त्याच्यावर झालेली आहे परंतु शास्त्रीय दृष्ट्या या टीकेला मुळीच महत्त्व नाही हे असल्या टीकाकारांनी ध्यानात ठेवावे माझे मित्र प्रो वा ल कुलकर्णी आणि प्रो रा श्री जोग यांनी या पुस्तकावर जे लिहिले आहे, त्याचा परामर्श मी याच लेखात घेणार आहे

' रसवतीची जन्मकथा ' हे पुस्तक वाचल्यानतर प्रो माटे यांच्या विषयी माझ्या ज्या काही पूर्व कल्पना होत्या, त्या साफ कोसळून पडल्या माझा आणि त्यांचा प्रत्यक्ष परिचय नाही म्हणूनच हे पुस्तक वाचल्यानतर मला आश्चर्याचा धक्काच बसला भाषेचा जन्म आणि विकास कसा झाला याचा शास्त्रशुद्ध दृष्टीने विचार करणारे प्रो माटे हे महाराष्ट्राततरी पहिले गृहस्थ आहेत असे म्हणायला मला बिलकुल दिक्कत वाटत नाही आध्यात्मिक किंवा पारमार्थिक तत्त्वाचा आधार घेऊन भाषेची मीमांसा अनेकानी केली आहे, परंतु उत्क्रांति तत्त्वाचा आधार घेऊन भाषेची उत्पत्ति आणि विकास नैसर्गिक रीत्या कसा झाला असला पाहिजे याच प्रो माटे यांनी केलेले विवेचन मनोरंजक तितकेच उद्बोधक आहे आज आपण नव्या जगात वावरत आहोत, न्यूटनने प्रतिपादिलेल्या निर्जीव नियमानुसार विश्वाचे व्यापार चालत नाहीत तर विश्व हे सान्त आणि असीम ( finite and boundless )

असून तें अतिवेगानं कुठं तरी जात आहे याची जाणीव आइन्स्टाइनच्या शास्त्रज्ञानं आम्हांला करून दिली आहे. विश्वाची ही गतिमानता सर्व ठिकाणीं दृष्टीस पडते. मानवी समाजावर तिचा परिणाम झालेला आपणाला स्पष्ट दिसून येतो मानवी समाज हा स्थिर नाहीं. तो सारखा बदलत आहे. त्याचप्रमाणें मनुष्याच्या ज्ञानाच्या मर्यादा सारख्या वाढत आहेत. प्रो. माटे म्हणतात: त्याप्रमाणें ज्ञानाच्या आपल्या अनेक कल्पना लुप्तप्राय झाल्या आहेत. अशा परिस्थितीत तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, मानसशास्त्र, अर्थशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान इत्यादि शास्त्रांच्या शाखोपशाखांमध्यें बदल घडून आल्यास नवल नाहीं. वाङ्मयासंबंधाचे जे ढोबळ सिद्धांत पूर्वीपासून चालत आले आहेत ते आज चूक ठरू पहात आहेत. म्हणूनच वाङ्मय म्हणजे काय याची नवी व्याख्या करण्याची जरूरी आज आम्हांला तीव्रतेनं भासू लागली आहे.

प्रो. माटे यांनीं आपल्या पुस्तकांत काव्याची नवी व्याख्या आपल्याला दिली आहे. 'रसात्मक वाक्यं काव्यम्' ही काव्याची जुनी व्याख्या काव्यालाच नव्हे तर इतर वाङ्मयप्रकारांनासुद्धां लागू पडते काव्य म्हणजे गेय वाक्यरचना असें प्रो. माटे आम्हांला झडझडून सांगतात. गेयतेखेरीज काव्यामध्यें जे अनेक गुण असतात ते इतर वाङ्मय-प्रकारांतहि आढळतात म्हणून काव्याची व्याख्या करतांना त्या व्याख्येमध्यें त्या गुणांचा समावेश करतां येत नाहीं परंतु काय असेल तें असो प्रो. माटे यांनीं ही केलेली व्याख्या बऱ्याच कवींना आणि त्यांच्या चहात्यांना पसंत नाहीं. गेयता हें काव्याचं व्यवच्छेदक लक्षण मानलं तर काव्यांत कांहींच उरत नाहीं, अशी त्यांची तक्रार आहे परंतु नुसती तक्रार करून काय उपयोग ? गेयतेखेरीज काव्याचं दुसरें व्यवच्छेदक लक्षण कोणतं हा प्रश्न कवींना किंवा त्यांच्या चहात्यांना विचारला तर त्यांच त्यांना उत्तर देतां येत नाहीं, हें आपण लक्षांत ठेवलं पाहिजे.

प्रो. माटे यांच्या भूमिकेचा आपण थोड्या निराळ्या दृष्टीनें विचार करू. सुप्रसिद्ध बंग कवि रवींद्रनाथ टागूर यांनी आपल्या पूर्व वयात उत्कृष्ट दर्जाचं काव्य लिहिलं हें आतां सर्वांनाच ठाऊक आहे १९१२सालीं त्यांनी आपल्या गीतांजलीला इंग्रजी पेहराव चढवला. हा अनुवाद गद्य होता हें आपण विसरता कामा नये. १९१३ सालीं या इंग्रजी अनुवादाला नोबेल पारितोषिक मिळालं. आणि त्यामुळेंच ते जगात मान्यता पावले या इंग्रजी अनुवादात इतर काव्यगुण असले तरी गेयता नाहीं. म्हणून त्याला आपण गद्य समजतों इतर काव्यगुण या अनुवादात आहेत. परंतु त्यामुळं तें काव्य ठरत नाहीं बंगाली गीतांजलीला मात्र काव्य म्हणूनच संबोधता येईल कारण या पुस्तकात गेयता आपल्याला प्रकर्षानें दृष्टीस पडते. ज्यानं बंगालीचा थोडाफार अभ्यास केला आहे त्याला लगेच कळून येईल कीं, रविबाबूंनी रचलेलीं गीतं गेयतेमुळेंच लोकप्रिय झालेलीं आहेत त्यांच्या प्रत्येक काव्यात शब्दसौंदर्य आणि स्वरसौंदर्य यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला आपल्या दृष्टीस पडतो. त्यांच्या काव्यातील स्वरसौंदर्य काढून टाकलं तर आज त्यांचं काव्य आपल्याला जितकं सुंदर वाटत तितकं तें वाटणार नाहीं दुसरी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं रविबाबूंचा काव्य-संसार जरी मोठा, असला तरी काव्यलेखनापेक्षा गद्य लेखनच त्यांनीं अधिक केलं आहे काव्याच्या द्वारें जर त्यांना आपल्या भावनांचा आणि विचारांचा पूर्ण आविष्कार करता आला असता तर त्यांनीं गद्यलेखन मुळींच केलं नसतं परंतु काव्य करताना अनेक अडचणी उपस्थित होतात अनेक बंधनं पाळावीं लागतात हें रविबाबूंना माहित होतं म्हणजे एखादी विशिष्ट भावना किंवा विचार आहे तसाच काव्यामध्ये व्यक्त करणं शक्य नसतं. इतकंच नव्हे तर यमक, अनुप्रास इत्यादींची बंधनं संभाळताना त्या भावनेला किंवा विचाराला मुरड घालावी लागते याची जाणीव रविबाबूंप्रमाणें इतर कवींनाही होत चालली आहे म्हणूनच आधुनिक कवि गद्याचाच अधिकाधिक अवलंब करू लागले

आहा मराठी काव्य–विकासाचाच जर आपण विचार केला तर आपल्याला अस आढळून येईल की, पूर्वीच्या अक्षर, गण, मात्राकडून पद्य–रचनेकडे मराठी कविता झुकू लागला आहे माझी अशा कल्पना आहे की मराठी काव्याचा यानतरचा आविष्कार मुक्तछद, गद्यकाव्य आणि गद्य असा क्रम न अधिकाधिक प्रमाणात होणार आहे हेच दुस या शब्दात सागायच म्हणजे गेयतेखेरीज काव्यातील इत गुण गद्यान आत्मसात केल्यामुळे बहुतेक प्रतिभावान लेखक गद्याचाच अधिकाधिक उपयोग करू लागतील

या नियमाला काही अपवाद असणारच श्री पु म लाड यानी आपल्या 'मधुपर्क' नावाच्या काव्य–सग्रहाला एक प्रस्तावना जोडली आहे आपले जीवनविषयक अनुभव काव्याच्या द्वारेच आपण यापुढे प्रगट करणार, अशी धमकी त्यानी आम्हाला या प्रस्तावनेत दिला आहे त्याचा काव्य–सग्रह वाचल्यानतर मात्र अस वाटू लागत, की श्री लाड हे पद्यापेक्षा गद्यच अधिक सुरस लिहू शकतात याचा अर्थ इतकाच की मारून मुटकून कुणी कवि होऊ शकत नाही हे जितक खर आहे, तितकेच कवीची प्रतिभा परिणत होऊ लागली म्हणजे तिला काव्याच माध्यम अपुर पडत हेही खर आहे तरी सुद्धा कित्येक लेखकाना काव्य करण्याचा हव्यास असतो तो का? याच कारण हे की, गेयतेन त्याची मन भारून गेलेली असतात गेयतेमध्ये रसवत्ता मुळचीच असते नीरस वाक्यरचना गेय बनवली म्हणजे गेयतेतील रसवत्तेचा फायदा वाक्यरचनेला आपोआप मिळतो आपण रचलेल्या शब्दपक्तीतील रसवत्ता किती आहे आणि गेयतेतील रसवत्ता किती आहे हे कळण्याइतकी चिकित्सक बुद्धि कवीमध्ये नसते याचा परिणाम असा होतो की गेयतेतील रसवत्ता ही आपल्या शब्दपक्तीतील मुळचीच रसवत्ता आहे असा भ्रम त्याला होतो आणि तो गद्यलेखनाकडे तुच्छतेन पाहू लागतो म्हणून म्हणतात त्या प्रमाणे एखाद्या उत्कृष्ट काव्यामध्ये मुळचा रस किती आहे आणि गेयतेमुळ त्यात आलेला रस किती आहे हे पाहायच झाल्यास ते काव्य आपण गद्यात लिहून काढाव म्हणजे आपोआप कळून येईल

'सत्यकथे'च्या नव्हेंबर १९४४ च्या अंकात प्रो वा ल कुलकर्णी यांनी काव्यास पद्य किंवा गेयता अपरिहार्य असण्याचीं दोन कारणें सांगितलीं आहेत ते म्हणतात कीं काव्यातील भावानुभावाचा स्वभावच असा आहे कीं त्यांना त्वरबद्धतेचा स्वीकार करूनच आविष्कृत होता येत एरव्ही त्याचा आविष्कार होत नाहीं ते असेंही म्हणतात कीं, काव्य ही कलाकृती असल्या मुळे सौंदर्य हा त्याचा विषय आहे सौंदर्यास प्रमाणबद्धता, समतोलपणा इत्यादि आकृति, गुण आवश्यक असतात हें आकृतीच सौंदर्य पद्यातच आढळतं म्हणून काव्य हें अपरिहार्यपणें पद्यरूप धारण करतं या त्यांच्या भूमिकेवर प्रो रा श्री जोग यांनी म १९४५ च्या सत्यकथेमध्यें टीका केली आहे श्री जोगांची टीका समर्पक आहे परंतु त्यामुळ श्री कुलकर्णी यांच्या मूळ भूमिकेला बाध येत नाहीं फार तर इतकेंच म्हणता येईल, कीं श्री कुलकर्णी यांच्या विचारसरणींत बराच शिथिलपणा आहे मला असं वाटतं कीं काव्यामध्यें असाच भाव भावना प्रगट होतात कीं त्यामुळ त्यांना पद्यरूपधारण आवश्यक होतें गेयता, तालबद्धता आणि लयबद्धता हेंच शब्द श्री कुलकर्णी यांनी समानअर्थी वापरले म्हणूनच श्री जोगांना त्यांच्यावर टीका करायला वाव मिळाला वास्तविक पाहिलं तर गेयता, तालबद्धता आणि लयबद्धता हीं एक नव्हत ज्याला आपण इंग्रजींत Rhythm म्हणतो ती गद्यातही असू शकते लयबद्धता म्हणजेएक प्रकारचं आंदोलन किंवा हेलकावा हा हेलकावा माणसाच्या जीवनाम यें प्रत्यहीं अनुभवाला येतो म्हणून हेल कावा किंवा लयबद्धता हें काव्याचच मुख्य गमक आहे असं म्हणता येणार नाहीं ज्या लिखाणात मुळींच लालित्य नसतं त्या लिखाणापासूनही लयबद्धता अलिप्त राहात नाहीं

• श्री कुलकर्णी यांनी आपल्या लेखामध्यें अप्रत्यक्ष रीतीनें किंवा अजाणता प्रो श्री म माटे यांनी जी भूमिका काव्यासंबधान स्वीकारली आहे तिचच

समर्थन केले आहे 'रसवतीच्या जन्मकथे'वर आतापर्यंत तरी वाईट अभिप्राय आले प्रो जोग यानी साहित्य पत्रिकेतल्या पुस्तकाचा परामर्ष घेताना असे म्हटले आहे की, ॲरिस्टॉटलने काव्याची नी व्याख्या केली आहे, त्या व्याख्येच्या अनुरोधाने मला असे म्हणता येईल की, श्री माटे यानी केलेली काव्याची व्याख्या अपुरी ठरते' मला लिहायला खेद वाटतो की प्रो माटयाना काय म्हणायचे आहे तेच प्रो जोगाना कळले नाही प्रो माटे स्पष्ट शब्दात आम्हाला सागतात, की का यातील गेयता जर काढून टाकली तर गेयताविरहित काव्य हा वाङ्मयाचा निराळा प्रकार ठरत नाही म्हणजे वाङ्मयामध्ये गद्य हा जो प्रकार आहे त्या प्रकारामध्ये गेयताविरहित काव्य विलीन होते वाङ्मयाची व्याख्या करताना वाङ्मयाचा essence आणि differentia याचा अन्वय उल्लेख झाला पाहिजे, परतु काव्य हे गेयता बद्धतमुळेच वाङ्मयाचा निराळा प्रकार ठरते म्हणून काव्याचा व्याख्या करताना essence चा उल्लेख न करता differentia चा उल्लेख केला म्हणजे काम भागते ही साधी गोष्ट प्रो जोगाच्या लक्षात कशी आली नाही याचे मला आश्चर्य वाटते घराची व्याख्या करताना व्याख्येमध्ये essence आणि differentia या दोहोंचाही समावेश झाला पाहिजे हे मला कबूल आहे, परतु मी जर चौकोना घराची व्याख्या करू लागलो तर ज्या घरा या चारी बाजू सारख्याच लाब, रुद आणि उच आहेत तेच चौकोना घर अशी मी व्याख्या करीन या व्याख्येमध्ये मी घराचा व्याख्या गृहीत धरली आहे, आणि चौकोना घराचे जे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे घराच्या चारी बाजू चौकाना असणे एवढेच मी माझ्या व्याख्येत सांगितले लिलित वाङ्मयाची व्याख्या गृहीत धरून फक्त काव्याचे व्यवच्छेदक लक्षण काय आहे तेवढेच प्रो माटे यानी आम्हाला सांगितले आहे

पूर्वीच्या काळी मुद्रणकला अस्तित्वात नव्हती लोकाना पाठ करायला

सुलभ जावं म्हणून छंदोरचना केली जात असे. आज मुद्रणकलेमुळे छंदो बद्ध लिखाण करण्याची जरूरी पडत नाहीं. आजच्या काळांत गद्याला अधिक महत्त्व का प्राप्त झालं तें यावरून सहज ल्क्षांत येईल. गद्य हें काव्य किंवा पद्याइतकच श्रेष्ठ आहे असें प्रो. माटे म्हणतात तें मला कबूल आहे. तरीसुद्धा काव्यापेक्षा गद्याची योग्यता अधिक आहे आणि विचारसौंदर्य गद्यामध्ये जितक्या प्रभावी रीतीने दाखवतां येत तें छंदोरचनेंत दाखवता येत नाहीं, हा विचार प्रो. माटे यानीं आपल्या पुस्तकात ठिकठिकाणीं ध्वनित केला आहे. त्या विचाराशीं मी अधिक सहमत आहे.

शेवटा मला इतकच लिहायच आहे कीं, प्रो. माटे यानीं हें १८८ पानाच पुस्तक लिहून मराठी टीकावाङ्मयात अत्यत मोलाची भर घातली आहे. त्याच्या विचारसरणींतील सडेतोडपणा, त्याचा शास्त्रशुद्ध दृष्टिकोन, आपला मुद्दा विशद करण्याची त्याची विशिष्ट शैली इतर टीकावाङ्मयांत आप ल्याला क्वचित आढळून येईल आज महाराष्ट्रात अनेक चोखदळ टीकाकार आहेत. परतु त्यानीं सुद्धा वाङ्मयाचा मूलगामी दृष्टीने विचार केलेला नाहीं. प्रो. माटे याची विवेचन पद्धति साधी, सरळ आणि सुलभ असल्यामुळे या विषयाचा अभ्यास न केलेल्या माणसाला सुद्धा हें पुस्तक सहज समजण्या-सारख आहे अधिकारी व्यक्तींना हें पुस्तक मार्गदर्शक होईल यात तर मुळींच शका नाहीं. इतकच नव्हे, तर काव्यमीमांसेच्या बाबतींत श्री. माटे यानीं जो प्रगतीचा टप्पा गाठला आहे, त्या टप्प्याच्या पुढें जाण्यास हें पुस्तक तरुण पिढीला मदत करील असा मला दृढ विश्वास वाटतो.

---

## समाजशास्त्र : : : ५

डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे, एम्. ए. पीएच्. डी.

१९१७ साली प्रा. वि. म. भाटे यांनी अस्पृश्यता निवारण्याच्या कार्यास वाहून घेण्याचें ठरविलें. ही प्रेरणा आपणास कशी झाली याचें वर्णन त्यांनीं स्वतःच 'अस्पृश्यांचा प्रश्न' या आपल्या ग्रंथांत केलें आहे. त्या वेळीं लो. टिळकांनीं पुनश्च जोरात सुरू केलेल्या स्वराज्याच्या चळवळीमुळे सर्वत्र उत्साहाचें वातावरण निर्माण झालें होतें. स्वातंत्र्याचीं स्वप्नें खरीं होणार असें देशाला वाटू लागलें होतें. अशा वेळीं, या आनंदाचे निनाद सर्वत्र ऐकू येत असता मधूनच कोण्या एका वर्गाचे कण्हणें ऐकू येत असे. या वर्गाला असें वाटे कीं, स्वराज्य आलें तर आपलें भवितव्य पूर्वीप्रमाणेंच या उच्चवर्णीय हिंदूंच्या हातीं जाईल आणि तसें झाल्यास आपल्याला पूर्वीप्रमाणेंच दास्य, अवमान, दारिद्र्य या पंकांत खितपत पडावें लागेल. ज्या वर्गाच्या पोटांत ही भीति उभी राहिली तो वर्ग म्हणजे अस्पृश्यांचा होय. ही त्याची भीति रास्त आहे, आणि स्वराज्य आल्यानंतर त्यांना पुन्हा पूर्वावस्था प्राप्त होणार नाहीं अशी त्या वर्गाला स्पृश्य हिंदूंकडून हमी मिळणें अवश्य आहे, तसें झालें नाहीं तर आपल्याच त्यात घात होईल, हा विचार प्रा. भाटे यांच्या मनात पक्का रुजला व देशाचे पुढारी राजकीय क्षेत्रात मग्न आहेत, त्यांना इकडे लक्ष द्यावयास वेळ नाहीं, तेव्हां आपण हें काम अगावर घ्यावें असें ठरवून त्यांनी त्या उद्योगास प्रारंभ केला.

या काळाच्या पूर्वीच आपल्या देशात समाज सुधारकांच्या दोनतीन पिढ्या होऊन गेल्या होत्या व समाजसुधारणेचीं काहीं तत्त्वें, तिच्या काहीं पद्धति व तिचें स्वरूप हें ठरून गेलें होतें. रानडे, लोकहितवादी, भांडारकर, यांनीं या विषयावर पुष्कळसें लिखाण व वक्तृत्व करून समाजसुधारणेचे मार्गहि निश्चित

भरतखंडात वर्णानें, रूपानें, रक्तानें व संस्कृतीनें अगदीं भिन्न अशा जमाती एकत्र आल्या. त्या सर्वांना एकत्र नांदावयाचें होतें. त्यातील जे त्रैवर्णिक होते त्यांच्या रक्तात इतरांत मिसळून जाण्यानें आपल्या वंशाला फार मोठा धोका आहे, नव्हे आपल्या संस्कृतीचा तो मृत्यूच आहे, हें त्यांच्या ध्यानात आलें व त्यामुळें त्यांनीं ही व्यवस्था केली. आपल्यापैकीच काहीं लोकांना इतक्या हीन स्थितीला पोचविण्याइतके ते प्राचीन त्रैवर्णिक काहीं हैवान नव्हते असें प्रा. भाटे यांचे मत आहे. 'अस्पृश्यांचा प्रश्न' या ग्रंथात त्यांनीं याचें सविस्तर विवेचन केलें आहे.

जुन्या व्यवस्थेची ही उपपत्ति सांगून तिचें समर्थन करावें असा त्यांचा क्षणभरही हेतू नाहीं. त्रैवर्णिकांनीं येथील आदिद्रविडांना अस्पृश्य ठरवून त्यांच्या उत्कर्षाच्या सर्व संधि नष्ट केल्या हा अत्यंत घोर असा अन्याय झालेला आहे असें स्पष्ट शब्दांत बापूसाहेबांनीं सांगितलें आहे आणि जुनी शास्त्रें बाजूस सारून आपण या वर्गाला समसंधि दिली नाहीं तर त्यांची मानवता प्रगल्भ होणार नाहीं व आपल्या राष्ट्राचा घात होईल असेंहि त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. पण मिशनरी लोक हिंदूंच्या प्राचीन समाजरचनेवर टीका करून युरोपीय व विशेषतः इंग्लिश समाजरचना श्रेष्ठ आहे व ते लोक फार उदार व थोर आहेत, हें जें मत प्रस्थापू पाहात, आणि आपल्या सुधारकांनीं जें निश्चयपूर्वक स्वीकारलें होतें त्याचा प्रा. भाटे यांना उच्छेद करावयाचा होता. उत्तर अमेरिकेंत, दक्षिण अमेरिकेंत, जेथें जेथें वसलेल्या प्रजांना युरोपीयनांना तोंड द्यावें लागलें, आणि दक्षिण आफ्रिकेसारख्या ज्या ठिकाणीं अद्यापि द्यावें लागत आहे, तेथें तेथें युरोपीयनांनीं हीच वांशिक श्रेष्ठतेची, आत्मरक्षणाची, नीति अवलंबिली आणि जी क्रूरता, जी अधमवृत्ति जो सैतानीपणा आचरणें त्रैवर्णिकांच्या स्वप्नातहि आलें नसतें, तोहि त्यांनीं आरंभी व अजूनहि आचरित आहेत, हें दाखवून, येथल्या दलितांचा इंग्रज उद्धार करणार आहेत हा भ्रम नाहींसा करावा हा हें विवेचन करण्यात हेतु होता. 'मीनेस ऑफ हिंदु इंपिरियालिझम' या नावाचें स्वामी धर्मतीर्थजी महाराज या गृहस्थांनीं एक पुस्तक १९४१ सालीं लिहिलें आहे. हिंदुस्थानात आज दहा हजार वर्षें ब्राह्मणांची साम्राज्यशाही आहे. राम, अशोक, चद्र म निशच बळी पडले व कॉंग्रेसवर तिचीच छाप आहे. असें

त्यात प्रतिपादन केलेलें आहे पण मौज अशी कीं, या गृहस्थानें हें पुस्तक अमेरिकेला अर्पण केलें आहे व अर्पण पत्रिकेंत ' गुलामाना स्वातंत्र्य देणारी, लोकसत्तेचें समर्थन करणारी भूमि ' अशा तिचा गौरव केला आहे. त्रैवर्णिकानीं येथें आदिद्रविडाना म्हणजे सध्याच्या अस्पृश्याना ज्या तऱ्हेनें वागविलें त्यापेक्षा अमेरिकन लोक गुलामाना फारच सदयतेनें वागवितात अशी या गृहस्थाची कल्पना दिसते अस्पृश्यामध्यें, स्पृश्यामध्यें, सुधारकामध्यें हीं जीं भ्रामक दुर्मताचीं कोळिष्टकें माजलीं आहेत, तीं नष्ट करावी हाच जस्वदयतेचा इतिहास सांगून त्यावरून सिद्ध होणाऱ्या वास्तिक उपपत्तीचें विवेचन करण्यातला मुख्य हेतु आहे वरील सारखीं पुस्तकें पाहिल्यावर त्याचें महत्त्व किती आहे हें ध्यानात येईल

इतिहासाच्या व समाजशास्त्राच्या अभ्यासानें नव्या सुधारकाचा बुद्धि निश्चय होऊन सुधारणेला बळ चढावें येवढाच यातला हेतु आहे. आणि म्हणूनच जुन्याची भूमिका व त्याचें प्रतिपादन कसें चुकत होतें तें त्यांनी ठायीं ठायीं दाखविलेलें आहे. आधुनिक सुधारणेच्या भावनेनें प्रेरित होऊन काहीं हिंदुधर्मातील संतांनीं अस्पृश्यतेचा आणि जातिभेदाचा निषेध केलेला आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न करतात. तो कसा भ्रामक व प्रमाणहीन आहे हें तुकारामाचे व इतर संताचे जातिभेदाविषयींचे सर्व उतारे देऊन त्यांनीं स्पष्ट केलें आहे. ज्या दृष्टीनें आपण आज जातिभेदाकडे पहातों ती दृष्टि संताना नव्हती. ते समता प्रतिपादीत ती फक्त परमार्थापुरती असे, व्यवहारात मत हें जातिनाशाला नव्हे तर सहभोजनालाहि अनुकूल नव्हते असें मतप्रचनाच्या आधारें त्यांनीं दाखवून दिलें आहे. आपणास जातिभेद मोडावयाचे, अस्पृश्यता निवारण करावयाचें तर आपल्या विवेकबुद्धीच्या आश्रयानें तसें प्रतिपादन करणें हेंच श्रेयस्कर होय असा सल्ला प्रा. माटे यांनीं प्रतिपादकाना दिला आहे.

आपल्या समाज सुधारणेला शास्त्रीय अभ्यासाचें अधिष्ठान प्राप्त करून देणें हें जसें माटे यांच्या कार्याचें वैशिष्ट्य, तसेंच अस्पृश्यता निवारण, जातिभेदाचा निरास या सामाजिक चळवळींचा व स्वातंत्र्यसंपादनार्थ चालू झालेल्या राजकीय चळवळीचा परस्परविरोध तर नाहींच, उलट या सामाजिक चळवळी हा राजकीय चळवळीचा एक महत्त्वाचा भाग आहे, त्याना तेज चढल्यावाचून, त्याचें उद्दिष्ट साध्य झाल्यावाचून राजकीयमोक्ष प्राप्त होणें जवळजवळ अशक्य आहे हें सप्रमाण दाखवून देऊन सामाजिक चळवळींत पाऊल टाकणें, हे त्यांचें दुसरें वैशिष्ट्य होय. जुन्या पक्षापैकीं जहाल ऊर्फ राष्ट्रीय पक्षाचे लोक तर सामाजिक सुधारणांची अवहेलनाच करीत; निदानपक्षीं त्याची सध्या जरूर नाहीं असें तरी म्हणत. पण त्या सुधारणाचा आग्रह धरणारे लोक सुध्दा त्याविषयीं जें समर्थन करीत तें अगदींच आचारकाडापुरतें करीत. इंग्रजाच्याजवळ आपण स्वराज्य मागतों तेव्हा आपली मागणी न्याय्य ठरावयाची असेल तर आपणहि आपल्या वर्तनानें अस्पृश्याना आपण अन्याय करीत नाहीं असें दाखवून दिलें पाहिजे; आपण त्यांना गुलामगिरीत ठेवतों, स्त्रियाना गुलामगिरींत ठेवतो, असें असताना आप-

त्याला स्वराज्य मागण्याचा काय अधिकार ? अशी पृच्छा समाज सुधारक करीत म्हणजे सामाजिक सुधारणाची मौलिक महती त्यावेळच्या समाज सुधारकांनीहि सांगितली नाहीं या सुधारणाचा त्यांनी गौरव केला आहे, गोडवे गाइले आहेत पण ते सर्व भूतदयेच्या पाठीवरून सद्‌बुद्धीनें प्रेरित होऊन पण आधुनिक राजकारणाचें सर्व बळ त्यांत आहे, त्या सुधारणावाचून सध्याच्या राजकीय उत्क्रान्तीला तोंड देणें अशक्य आहे असा पक्ष त्या सुधारणाच्या पुरस्कर्त्यांपैकी कोणींच मांडलेला नाहीं

'नवे युगमान' या प्रकरणात 'माणुसकीची किंमत आता वाढली आहे' या विषयाचें विवेचन करताना प्रा. माटे म्हणतात, 'राजे लोकांनी परचक्राच्या वेळीं सर्व लोकांस चला म्हणावें पण भोगाच्या वेळीं त्यांनी व त्यांच्या सरदारांनी मात्र भोगावें हें आजवरचें धोरण रोडावत जाऊन 'तुम्ही तेवढें भोगणारे कोण ?' असें लोक विचारू लागले व होता होता सर्व देश तेथें असलेल्या सर्व लोकांचा असें ठरलें. देशांतील भोवनूत्व लोकांच्या वाटणीला येत नसे तें आता येऊ लागलें व त्यामुळ लोक खरे खरे देशाभिमानी झाले. म्हणजे वरसड, देश व देशाभिमान हीं सर्व एका व्याप्तीचीं झालीं अमुक लोक अमुक एवढ्या परिघात रहाणार, व त्यातील प्रत्येक मनुष्य 'हा देश इतरांबरोबर माझाहि आहे' असें म्हणणार हें ठरून गेलें पूर्वी या ( पाश्चात्य ) देशातील लोक खरे खरे देशाभिमानी होण्यास एकच अडचण होती ती म्हणजे काहीं एका मर्यादेच्या पलीकडील अत्यंत विस्तृत अशा लोकसमूहातील बहुतेक सर्व माणसाना सधीच्या विषम वाटणीच्या आपत्ती सोसाव्या लागत. आता राजसत्ता जाऊन किंवा क्षीण होऊन संधि सर्वांना मिळावयाची अस झाल्यावर देशाभिमान ही वृत्ति सार्वत्रिक झाली व म्हणून हीं राष्ट्रें बलिष्ठ झालीं　　　　..तेव्हा आता देशाभिमानाची ही कल्पना आपण जर सुविस्तृत केली नाहीं तर आपणावर होत असलेलें इतरांचें आक्रमण बंद पाडणें आपल्याला सर्वथा अशक्य आहे जर देशाभिमान विस्तृत करावयाचा असेल तर मन बुद्धीचीं बीजभूत सामर्थ्यें विकसित होण्यास व विकसित झालेल्या सामर्थ्यांच्या वापरास सर्वांना सरसहा परवानगी देणें हा एकच इलाज हिंदुस्थानच्या हातीं आहे."

समाजकारण हे राजकारणास पोषक आहे, किंबहुना ज्याला आपण राष्ट्रीय जागृति असें म्हणतों तिचें अधिष्ठान हें व्यापक समाजकारणच आहे हा विचार येथें स्पष्ट होतो वास्तविक ही कल्पना अगदीं साधी व सोपी आहे ब्रिटनमध्यें पाच कोटी लोक आहेत जर्मनीत आठ कोटी आहेत यातल्या प्रत्येक माणसाला हा देश माझा आहे हा अभिमान स्फुरला तर तो त्या देशासाठीं प्राणार्पणास सिद्ध होतो. म्हणजे जितकी लोकसंख्या तितकें त्या राष्ट्राचें बळ असें ठरतें जेथें हा अभिमान नाहीं तेथें लोकसंख्या ही घातकच ठरते म्हणून हिंदुस्थानांत प्रत्येक व्यक्तीला हा अभिमान उत्पन्न होईल अशी समाजव्यवस्था करणें हें राजकारणाच्या दृष्टीनेंहि अवश्य आहे याचाच अर्थ असा कीं अस्पृश्यता निवारण, जातिभेद निर्मूलन हे राजकीयच प्रश्न आहेत सध्याच्या जगांत राजकीय प्रश्न व सामाजिक प्रश्न हे भिन्न असूच शकत नाहींत.

सामाजिक सुधारणेची मूळ प्रेरणा जी सद्बुद्धि तिला शास्त्रीय अभ्यासाची जोड देणें आणि ती सुधारणा म्हणजे राजकीय सुधारणेचें एक अंगच आहे हा विचार प्रस्थापित करणें ही प्रा श्री. म माटे यांच्या सामाजिक क्षेत्रातील कार्याचीं दोन वैशिष्ट्यें येथवर सांगितलीं आता आणखी एका विशेषाचा विचार करूं

प्रा माटे हे सनातनी सुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत या पदवीत ते स्वत भूषणच मानतात पण त्यांची नेमकी भूमिका न कळल्यामुळें पुष्कळ वेळा त्यांच्या सनातनी सुधारकपणाचा उपहास केला जातो परशुराम चरित्राच्या अखेरीस त्यांनीं आपली ही भूमिका स्पष्ट केली आहे ते म्हणतात ' क्रान्ति प्रतिपादणें एका स्वतंत्र युगमानाच्या आरंभीं आवश्यक असतें, हें खरें पण तसें करताना मागला हिशेब साफ्त येत नाहीं. आपल्या जीविताचीं सर्वच्या सर्व सूत्रें एकदम कमजोर होतात असें मला वाटत नाहीं आजवर होऊन गेलेल्या बुद्धिमान् लोकांचें समुच्चित शहाणपण त्याज्य मानण्यासारखी परिस्थिति सध्या प्राप्त झाली आहे असें प्रतिपादणें केवळ अत्युत्साहाचें निदर्शक आहे तें विवेकशीलतेचें निदर्शक आहे असें त्यासच म्हणता यावयाचें नाहीं. ''

प्रा माटे सनातनी असले तर ते या अर्थाने की नव्याच्या स्वागताच्या गडबडीत ते जुन्याची अवहेलना करू इच्छित नाहीत शतकानुशतक आपल्या पूर्वजांनी दीर्घ परिश्रम करून ज्ञानाचें जें संचित करून ठेविले आहे त्यातील अमर व चिरंजीव तत्त्वाचा कडकडून अभिमान धरलाच पाहिजे अशी त्यांची भूमिका आहे अस्पृश्यतेची त्यांनी जी उपपत्ति लाविली आहे, प्राचीन काळच्या त्रैवर्णिकांच्या वंशरक्षणाच्या प्रयत्नाचें जें विवेचन त्यांनी केलें आहे, परशुराम चरित्रांत पाच भिन्न मानववंशाची एकमूस करण्यासाठीं प्राचीनांनी जे दीर्घ व भव्य प्रयत्न केले त्याचा जो अर्थ विशद केला आहे, त्या सर्वांच्या मागें ही त्यांची पूर्वपरंपरेच्या अभिमानाची सनातनी वृत्तीच दिसून येत

मानव वंशांच्या एकीकरणाचे प्रयत्न प्राचीन समाजशास्त्रवेत्त्यांनी कसे केले यांचें विवेचन केलें आहे आज ते पाच वंश मिळून जो हिंदु समाज झाला आहे तो अगदीं चिरून फाडून गेला आहे पण म्हणून त्या वेळीं प्राचीनांनीं जे प्रयत्न केले, जें धोरण आखलें त्याचा अधिक्षेप करावा असें मात्र यांना मुळींच वाटत नाहीं उलट ते प्रयत्न म्हणजे समजसपणा व सहिष्णुता याचें एक प्रगल्भ उदाहरण होतें असें त्यांनीं म्हटलें आहे आणि त्यामुळेंच या देशाचें प्राचीन काळीं नंदनवन झालें असें आपलें मत सांगून टाकलें आहे क्षत्रिय संहारकर्त्या परशुरामाच्या कृत्यांचें त्यांनीं असेंच ऐतिहासिक दृष्टीने विवेचन केलें आहे ' भावी काळात जी आपल्या बहुविध गुणांनीं मानवी समाजाला भूषणभूत ठरली त्या एका जमातीचा स्वाभिमान टिकवून धरणारा महापुरुष म्हणून परशुरामाचें नाव सामाजिक इतिहासात चिरंजीव राहील ' असें त्यांचें मत आहे आजच्या काहीं सामाजिक वा राजकीय सोयींसाठीं शिवाजी किंवा राणाप्रताप यांना चुकलेले देशभक्त ठरवून त्यांची निंदा करणें हें अगदीं अनैतिहासिक होय तशा वृत्तीनें व्याख्यानाला आकर्षकपणा येतो, पण शास्त्री यता येत नाहीं आज मुसलमानांशीं सख्य करावयाचें आहे म्हणून त्या पूर्वीच्या काळीं शिवाजीनें केलेल्या कृत्यांची निंदा करणें हें जसें सयुक्तिक नव्हे त्याचप्रमाणें आज ब्राह्मण क्षत्रियांच्या ऐक्याचे आपण भोक्ते असलों तरी या भिन्न जमातींचा जेव्हां मिलाफ झालेला नव्हता, त्या वेळीं परशुरामानें आत्मरक्षणार्थ केलेल्या कृत्यांची निंदा करणें हेंहि सयुक्तिक नव्हे

तेव्हां अशा ऐतिहासिक दृष्टीनें त्रैवर्णिकांच्या, ब्राह्मणांच्या, मराठ्यांच्या त्या त्या काळच्या पराक्रमाचा, अभिमान धरणें व त्याचें योग्य मोल ध्यानात ठेवणें यातच या मार्टे यांचा सनातनीपणा आहे

पण त्यामुळें त्यांच्या विवेचक दृष्टीला कोठेंहि बाध आलेला नाहीं परशु रामाच्या पीठिकेचा जसा ते अभिमान धरतात तसाच तिची गरज संपताच तिला उच्छेद करून टाकणाऱ्या रामचंद्राचाहि त्यांना अभिमान आहे त्रैव र्णिकांच्या प्राचीन पराक्रमाचा ते अभिमान वहातात पण त्यांनीं त्या काळीं-सुद्धा अस्पृश्यांवर घोर अन्याय केला हें सांगण्यास ते कचरत नाहींत ऐति हासिक दृष्टीनें मागलीं विवेचनें करण्याचा हेतु असा कीं, या समजाच्या बांधणीतले दुवे नीट समजावे व त्यांतील कोणचे दुवे आज कच्चे झाले

आहेत हें त्यानीं यावें आज आपल्या देशात चतुर्वर्ण + अस्पृष्ट + व इ + मुसलमान + ख्रिस्ती यांची न देशाची समव्याप्ति मानावयास हवी आहे असें त्याचें मत आहे. ( अस्पृश्यांचा प्रश्न पृ २४५ ) एवढें एकीकरण जर करावयाचें आहे तर पूर्वीच्या काळीं असेच प्रयोग येथें कोणी कसे केले, त्यात त्याना यशापयश कसें आलें याचा अभ्यास करणें जरूर आहे त्या वरून जुनीं वैरें विसरण्याची आवश्यकता, देवाण घेवाण करण्याचें महत्त्व, आपआपल्या अभिमानाला मुरड घालण्याची आवश्यकता इ अनेक सामाजिक तत्त्वांची आपणास कल्पना येईल व पुढां मागल्या चुका होणार नाहींत

प्रा माटे यांच्या सनातनीपणाचा अर्थ हा असा आहे जुन्या रूढावर अधभक्ति हा जो त्या शब्दाचा रूढ अर्थ तो कोणत्याहि अर्थानें त्यांच्या प्रतिपादनाला लावता येणार नाहीं तसें असतें तर 'फक्त आम्ही चतुर्वर्ण लोकच या देशाचे मालक आहों हा हट्ट आमच्या धार्मिक तत्त्वज्ञानांतून गळाला पाहिजे' असें त्यांनीं सांगितलें नसतें तसें असतें तर असवर्ण विवाहाला धर्मे गोष्टीचा समाधितपणा प्राप्त करून दिला पाहिजे असा आग्रह त्यांनीं धरला नसता तसें असतें तर 'अस्पृश्यता निवारणाला शास्त्रविरुद्ध असलें तरी तें आपण बिल्कूल मानू नये' असा उपदेश त्यांनीं केला नसता तसें असतें तर वर्णकर्मांची चिकित्सा करून त्यांनीं चातुर्वर्ण्याला पाखंड ठरविलें नसतें आणि तसें असतें तर अस्पृश्यांच्या वस्तींत जाऊन त्यांनीं स्वत झाड लोट केली नसती

पण प्रा माटे हे रूढ अर्थानें सनातनी नाहींत, त्यांचा मन पिंड जगदीं अस्सल सुधारकाचा आहे यांविषयीं कोणास शंका असेल तर विज्ञनबोधास त्यांनीं लिहिलेली प्रस्तावना त्यानें वाचावी म्हणजे त्याना सनातनी म्हणणाऱ्या लोकांच्यापेक्षा ते शतपटीनें जास्त सुधारक आहेत हें त्याच्या ध्यानात येईल

या ग्रंथात प्रा माटे यांनीं शुद्ध भौतिकवादी समाजरचनेचा पुरस्कार केला आहे रानडे, भांडारकर प्रभृति पहिल्या पिढींतील सुधारकांपैकीं कोणींहि भौतिकवादाचें प्रतिपादन इतकें निक्षून केलेलें नाहीं आत्मा व परमात्मा याना अस्तित्व असेल तर ते जडच असले पाहिजेत, असें पूर्ण क्रान्तिकारक मत त्यांनीं प्रारंभींच सांगितलें आहे इंद्रियाना आज त्यांचें आकलन होत नसेल पण पूर्वी शाळाय साधनें नव्हतीं तव्हां अशाच अनेक गोष्टींचें आकलन

इंद्रियाना होत नव्हतें तसेंच आज आत्म्याचें होत नाहीं. त्याला जर अस्तित्व असेल तर साधनें वाढल्यावर केव्हा तरी त्याचें आकलन झालेंच पाहिजे, नाहीं तर त्याला अस्तित्वच नसलें पाहिजे, अशी ही विचारसरणी आहे

यावर आक्षेप घेऊन कोणी म्हणेल की ब्रह्मविदाना स्वानुभवानें ब्रह्म कळलें आहे म्हणजे विश्वाचें ज्ञान झालें आहे तर त्यावर 'ती त्याची आत्मरचना असली पाहिजे, ते स्वत चीच फसवणूक करीत असले पाहिजेत,' असें प्रश्नाप्रश्नाचें उत्तर आहे विश्वरोधाचें ज्ञान ब्रह्मवेत्याना तर नाहींच पण देवालाहि नसतें हें 'भवानी तलवारीचें' उदाहरण घेऊन त्यानीं स्पष्ट करून दाखविलें आहे भवानी देवीला जर शरीररचना बाबीं विशेष ज्ञान असतें तर तिनें आपला प्रियभक्त जो शिवाजी त्याला तरवार देण्याऐवजी मोठी तोफ किंवा अणुबॉम्बच द्यावयास हवा होता पण तिलाच तो माहीत नव्हता म्हणून तिनें दिला नाहीं इतकेंच. आता मानवाला तो कळला आहे. तेव्हा आता या पुढील शिवाजाला पुढील भवानी अणुबॉम्ब देऊ शकेल, हें खरें पण ती त्याच्यापेक्षा भारी शस्त्र मात्र देणार नाहीं कारण तें अजून मानवाला उमगलेलें नाहीं.

काम क्रोध इ जे षड्रिपु त्याची जुन्या वाङ्मयात नालस्ती केलेली आहे पण या बाबतीत त्यांच्या मतें षड्रिपु हे मानवाचे मित्र आहेत त्याचा अतिरेक झाला तर तेहि घातक ठरतील, तसे हे विकार मर्यादेबाहेर गेल्यास घातक ठरतील पण एरवी ते अत्यंत उदात्त असून त्यावरच संसार पोसतो, संसाराचे सर्व ऐश्वर्य आणि वैभव त्यावरच अवलंबून आहे असें त्यानीं प्रतिपादिलें आहे ते म्हणतात, 'काम हा शत्रु मानणें याइतकी मोठी चूक नाहीं, क्रोधाचा उपयोग केवढा तरी आहे, लोभामुळें माणसें केवढ्या प्रचंड उद्योगास हात घालीत आहेत, 'मद' हा वैभवाच्या स्थैर्याला उपयोगी पडतो आणि मत्सर हा तर संसाराचा रक्षिता आहे ' हें वाचल्यावर मला वाटतें, या बाबतीत त्याना कोणी सनातनी म्हणू धजणार नाहीं.

आत्मा, ब्रह्म, पारलौकिकज्ञान यांच्याविषयीं हें विवरण करून शेवटीं 'पार्थिव नियमाचें पालन हाच धर्म' असें आपलें मत त्यानीं सांगितलें आहे. साधुसंतानीं प्रतिपादिलेल्या जगाच्या मिथ्यात्वाचा विचार आपल्या समाजातून हाकलून लावला पाहिजे व संसारावर लोभ जडविला पाहिजे असें

स्वतःपर्णे त्यांनी सांगितले आहे शुद्ध अनुभवांनी व तर्कांनी त्या धर्म समजुती उध्वस्त केल्या त्या टाकाऊवास नाणखांनी उद्युक्त झाले पाहिजे, कारण स्वत म परिपूर्ण समजणे ही धर्मशास्त्राची मुळातच चूक आहे असा या ग्रथात त्यांनी उपदेश केला आहे

समाजाची रचना, त्याची उन्नति अवनति या विषयींचे सिद्धान्त, धर्मशास्त्र, विज्ञान याचे तेथले अधिकार, राजकारण व समाजकारण याचे संबंध, भिन्न समाजाचे एकीकरण, या विषयींचे आपले सर्व विचार श्री मटे यांनी अस्पृश्यांचा प्रश्न, विज्ञानबोध व परशुरामचरित्र या तीन बहुमोल ग्रथात सांगून ठेवले आहेत पाश्चात्यपौर्वात्य पंडितांच्या ग्रंथांचे अध्ययन, स्वत केलेला अभ्यास व दीर्घकाळचे मनन चिंतन ही पुण्याई त्या विचारांच्या मागे तर उभी आहेच पण याशिवाय प्रत्यक्ष सामाजिक क्षेत्रात उतरून कार्य केल्यामुळे मिळालेल्या अनुभवाची जोड त्या पुण्याईला मिळालेली आहे, हे विशेष होय

तीस ते पन्नास ह्या वयाची ऐन उमेदीची वीस वर्षे मटे यांनी अस्पृश्यता निवारणाच्या कार्यात प्रत्यक्ष खर्च केली आणि या काळात त्यांनी त्या कार्यासाठी अक्षरश तनमन आणि धनहि झिजविले आहे अस्पृश्यांच्यासाठी त्यांनी शाळा चालविल्या, त्यांनी देवालयप्रवेशासाठी बारक यांच्या मठापासून महाराजांपर्यंत सर्वत्र खटपटी केल्या मुसलमानांनी त्यांच्यावर आक्रमण करण्यासाठी केलेल्या कारवाया हाणून पाडल्या गावोगाव जाऊन व्याख्याने दिली, स्पृश्यांच्या सभा भरविल्या, अस्पृश्यांच्या, महार, मांग चांभार इ निरनिराळ्या जातींच्या परिषदा भरवून त्यांच्यात स्वत च्या हक्काविषयी जागृति निर्माण केली, वस्तीत जाऊन तेथे स्वच्छतेचे सप्रयोग घडे दिले, कोणाला शिष्यवृत्ति मिळवून द, कोणाला नोकरी मिळवून दे या किरकोळ पण महत्त्वाच्या खटापटीहि केल्या, दारू, जुगार इ व्यसनातून त्यांना मुक्त करण्याचे प्रयत्न केले, त्यांच्यापैकी काहींना गुन्हेगार जातीत गणतात हा अन्याय दूर करण्याचा प्रयत्न केला आणि या कामात असह्य निंदाप्रवादहि सोसले

येवढ्या प्रचंड खटाटोपातून बापुसाहेबांच्यासारख्या चिंतनशील प्रज्ञावंत पुरुषाच्या मनाला मानव समाजाच्या हालचालींविषयीच्या किती सिद्धान्ताचे आगमन झाले असेल याची आपणास सहज कल्पना करता येईल

अस्पृश्यता निवारणाच्या अनुभवांत मटे यांनी एक अनुभव सांगितला आहे

लक्ष्मी नावाची एक मांगाची दहा अकरा वर्षांची मुलगी रात्रीं दहा वाजता वाट चुकली होती. त्याच्या घरीं येऊन, 'मला घरीं नेऊन पोंचवा' असें अगदीं अकृत्रिमपणें बालभाषेंत तिनें याना सांगितलें. मांटे म्हणतात 'तिला पोंचवून घरीं येताना मला अत्यंत सुख होत होतें, कारण कीं चुकलेलें आणि भयभीत झालेलें मूल मी नेऊन आईबापाच्या हवालीं केलें होतें.'

या मांटे याचा मूळ पिंड या दयाबुद्धीचा व वात्सल्याचा आहे. त्यामुळें दुसऱ्यासाठीं अंग झिजविल्यावाचून त्याना चैन पडत नाहीं. एकदा अस्पृश्यता निवारणाच्या एका चळवळींत अस्पृश्यांशींच त्यांचा मतभेद झाला व तेच लोक त्याना अपमान करूं लागले तेव्हां त्याविषयीं बोलताना ते म्हणाले, कीं माझ्या देशांत माझी कोणालाच गरज नाहीं. असें झालें तर मी अन्यत्र जाईन. आफ्रिकेमध्यें जाईन. मेक्सिकोंत जाईन. तेथील लोकांना कोणाची गरज असेलच. 'त्याच्यासाठीं मी अंग झिजवीन. कारण त्यावाचून मला सार्थकता वाटतच नाहीं.'

सद्बुद्धीची ही थोर प्रेरणा हें त्याचें पहिलें बळ आहे. प्रत्यक्ष कार्यांतील अनुभव हें दुसरें बळ आहे. आणि दोन तपांच्या अवधींत केलेला पाश्चात्य पौर्वात्य पंडितांच्या ग्रंथाचा अभ्यास हें तिसरें बळ आहे. या विविध बळांच्या साह्यानें मनाशीं निश्चित झालेले सिद्धान्त या थोर समाजशास्त्रज्ञानें आपल्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथात ग्रथित केलेले आहेत. त्याचें अध्ययन व आचरण करणें हाच त्याचे अल्पसें उतराई होण्याचा मार्ग महाराष्ट्र जनतेच्या हातीं आहे.

---

स्पष्टपणें त्यांनी सांगितलें आहे शुद्ध अनुभवांनी व तर्कांनी ज्या धर्म समजुती उध्वस्त केल्या त्या टाकावयास माणसांनी उद्युक्त झालें पाहिजे, कारण स्वत स परिपूर्ण समजणें हा धर्मशास्त्राची मुळातच चूक आहे असा या ग्रथात त्यांनी उपदेश केला आहे

समाजाची रचना, त्याची उन्नति अवनति या विषयींचे सिद्धान्त, धर्मशास्त्र, विज्ञान याचे तेथले अधिकार, राजकारण व समाजकारण याचे सबध, भिन्न समाजाच एकीकरण, या विषयींचे आपले सर्व विचार प्रा माटे यांनी अस्पृश्याचा प्रश्न, विज्ञानबोध व परशुरामचरित्र या तीन बहुमोल ग्रथात सागून ठवले आहेत पाश्चात्यपौर्वात्य पडिताच्या ग्रथाचें अध्ययन, स्वत केलला अभ्यास व दीर्घकाळचें मनन चिंतन ही पुण्याई त्या विचाराच्या मागें तर उभी आहेच पण शिवाय प्रत्यक्ष सामाजिक क्षेत्रात उतरून कार्य केल्यामुळे मिळालेल्या अनुभवाची जोड त्या पुण्याईला मिळालेली आहे, हें विशेष होय

तीस ते पन्नास ही वयाची ऐन उमेदीची वासवर्षे माटे यांनी अस्पृश्यता निवारणाच्या कार्यात प्रत्यक्ष खर्च केलीं आणि या काळात त्यांनी त्या कायासाठीं अक्षरश तनमन आणि धनहि झिजविलें आहे अस्पृश्याच्यासाठीं त्यांनीं शाळा चालविल्या, त्यांनीं देवालयप्रवेशासाठीं वारकऱ्याच्या मठापासून महारमाळीपर्यंत सर्वत्र खटपटी केल्या मुसलमानांनीं त्याच्यावर आक्रमण करण्यासाठीं केलेल्या कारवाया हाणून पाडल्या गावोगाव जाऊन व्याख्यानें दिलीं, स्पृश्यांच्या सभा भरविल्या, अस्पृश्याच्या, महार, माग चामार इ निरनिराळ्या जातींच्या परिषदा भरवून त्याच्यात स्वत च्या हक्कांविषयीं जागृति निर्माण केली, वस्तीत जाऊन तेथें स्वच्छतेचे सप्रयोग धडे दिले, कोणाला शिष्यवृत्ति मिळवून द, कोणाला नोकरी मिळवून दे या किरकोळ पण महत्त्वाच्या खटपटीहि केल्या, दारू जुगार इ व्यसनातून त्याना मुक्त करण्याचे प्रयत्न केले, त्याच्यापैकीं काहींना गुन्हेगार जातींत गणतात हा अन्याय दूर करण्याचा प्रयत्न केला आणि या कामात अक्षरश निंदाप्रवादहि सोसले

येवढ्या प्रचड खटाटोपातून जाणून देशाच्यासारख्या चिंतनशील प्रज्ञावत पुरुषाच्या मनाला मानव समाजाच्या हालचालींविषयींच्या जिवंत सिद्धान्ताचे दर्शन झाले असेल याची आपण स सहज कल्पना करतां येईल

अस्पृश्यता निवारणाच्या अनुभवात माटे यांनी एक अनुभव सागितला आहे

माट्यांच्या मनावर बसली. कै. देवधर आगरकरांच्या तेजस्वी परंपरेतले. अर्थात् त्यांचे विचार तर्कशुद्ध आणि मांडण्याची हातोटीहि अजब. तो विचाराचा कणखरपणा माट्यांच्या मनात कायमचा रुजला. रामदासांची तर्काबद्दलची सारी प्रमेये माट्यांना का प्रिय, त्याचे हे रहस्य आहे. येथपर्यंत मनाची ज्ञानलालसा तृप्त होत होती. पण आपण केवळ शिक्षकाचा 'धंदा' करणारे म्हणून मरणार नाही या प्रतिज्ञेमुळे त्यांचे मन स्वस्थ राहीना. कै. टिळकांच्या राजकीय विचारसरणीचा परिणाम त्यांच्यावर होणे अटळ होते. हिंदुसमाजाबद्दल तळमळणाऱ्या रामदास, विष्णुबुवा ब्रह्मचारी या महात्म्यांची स्फूर्तिप्रद चरित्रे स्वस्थ बसू देत नव्हती. तशात विलक्षण दारिद्र्याचा अनुभव यांच्या घराण्यातील लोकांनी अनुभवलेला. दारिद्र्याचे दोन मोठे विलक्षण परिणाम होतात. दारिद्र्याच्या वणव्यातून होरपळून गेलेला मनुष्य दारिद्र्याचा अपरंपार तिरस्कार करू लागतो तर दुसऱ्या होरपळलेल्या हृदयात या दारिद्र्याबद्दल अनिर्वचनीय ममत्व निर्माण होते. प्रा. माट्यांच्या मनावर दुसऱ्या प्रकारचा परिणाम झाला. हिंदुसमाजातील अस्पृश्य म्हणून हीन गणल्या गेलेल्यासंबंधी आपल्याला काय करता येईल असा विचार यातूनच निर्माण झाला. या विचाराचा प्रक्षोभ झाला आणि माट्यांनी अस्पृश्योद्धाराचे असिधाराव्रत पत्करले!

(४) १९१७ साली हा यज्ञ सुरू झाला एका सामान्य पण ज्ञानतपस्वी शिक्षकाने हा सुरू केला. यापुढची वीस वर्षे म्हणजे आपत्तींचा, कष्टाचा, ध्येयसाफल्यासाठी तडफडणाऱ्या आशावादी जीवाचा इतिहास आहे. या वीस वर्षांत वैयक्तिक जीवनाचा केकार माट्यांनी पुरेपूर केला. आजहि अस्पृश्यतानिवारणावर आग पाखडणारे भेटतात तर त्या हरिजनांची वृत्ति काय असावी याची कल्पना येते. सुधारक म्हणवणाऱ्यांची गत तीच होती, त्यांची व या दलित वर्गाची गाठ नित्य पडे. पण ह्या गाठीभेटीच्या जागा वेगळ्या असत. माट्यांनी मात्र त्यांच्या ... आणि अंतःकरणात बरोबर प्रवेश केला. रोज रात्री आठाच्या सुमाराला हातात कंदिल घेऊन बाहेर पडावे, शहराच्या दुसऱ्या टोकाशी जावे तगारा वाचवावा आणि जमलेल्या किंवा जमविलेल्या निरक्षरांना लिहिण्या-

मास्तरांच्या मनावर बसली के देवधर आगरकरांच्या तेजस्वी परंपरेतले अर्थात् त्यांचे विचार तर्कशुद्ध आणि माडण्याची हातोटीहि अजब तो विचाराचा कणखरपणा मास्तरांच्या मनात कायमचा रुजला. रामदासांची तर्कावरल्ची सारी प्रमेयें मास्तराना का प्रिय, त्याचें हें रहस्य आहे येथपर्यंत मनाची मीनललसा तृप्त होत होती पण आपण केवळ हिंदुत्वाचा 'शूद्र' म्हणूनच म्हणून मरणार नाही या प्रतिभिमुळें त्यांचे मन स्वस्थ राहीना कै टिळकांच्या राजकीय विचारसरणीचा परिणाम त्यांच्यावर होत असला होत. हिंदुसमाजाबद्दल तळमळणाऱ्या रामदास, विष्णुबुवा ब्रह्मचारी या महात्म्यांचा स्फूर्तिप्रद चरित्रें स्वस्थ बसू देत नव्हती. त्यात विलक्षण दारिद्र्याचा अनुभव त्यांच्या घराण्यातील लोकांनी अनुभवलेला दारिद्र्याचे दोन मोठे विलक्षण परिणाम होतात दारिद्र्याच्या वणव्यातून होरपळून गेलेला मनुष्य दारिद्र्याचा अपरंपार तिरस्कार करू लागतो तर दुसऱ्या होरपळलेल्या हृदयात या दारिद्र्याबद्दल अनिर्वचनीय ममत्व निर्माण होते ग्रा मास्तरांच्या मनावर दुसऱ्या प्रकारचा परिणाम झाला हिंदुसमाजातील अस्पृश्य म्हणून हीन गणल्या गेलेल्यासबंधी आपल्याला काय करता येईल असा विचार यातूनच निर्माण झाला या विचाराचा प्रक्षोभ झाला आणि मास्तरानीं अस्पृश्योद्धाराचें अभियानात पत्करलें !

(४) १९१७ साली हा यज्ञ सुरू झाला एका सामान्य पण ज्ञान संपन्न शिक्षकानें हा सुरू केला त्यापुढची वीस वर्षे म्हणजे आपत्तींचा, कष्टाचा, ध्येयसाफल्यासाठीं तडफडणाऱ्या आशावादी जीवाचा इतिहास आहे या वीस वर्षांत वैयक्तिक जीवनाचा देकार मास्तरांनी पुरेपूर केला आजहि अस्पृश्यतानिवारणावर आग पाखडणारे भेटतात तर त्या काळीं इतरेजनांची वृत्ति काय असावी याची कल्पना येते सुधारक म्हणणे याची गत तीच होती त्यांची व या दलित वर्गाची गाठ नित्य पडे त्या गाठीभेटीच्या जागा वेगळ्या असत मास्तरांनीं मात्र त्यांच्या आणि अंतःकरणात बरोबर प्रवेश केला रोज रात्रीं आठाच्या सुमारास हातात कंदिल घेऊन बाहेर पडावें, शहराच्या दुसऱ्या टोकाशीं जावें नगारा ताजवावा आणि जमलेल्या किंवा जमविलेल्या निरक्षराना लिहिण्या–

वाचण्याचे धडे पाठ द्यावेत केवढें कष्टाचें, चिकाटीचें आणि पदोपदीं निराशा उत्पन्न करणारें हें काम आहे पण, मार्टे एवढें करून भागणारे नव्हते त्यांना स्वच्छता शिकवायची होती तर मास्तरांनीं स्वतःच्या हातानें उकिरडे साफ करावेत, खाल्या झाडाच्यात आणि दलितांना धडे द्यावेत उच्च वर्गीय हिंदूंनी ज्यांना छळ निर्मिक वर्षे केला त्या मानव्याच्या उत्कर्षासाठीं ही सेवा त्यांनीं सुरू केली या पुण्याच्या परिसरात कचित् बावीस आणि कधींकधी सतरा रात्रीच्या शाळा त्यांनी सुरू केल्या आणि बरोबरीच्या सहकार्यात मुख्य वाटा कुणाचा तर विद्यार्थ्यांचा ! थोरामोठ्यांचीं, श्रीमंतांचीं मुलें या कार्यांत हिरीरीनें पडलीं होतीं मास्तरांच्या आदर्शावर त्यांचा दृढ विश्वास होता पालकहि अशा खात्रीनें मुलें पाठवीत कीं या गृहस्थाच्या संगतींत आमच्या मुलांचें होईल तर कल्याणच होईल हे सारे ज्ञानगण या जीवनाच्या शास्त्रगृहात सार्वजनिक कार्याचा ओनामा या ठिकाणींच शिकले ‘कणाकणानें काम होतें’ या सूत्रावर मास्तरांचा फार विश्वास आहे कोणताहि विद्यार्थी असो, त्याच्या कार्यशक्तीचा उत्कृष्ट वापर ते करून घेत हे सारें करीत असताना त्यांनीं आपलें एकचित्त या कामाकडेच लावलें होतें सर्व सामाजिक सुधारणेचा बोजा एकदम उचलून कार्य अर्धवट टाकून द्यावयाचें त्यांनीं कटाक्षानें टाळलें शिवाय या कार्याला कोणत्याहि प्रकारचा ‘मिशनरी पद्धतीचा ‘वास’ त्यांनी लागू दिला नाहीं आणि हें सारें करीत असतानाच मानवी मनाचीं विविध दर्शनें त्यांनीं पाहिलीं तुकारामानें टाहो फोडून वर्णिले या सहानुभूतीची गगोत्री त्यांना या ठिकाणीं सापडली शुद्ध मनाचे मनोहर आविष्कार त्यांनी इथेंच पाहिले सामाजिक अप्रतिष्ठेमुळे तळमळणारे महात्मे याच ठिकाणीं त्यांना भेटले लावण्याचे, लोककथांचे, संकेताचे आणि वाङ्मयाचें मूलधन त्यांना या जगाच्या सरस्वतीच्या तळाशीं सापडलें ‘सृष्टानें दिलेल्या मनबुद्धीच्या सामर्थ्याचा ज्या बाजें असतात त्यांना विकसनास आणि विकसित झालेल्या सामर्थ्याच्या वापरास प्रत्येक माणसाला संधी मिळाली पाहिजे ” या महामंत्राचा उगमहि याच पवित्र स्थळीं झाला ज्या नव्या दृष्टीनें अनेकांना मंत्रमुग्ध केलें, त्या सामाजिक दृष्टीचा विकास याच ठिकाणीं झाला या सामाजिक दृष्टीच्या तळावर गूढस्थळावर प्रकाश पडला अनेक

विद्यार्थ्यांना या दृष्टीने पुनीत केले ज्या सामर्थ्यावर माढ्यानी विपुल वाङ्मय निर्मिति करून, नामवत साहित्यिकाकडून मानाचा मुजरा मिळविला त्या सामर्थ्याच उगमस्थान हीच सामाजिक दृष्टि होय

(५) पण बाबरोबरच वैचारिक सिद्धताहि त्यानी खरेंनें केली 'दारिद्र्य हा माझा सर्वश्रेष्ठ गुरु आहे' या माढ्यांच्या उक्तीला फार मोठा अर्थ आहे त्यांच्या खालोखाल जर कुणाचा परिणाम झाला असेल तर तो तुकारामाचा 'इंद्रायणीच्या तीरावर' हा त्याचा लेख वाचून एका आदरणीय भगवद्‌भक्तानें त्याना गौरवाचें भले मोठें पत्र पाठवून विचारलें, "तुम्ही तुकारामाचा एवढा सूक्ष्म अभ्यास केव्हा केलात ? तुकारामाच्या जीविताचें रहस्य आज आम्हाला कळलें !" यांखेरीज सर्व संतवाङ्मयाचा सखोल अभ्यास त्यानी केला सरकारमार्फत प्रसिद्ध झालेले अखिल भारतातील सर्व जातींचे इतिहास व भले मोठे ग्रंथ त्यानी चिकित्सेनें वाचले मनुस्मृति आणि महाभारत तील शेलक्या प्रकरणांची पारायणें तर कितीतरी झाली यांच्या जोडीला अवांतर वाचन तर विपुल झालें पण अमका असें म्हणतो, याचें हें म्हणणें आहे, त्याला वसें वाटतें म्हणून त्यानी कोणताहि विचार पकरला नाही त्याप्रमाणें अप्रिय पण तर्कनिष्ठ विचाराला आपला कायमचा सोबती बनविलें काटलाहि ग्रंथ असो, लेख असो, व्याख्यान असो, 'तुम्हाला काय म्हणावयाचें आहे ?' हा त्याचा रोकडा सवाल असतो, अवतरणाच्या व आधाराच्या डोंगरातून जेव्हां मूषकराज बाट काढताना त्याना दिसतात तेव्हा मनापासून माढे म्हणतात, 'ह्याना अजून स्वतंत्र विचार करायला शिकायच आहे' या त्यांच्या उद्गारानें कित्येक तथाकथित विद्वानाना बेचैन केलें आहे पण माढ्यांच्या मनातून केणाला कमी लेखावें असें निश्चित नसतें या सान्याचा परिणाम म्हणजे भयंकर अनुभवाखेरीज आणि तर्काच्या निरहित एक अक्षरहि लिहिण्याचा मोह त्याना टाळता आला उत्कृष्ट लेखकाचें जीवनहि अनुभवानें समृद्ध असावें लागत विशाल सहानुभूतीचा अखंड झरा त्यांच्या जीवितामोवती खेळावा लागतो आणि नंतरची गोष्ट म्हणजे याचा आविष्कार लेखन आणि वक्तृत्व या दोन मार्गानीं, माढ्यानी महाराष्ट्राच्या उज्ज्वल परंपरेंत मोलाची भर घातली साऱ्या महाराष्ट्रात त्याचे वक्तृत्व गाजलें ! मग कॉलेजमध्यें आम्ही त्यांच्या वक्तृत्वाचा आनंद मनसोक्त लुटला असल्यास काय नवल !

(६) आपण कुणासमोर बोलत आहोत हें ते कधींहि विसरत नाहींत, हाच त्यांच्या वक्तृत्वाच्या प्रभावांतील प्रमुख घटक आहे. या घटकामार्गेच भाषा-विचार येतो. माट्यांचें वक्तृत्व चिनखापी नाहीं. त्या वाङ्मयात घोषणा नाहींत. भरजरी कामामुळे डोळ्यावर येणारी धुंदीहि नाहीं. माट्यांच्या वक्तृत्वात भयानक रणगर्जना नाहींत, अंगविक्षेपहि नाहींत. अथांग सागराचा गद्द घोष त्या वाणींच्या विलासात दिसेल. महाराष्ट्रातील गंगागोदेच्या परिसरातील शुचिता त्यांच्या वाणीला कायमची अंगभूत होऊन बसलेली आहे. कडाक्याच्या प्रतिपादनाच्या वेळीं सोसाट्याचा वारा वाहील पण तो वारा शिवथरच्या घळींत पावन झालेल्या रामदासाच्या कर्मभूमींतला ! वक्तृत्वाच्या ऐन भरात ' व्युत्पत्तीची ' नाजुक शलाका फेंकून ऐकणाऱ्याचें मन ते बेभान करतील ! वादविवाद सभेत गोविंदाग्रजांचा स्मृतिदिन होता. आचार्य अत्र्यांनीं परशुराम भाऊ कॉलेजमध्यें सभागृह पाडून ताम गर्जून टाकलें. आणि नंतर माटे उभे राहिले. माट्यांचें भाषण संपल्यावर तब्बल दहा मिनिटें टाळ्यांचा कडकडाट झाला. अत्रे सद्गदित होऊन म्हणाले, ' माटे तुम्ही सभा जिंकलीत ! ' पहिल्या वर्षाचें मध्यावर त्यांनीं जातिसंस्थेवर दिलेलीं तीन व्याख्यानें आमच्या कायमच्या स्मरणांत आहेत ! ' मराठी वाङ्मयाच्या आरंभस्थानीं पुरःसरता हा शब्द पायाच्या शिलाखंडावर कोरलेला आहे ' या उद्गारानें एकदा सुरुवात झाली कीं बस्स ! ' संत हे मूळचे कवी नव्हते. कवित्व त्यांनीं नंतर स्वीकारलें. ' मूळचे ते गत, ' ' निरनिराळ्या धंद्यांतील लोकांनीं वाङ्मय लिहायला लागावें म्हणजे त्यांत विविधता येईल, ' अलंकार वाढतील, ' ' रामदास हा संतांचा संत होता महाराज, ' ' मोरोपंत दुर्बोध वाटण्यास सामाजिक कारणें आहेत, ' ' पोवाडे म्हणजे स्वातंत्र्याच्या अग्नितेजांतील निखारे आहेत, ' ' ज्ञानेश्वराच्या गळ्याला सुळी लागली याचा अर्थ वेगळा आहे, ' ' हें दैवत जागृत आहे ह्यालाही अर्थ दुसराच आहे, ' ' महाराष्ट्रांत अशोकवनें तीन का झालीं कारणें तशींच आहेत !, ' ' वासुदेव, मुरळ्या, भामनोडी, गोंधळी ह्या आपल्या सामाजिक संस्था आहेत, ' ' गडकऱ्यांच्या नंतर अत्र्यांनीं मिळविलेलें यश निःसंशय श्रेष्ठ दर्जाचें आहे, ' ' शंकर हें अनार्यांचें दैवत, ( मग गृहस्थहो मला क्षमा करा— ) आहे पण तें पत्करलें पाहिजे, ' ' पंचमानव हिंदु समाज ही अभ्यसनीय वस्तु आहे, '

'त्याचप्रमाणें सोपी वस्तु अवघड करून सांगणें ही सर्वश्रेष्ठ कला आहे,' 'तुमच्या विस्मरणशीलतेवरच माझा दृढ विश्वास आहे,' 'टिपणें घेणें (विद्यार्थी मुलींना उद्देशून--) म्हणजे कारकुनी नव्हे,' 'मीहि तुरुंगात गेलों आहे' (नंतर--'गांधींना भेटायला') हुस याची वस्तु आपलीच आहे असें त्याला वाटतें त्याची ममत्वबुद्धि मोठी आहे सत आणि चोर हे या दृष्टीनें एकच' हे आणि वर उद्धृत केलेले उद्गार म्हणजे विविध विचार आणि विनोद निर्माण करणारीं कारंजीं आहेत या मनोहर जलक्रीडेचा आम्ही यथेच्छ आनंद लुटला एकेका विचाराचें स्पष्टीकरण मांडे करूलागले कीं, त्यांना स्फुरण येत असे झाशीच्या शूर लक्ष्मीबाईच्या किंवा तत्सम शूर स्त्रीच्या संबधात बोलताना त्यांचा आवाज विलक्षण चढे. आणि मग वक्तृत्वातील सर्वस्व पणाला लावून ते स्त्रीजीवनाची महत्ता गात असत. मराठीची भाषा कृत्रिम आणि अवघड आहे हे म्हणणाऱ्यांनी त्यांच्या कार्यक्षेत्राच्या पार्श्वभूमीचा बारकाईनें विचार करावा जुने व चलन पावलेले शब्द जाणून भाषाप्रभुत्वाच्या नादाला ते कधींच लागले नाहींत, 'अविस्मृत अविस्मरणीय, लीलया, महात्मता' असल्या पठित पांडित्याचा पाठपुरावा त्यांनी केला असता तर तो पोरखेळ ठरला असता 'बुद्धिवादापासून श्रद्धेपर्यंतचा प्रवास' हे त्यांचें व्याख्यान मराठी शब्दसृष्टींतलें कोरीवलेणें आहे व्यक्तित्व आणि वक्तृत्व या दोहोंचा मनोहर मिलाफ म्हणजे माटे 'Style is the man' हे सर्वांर्थानें माटयांच्या बाबतींत प्रत्ययाला येते अशा प्राध्यापकांच्या तासाला कोण रमणार नाहीं? या ज्ञानाच्या सदावर्तांतूनच आम्हाला उच्च शिक्षण मिळाल.

(७) उच्च शिक्षण ही शब्दसहती आपण फार वेळा योजतो पण तिचा अर्थ काय आहे हें आपल्या ध्यानात येत नाहीं थोर शिक्षणशास्त्रज्ञ या बाबतींत काय म्हणतात याचा सविस्तर प्रपंच करण्याचें हें स्थळ नव्हे. पण प्रचीतीनें ही गोष्ट कळते केवळ नेमलेल्या पुस्तकाचें विवेचन हाच अर्थ येथें बरोबर नाहीं पण भावार्थ असा नव्हे कीं वाटेल त्या गप्पा मारणें म्हणजे उच्च शिक्षण उच्च शिक्षण हें कीं जे जीवनविषयक दृष्टिकोण तयार करतें, अस्फुट शक्तीचा विकास करतें, श्रेष्ठ प्रकारची सस्कृति निर्माण करतें विचाराला चालना देऊन त्यातून नव्या कल्पना निर्माण करणें हें

उच्च शिक्षण किती तरी प्रकारची मुलें मुली आणि तीही वेगवेगळ्या थरातली महाविद्यालयात येतात परंतु त्या सर्वांच्या मनाला आवाहन करील अशी विचारसरणी प्रतिपादन करणें व विद्यार्थ्यांना कार्यप्रवृत्त करणें हे कार्य अवघड आहे माटे वर्गात कार्याच्या अभिनव कल्पना मांडीत आपल्या देशाच्या विविध कार्यविभागाची ओळख करून देत स्वातंत्र्याकरिताच्या आजवर केल्या गेलेल्या विविध मार्गांची मार्मिक चिकित्सा करीत व स्वातंत्र्या साठी प्रत्येकानें काय करावें हें सांगत सामुदायिक ज्ञानमंडळें ही तर माट्यांची प्रिय कल्पना या कल्पनेच्या बळावरच 'विज्ञानबोध' 'सार स्वरिक' आणि लवकरच प्रसिद्ध होणारा 'हिंदुत्वाचें पुनरुत्थान' हे ग्रंथ तयार झाले या कार्यांतून नवे लेखक महाराष्ट्राला मिळाले सामुदायिक ज्ञानार्जन या कल्पनेंतून प्रत्यक्ष लेखनाचे धडे आणि संपादनाची शास्त्रीय पद्धत विद्यार्थ्यांना लाभली माट्यांचा विद्यार्थी शब्दप्रामाण्यावर कोणतेंहि विधान पत्करणार नाहीं त्याच्या मनात निवड शक्तीची जोपासना झालेली जीवनातील संकटकाळीं तो डगमगणार नाहीं आणि शेवटची व सर्वांत प्रमुख गोष्ट म्हणजे तो आपल्या चारित्र्याला सदैव अकलंकित राखील हें सर्व माट्यांच्या सहवासात अनेकांनीं मिळवलें यालाच उच्च शिक्षण म्हणणं मुळींच अयोग्य होणार नाहीं

(८) जी गोष्ट वक्तृत्वाची तीच लेखनाचा 'अस्पृश्यां'चा प्रश्न हा ग्रंथ त्या विषयावरचा पहिला आणि अखेरचा शब्द आहे अनुभवलेलीं दु खें पाना पानातून प्रकट होऊन आपलें हृद्गत सांगत आहेत विज्ञानबोधाची प्रस्ता वना म्हणजे माट्यांच्या दृष्टिकोणातील अलौकिक पैलू आहे माटे ललित साहित्य लिहायला लागले त्याला कारणीभूत देखील त्यांचे विद्यार्थीच झाले पण ललित साहित्यात किती वेगानें त्यांनीं लोकप्रियता मिळविली याची साक्ष उपेक्षितांचे अंतरंग, अनामिका, आपआपले हितगुज, रसवंतीची जन्म कथा हीं पुस्तकें देतील श्री केळकरांच्या गद्यपद्यावरील अभंगांच्या अनु रोधानें माट्यांनीं केलेली वाङ्मयीन चमत्कृत चटका लावणारी आहे जें जीवन त्यांनीं अनुभविलें त्याचाच पडसाद वाङ्मयात उमटला अर्थात् कृत्रिमतेचा प्रश्नच त्यात उद्भवत नाहीं शिवाय ललित साहित्यात देखील त्यांनीं सामाजिक दु खानाच वाचा फोडली त्यामुळेंच त्यांनीं निर्मिलेली

पात्रें आपआपल्या वर्गाची वरून वदाणी उच्च स्वरानें सांगताना दिसतात. माटयांनीं त्यांचें अंत:करण प्रथम ओळखलें. दुःखें समजावून घेतलीं आणि त्यांचे गान्हाणें त्यांच्याच उत्स्फूर्तपणानें जगापुढें मांडलें. हें स्पष्ट करीत असतां नाच यातूनच सुंदर चिंतनात्मक निबंधहि निर्माण झाले. ' माझें मनोराज्य ' हा गद्योद्गार माटयांच्या शुद्ध ध्येयवादी मनाची ओळख करून देतो. ' सगाजीबुवा ' ' बिन्या ' ' देवकाई ' हीं वाङ्मय-सृष्टीतलीं पात्रें अनेकांच्या कायमचीं स्मरणांत राहतील ! परंतु माटयांच्या वाङ्मयाचें सविस्तर रसग्रहण करणें या ठिकाणीं प्रस्तुत नाहीं. आविष्काराच्या या एका प्रकाराचें ओझरतें दर्शन व्यक्तित्वाची ओळख स्पष्ट व्हावी म्हणून घेतलें.

( ९ ) ' विद्यार्थी हेच माझे खरे मित्र आहेत ' हा उद्गार माटयांच्या परिचितांना अपरिचित नाहीं. आणि शेवटपर्यंत हा बाणा त्यांनीं चालविला आहे. कोणताहि गरीब विद्यार्थी येवो, माटयांनीं त्याला मदत केलेली आहे. गुणी विद्यार्थ्यांच्या गुणाचा त्यांनीं उपयोग करून घेतला, त्यांना उत्तेजन दिलें. कै. श्रीनिवास पाटणकर याची नुसती आठवण झाली तरी त्याचा जीव तगमगतो. प्रत्येकाला ते आपले जवळचे मित्र वाटतात. याचा प्रत्यक्ष अनुभव कॉलेजमधून निघालेल्या सहलींच्या वेळीं फार आला. पुरंदर, बनेश्वर, थेऊर, अरण्येश्वर, लोणावळा, जुन्नर इ. ठिकाणीं त्यांनीं केलेलीं मनोगतें डोळ्यापुढें उभीं राहतात. अशा ठिकाणीं ते स्वतःबद्दल सविस्तर हकीगती सांगत. तशीच विद्यार्थ्यांच्या जीविताची संपूर्ण माहिती मिळवीत द्रव्यार्जन करून गरिबीनें विद्या करणाऱ्या विद्यार्थ्यांबद्दल त्यांना विलक्षण धन्यता वाटे. पुरंदरवर एका उंच ठिकाणीं उभें राहून त्यांनीं समोर पसरलेल्या महाराष्ट्राचें इतकें उत्कृष्ट वर्णन केलें कीं, आमच्या सहलींतले एक माननीय प्राध्यापक म्हणाले, ' माटे, तुमचें आजचें वर्णन ऐकून मी तल्लीन झालों होतों ! ' संस्कृत आणि मराठी वाङ्मयाचा दीर्घ व्यासंग आणि चिकित्सापूर्वक विचार करणाऱ्या त्या प्राध्यापकाच्या उद्गाराला फार मोठा अर्थ आहे. तीच गोष्ट फिरायची. ' फिरणें ही आमची एक संस्था ' असें माटे नेहमी म्हणतात. माटयांच्या बरोबर संध्याकाळीं सहल करणें हें एक लोभनीय आकर्षण आहे. नानातऱ्हेच्या विषयावर ते मार्मिक बोलतात. आणि फिरणें संपल्यावर हसून म्हणतात, ' आज फार बोललों नाहीं ! '

(१०) 'अक्रा नवें' या कालखंडाला योगायोगानें वाङ्मयात करुण मधुर स्थान प्राप्त झालें आहे. प्रा. माट्यांच्या महाविद्यालयीन कालाचीं तीं सुखप्रद वर्षें संपलीं. पण स्मृति नष्ट होणें कठीण. महाराष्ट्राच्या थोर शिक्षक परंपरेंत त्यांचें स्थान फार मोठें आहे. म्हणूनच मी गुरुजनांस म्हटलें, 'एक थोर शिक्षक आणि कनवाळू मित्र' आम्हांला लाभला. प्रा. माट्यांच्या व्यक्तित्वाचें क्षणदर्शन होऊन त्यांतून निर्माण होणाऱ्या विशुद्ध आनंदाचा प्रत्यय माझ्या मित्रांना लाभला तरी या लेखनाचें सार्थक झालें असें मी आनंदानें मानीन.

---

## प्रा. माटे : : : ७

जेम्स जॉन रवेन, बी. ए., फर्स्टक्लास ऑ.

---

काव्याची व्याख्या करताना प्रा. माटे यांनी एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, काव्य हें इतकें विविधाङ्ग असतें कीं एका व्यक्तीला एकाच वेळेला त्याचें समग्र दर्शन घडूच शकत नाहीं. एखाद्या हिऱ्याप्रमाणें त्याला अनंत स्थूल आणि सूक्ष्म पैलू असतात. व्याख्या करावयास निघालेला कवि किंवा रसिक यांच्या अल्पबुद्धीला त्यातला एखादाच पैलू दृग्गोचर होतो व त्या पैलूच्या दर्शनानें दिपून जाऊन भाबडा रसिक त्या एका पैलूलाच काव्याची व्याख्या समजू लागतो. प्रा. माटे यांच्या बाबतींत माझें थोडेसें त्या भाबड्या रसिका सारखें झालें आहे असें मला वाटतें. किंबहुना, एखाद्या विशाल वस्तूचें समग्र दर्शन त्या वस्तूपासून मर्यादित अंतरावर असलें म्हणजेच होतें, त्या

निशाण वस्तूच्या अगदी जवळ येणाऱ्याला त्या वस्तूचें सामग्र्यानें दर्शन होणें केवळ अशक्यच असतें त्याच्या दृष्टीच्या टप्प्यात त्या वस्तूचा एखा दाच भाग येतो प्रा माटे यांच्या दृढ परिचयाचा लाभ मला झाल्यामुळे माझ्या दृष्टीला त्याच मोठें व्यक्तिमत्व (Personality) येणं स्वाभाविक आहे असें इतराना वाटेल पण पोटच्या मुलाला तरी आपल्या पित्याचं समाजातील स्थान कुठे ठाऊक असतें? येवढें मात्र खर कीं, त्या एखाद्या भागाचें दर्शन मात्र त्यास दुरून बघणा ऱ्यापेक्षा अधिक यथार्थतेनं होतं

गोकसराच्या सानिध्याचा, त्यांच्या दृढ परिचयाचा लाभ करून घेण्याची संधि कॉलेजमधील मुलांना आम्हा मुलींपेक्षा नेहमीच जास्त मिळते आणि तसें होणें हें नैसर्गिकहि आहे परंतु आमच्या बापूच्या-हो, मी त्याना 'प्रा माटे' या औपचारिक नावानें के हाच संबोधीत नाहीं मग या लेखात तरी तो औपचारिकपणा मी ओढून ताणून का आणू? इतराचे ते 'प्रा श्री म माटे, एम् ए' असतील, पण आमचे मात्र ते 'आमचे बापू' आहेत—आमच्या बापूच्या बाबतीत मात्र वरील नियम लागू पडत नाहीं बापूच्यापाशीं 'हा मुलगा,' 'ही मुलगी' असा पंक्तिभेद कधींच नव्हता यामुळें आम्हालाहि यांच्याशीं मनमोकळेपणानें वागायला कधींच हरकत वाटली नाहीं बापूच्या मनाच्या या औदार्यामुळेंच बापूच्या सानिध्याचा लाभ घेण्याचा, त्यांच्या प्रेमळ सहवासात वागण्याचा, त्याच नाना प्रकारचे नवे सामाजिक राजकीय विचार ऐकण्याचा, त्यांच्या घरीं हकाने जाण्याचा, बापूच्या घरातील कौटुंबियाशीं निकट संबंध येण्याचा, या आणि असाच कितीतरी अमूल्य गोष्टींचा लाभ मला घेता आला याबद्दल स्वत ला किती भाग्यवान् समजावें हेंच मला केव्हा केव्हा समजत नाहीं

मी बापूना प्रथम पाहिलं तेव्हा मी 'एफ् वाय्'ला होतें आमच्या वर्गावर त्यांचा पहिला तास होता ते हा आमच्या वर्गात प्रविष्ट होत असतानाची त्यांची मूर्ति अजूनहि मला स्पष्टपणें आठवते बापूची ती उंच, ताठ आणि भरदार शरीरयष्टि, तो जु या पद्धतीचा लांब कोट, काळी उंच टोपी, पायात मोजे आणि बूट, हातात एक मोठी छत्री, त्या भरदार मिशा, गंभीर परंतु विचित् स्मित वदन, त्यांच्या चमकदार लहानशा डोळ्यातून व्यक्त होणारें त्यांच्या बुद्धिमत्तेचें तेज, त्यांच्या स्वाभिमानी चालण्यातून सुद्धा प्रकट होणारी त्यांचीतारुण

वृत्ति आणि स्वाभिमान,—हीं त्यांचीं व्यक्तिविशेष वैशिष्ट्यें मी बापूंना अगदीं प्रथम पाहिलें तेव्हा माझ्या दृष्टिपथातून सुटलीं नाहींत

'झंकार' मधून प्रसिद्ध झालेलें त्यांचें 'उपेक्षितांचें अंतरंग' मी क्रमशः वाचीत आलें होतें बापूंचें मी वाचलेलें तें पहिलें लिखाण होय! त्या वेळीं मला वाटत, मी मद्रासेंत किंवा मॅट्रिकच्या वर्गांत असेन तीं त्यांचीं लेख माला आम्ही सर्वजण मोठ्या आवडीनें वाचीत असू—परंतु आमच्या दुर्दैवानें ती आम्हांला पुरती वाचावयास मिळाली नाहीं! आमच्या त्या छोट्याशा गावांत 'झंकार' साप्ताहिकाचे फक्त दोनच गिऱ्हाईकें—एक गांवचें वाचन मंदिर व दुसरें आम्ही!—असल्यामुळें आमच्या गावच्या एजंटानें तो अंक मागविण्याचें बंद करून टाकलें! परंतु त्या पांचसहा लेखांच्या वाचनामुळें मात्र प्रा. श्री. म. माटे यांच्याविषयीं माझें मत त्यांना न पहातांच फार अनुकूल झालें आणि मॅट्रिकची परीक्षा संपल्यावर पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजांत नांव घालावयाचें ठरलें, तेव्हा प्रा. माटे यांच्या हाताखालीं शिकावयास मिळणार या कल्पनेचा सूक्ष्मसा आनंद माझ्या मनाला झाला बापूंचा आमच्यावर झालेला अगदीं पहिला तास!—त्या तासाला त्यांनीं काय व्याख्यान दिलें हें मला आतां आठवत नाहीं—परंतु त्यांच्या विद्वत्ताप्रचुर व्याख्यानाला विनोदाची बारीक किनार असल्यामुळें वर्गांत हास्याचे फवारे मधूनमधून सारखे उडत होते मुलांना हसत खेळत, त्यांच्या नकळत, त्यांच्याशीं गप्पागोष्टी करीत ज्ञान देण्याची जी ज्ञानदानाची आधुनिक पद्धति आहे ती बापूंनीं आत्मसात् केलेली आहे हें पहिल्याच दिवशीं मला अगदीं तीव्रतेनें जाणवलें त्यामुळें तास संपल्यावर आमचीं मनें नेहमींप्रमाणें कोमेजून न जातां प्रसन्न झाल्यासारखीं वाटलीं आम्हांला! वसतिगृहांत आल्यावर माझ्या मैत्रिणीला मी त्या दिवशींच्या व्याख्यानांतल्या साऱ्या गमती थोडं तिखट मीठ लावून सांगितल्या तिनें 'इंग्लिश कॉम्पोझिशन' घेतलं होतं तरी प्रा. माट्यांच्या तासाला ती त्यानंतर नियमितपणे येऊं लागली

कॉलेजांत एफ्. वाय्. व इंटर ह्या दोन वर्षांत वर्ग फार मोठे असल्यामुळें प्रोफेसर आणि विद्यार्थी यांचे एकमेकांच्या संनिध येण्याचे प्रसंग फारच कमी येतात 'प्रजा राजाला ओळखत पण राजा मात्र प्रजेला ओळखीत नाहीं' ही म्हण कॉलेजच्या पहिल्या दोन वर्षीं तरी निःसंशय खरी असते.

—

मात्र ज्युनिअर बी.ए. ला आल्यावर आमच्या All Marathi च्या छोट्याशा ! म्हणजे ८।१० मुलामुलींच्या–वर्गात बापू जेव्हा पहिल्या दिवशीं आले तेव्हा त्यांनी प्रत्येक विद्यार्थ्यास नावें विचारलीं. परंतु नंतर त्यांनी 'इंटरला क्लास कोणाला मिळाला ?' असा प्रश्न करून आमच्याकडे अपेक्षेनें पाहिलें. आमचे साऱ्यांचे चेहेरे त्या क्षणीं पाहण्यासारखे झाले. एक विद्यार्थी आणि एक विद्यार्थिनी नम्रपणानें उभीं राहिलीं. तेव्हा बापू आम्हा विद्यार्थ्यांना उद्देशून जें बोलले तें मी कधींच विसरणार नाहीं. "हें असं होत पहा सारे 'थर्ड क्लास' लोक येतात मराठीला, चांगलीं हुषार हुषार मुलं जातात सायन्सकडे, किंवा History Economics स्पक्कडे, मराठीच्या वाट्याला येतो गाळ !" ही बापूंचीं वाक्यें आमच्या अगदीं जिव्हारीं लागलीं. पण बापूंचें तरी काय चुकलें होतें त्यांत ?–सारंच नव्हतं का बापूंचें म्हणणें एका दृष्टीनें !–पण, बापूंची टीका आमच्या अभ्यासाला मारक ठरली नाहीं उलट, त्या दिवसांच माझ्या मनात ह्या बी. ए. च्या परीक्षेत उत्कृष्ट प्रकारचें यश मिळवून बापूंचे शब्द खोटे ठरविण्याची ईर्ष्या उत्पन्न झाली ! तें असो

× × ×

बापूंची वर्गातली शिस्त फार कडक असे वर्गात कोणाजवळ पुस्तक नसलें तर बापू थोड्या मिष्किलपणें म्हणत, "का पुस्तक का नाहीं ? तुम्ही पुढच्या वर्षीं पुस्तकें घेणार असाल." बापूंच्या या कडक शिस्तीवरून मला मी ज्युनिअरमध्यें असताना घडलेल्या एका प्रसंगाची आठवण झाली. आम्हा ज्युनिअरच्या विद्यार्थ्यांना बापू व्याकरण शिकवीत. व्याकरणासारखा क्लिष्ट अन् कंटाळवाणा विषय ! पण बापूंच्या जिव्हाग्रावरून येताना तो क्लिष्टपणा आणि कंटाळवाणेपणा पार निघून जायचा. आणि आश्चर्य म्हणजे, व्याकरणाचा तास हा आम्हा सर्व विद्यार्थ्यांचा आवडता तास होता ! परंतु किती झालें तरी आम्ही ज्युनिअरचीं पोरें ! सगळ्या सर्व तासांना हजर राहण्याची बुद्धि ज्युनिअरच्या वर्षी होणं हें अस्वाभाविक नव्हतं का ?' आधीच आमच्या ज्युनिअरच्या मराठी क्लासला दहाबारा मुलं–त्यांत हजर असायचीं सहाआठ ! एकदा बापू म्हणाले, "प्रत्येक दिवशीं मी बघतों, दररोज आपलीं निराळींच मुलं दिसतात तुमच्या वर्गांत ! कसें का असेना, कुठे का असेनात, पण आठ मुलं मात्र दररोज हजर असतात !" अर्थात् याला कारण बापू नसून

आमच्या ठिकाणीं असलेली ' ज्युनिअरपणा 'ची निष्काळजी वृत्तीच होती हें निराळें सांगायलाच नको. एक प्रसंग मला नेहमींच आठवतो. इंटरकॉलेजिएट स्पोर्ट्स सुरू होते तेव्हा. कसली मॅच होती तें आठवत नाहीं, पण शिकविण्याचा तास संपून आम्ही सारेजण ' रमाबाई हॉल ' पाशीं नेहमींप्रमाणें बापूंची वाट पाहत उभीं होतों. इतक्यात कुणीस सांगितलं, " आताच मॅच सुरू झाली. आपण जाऊ या मॅच बघायला! " झालं. एकानं टूम काढली! बापूंचा तास बुडविण्याची लहर आम्हाला कधींच येत नसे. पण त्या दिवशीं आम्हाला काय वाटलं कुणास ठाऊक? आम्ही सारेजण, बापू येण्याच्या आत मॅच पहायला पळून गेलों! त्या दिवशीं शेवटचा तास बापूंचा होता. ज्युनिअर व सिनीअर दोन्ही वर्गांचा मिळून—तासाला आल्याबरोबर बापू म्हणाले, " आज दुसरा तास कुणी बुडवला? " आम्ही सारीं चूपचाप! " मी ज्युनिअरच्या विद्यार्थ्यांना बोलतोंय. ज्यानं तास बुडवला त्यानं उभं रहा! " आम्ही सारीं खालीं मान घालून उभीं राहिलों. बापू त्या दिवशीं आम्हाला खूपच बोलले. त्यांचा आवाज चढला होता. मात्र आमचे अपराधी चेहरे पाहून ते शेवटीं मृदुपणानें म्हणाले, " मला विचारून गेला असता तर मी तुम्हाला ' नाहीं ' का म्हटलं असतं? शिस्त नाहीं तुम्हांला! आणि तास संपल्यानंतर ते पुन्हा म्हणाले, ' आज मी बोललों याचं कोणी वाईट वाटून घेऊ नका. मी जें बोललों तें तुमच्या हितासाठींच बोललों. जर कुणाला माझं बोलणं लागलं असेल तर क्षमा करा मला. "

त्या दिवशीं बापूंच्या एका नव्याच स्वभाववैशिष्ट्याचें आम्हाला दर्शन झालें. तें म्हणजे त्यांच्या स्वभावातील सौजन्य आणि प्रेमळपणा! बापू इतरांना कसे वाटतात हें मला सांगता यायचं नाहीं परंतु ' बापू प्रेमळ आहेत ' हें माझं विधान वाचून मात्र कांहीं वाचकांना तरी धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं! ही बापूंची खोटी स्तुति करते असंहि ते स्वतःशीं म्हणतील. पण लेखाच्या सुरुवातीला मी म्हटलं आहे ना कीं, एखाद्या व्यक्तीच्या आपण अगदीं जवळ गेलों, म्हणजे दुरून त्या व्यक्तीकडे पाहणाऱ्याला तिच्या स्वभावातील जीं सूक्ष्म वैशिष्ट्यें दिसत नाहींत तीं त्या व्यक्तीच्या जवळ जाणाऱ्याला व त्या व्यक्तीकडे निरखाळ्यानें पाहणाऱ्याला दिसतात. बापूंनीं वीस वर्षें अविश्रान्त केलेलें अस्पृश्यता निवारणाचें कार्य,

त्यांनीं आजवर निर्माण केलेलीं मराठी वाङ्मयातील अमूल्य रत्नें, त्यांनीं आजवर निर्माण केलेलीं प्रभावी व्याख्यानें इत्यादि मान्याची कामगिरी समाजाच्या दृष्टीसमोर आलेली आहे जगाला प्राध्यापक श्रीपाद महादेव माटे म्हणजे त्यांचं सामाजिक कार्य + त्यांचें अमर्याद लेखन + त्यांचीं व्याख्यानें + इ पण माझ्या दृष्टीला माटे हे या स्वरूपात पडले नाहींत प्रा माटे ही ' व्यक्ति ' माझ्या दृष्टीस पडली आणि म्हणूनच मी स्वत ला भाग्यवान् समजतें प्रा मान्याना त्या या मैनावती मधुप्रमाणेंच मी ' बापू ' म्हणून हाक मारत, तेव्हा मैना मधूची मी बहीणच आहे ही भावना माझ्या मनात सदैव जागृत असते अपूर्वें घर हें मला माझें हक्काचें घर वाटतें, आणि त्यांच्या प्रेमळ सान्निध्याचा लाभ मी मनसोक्त घेतें ' आमचे बापू ' म्हणून मान्याचा उल्लेख करताना माझ्या मनात एक अभिमानाची सूक्ष्म छटा तरळत असते बापूना ' आमचे ' म्हणण्याचं भाग्य मला लाभलं हें अभिमानास्पद नाहीं असं कोण म्हणेल ? बापूंच्या प्रेमळ अंत करणाचा प्रत्यय आणून देणारे कितीतरी प्रसंग हा लेख लिहिताना माझ्या मन श्चक्षूपुढें सरकत आहेत ते सारे लिहीत बसलें तर एक मोठा ग्रंथच होईल अशी भीति वाटते पण दोन प्रसंग लिहिल्याशिवाय मात्र मला राहवत नाहीं

मी ' सानिअर 'ला असताना एकदा बापूंकडे अभ्यासातल्या काहीं शंका विचारायला गेलें होतें त्याच वेळेला रस्त्यावरून एक भाजीवाली चालली होती बापूना खिडकींतून ती भाजीवाली दिसली तिच्या टोपलींत खूप कोथिंबीर होती बापूंनी लागलीच घरात दारावर कोथिंबीर आल्याची वर्दी दिली कोथिंबिरीबद्दल त्यांनी दाखविलेली उत्सुकता पाहून मला थोडा विस्मय वाटला अन् मी लागलीच त्यांच्याजवळ माझं आश्चर्य व्यक्तहि केलं त्यावर ते म्हणाले, " त्याचं असं आहे आमच्या मधूला कोथिंबिरीची भाजी फार आवडते " त्यावर " खरं की काय, मलसुद्धा कोथिंबिरीची भाजी फार आवडते " असं मी एकदम म्हटलं हा प्रसंगाला बरेच दिवस झाले एक दिवस कॉलेज सुटून मी वसतिगृहाकडे जाण्यास निघालें होतें बापू त्याच बाजूनें चालले होते मला पाहताच एकदम आठवल्यासारखं करून ते म्हणाले " आज दुपारी आमच्याकडे ये आज तुझी आवडती कोथिंबिरीची भाजी केली आहे ती खायला ये तुम्हा मुलींना रेफेक्टरीत

तुमच्या आवडीचे पदार्थ कोण करून घालणार ?" बापूचे हे उद्गार ऐकून मला काय वाटलं तें मला सांगता येत नाहीं. बापूचें तें अगत्य, त्यांच्या अंतःकरणातली ती आस्था पाहून माझं अंतःकरण कृतज्ञतेनं भरून आलं!

नि तो दुसरा प्रसंग! आमची बी. ए. ची परीक्षा दोनच दिवसांवर आली होती. अभ्यास चांगला झाला असला तरी विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत किती विलक्षण खळबळ चालू असते हें विद्यार्थी झाल्याशिवाय कळायचें नाहीं. विद्यार्थ्यांचें मन हळुवार झालेलें असतें फार. नि एखाद्यानें जर त्या नाजुक मनःस्थितींत, "तू काय पास होणार? त्याला फार निराळे विद्यार्थी लागतात." अशा प्रकारचे उद्गार काढले तर त्या विद्यार्थ्यांची काय स्थिति होत असेल हें अनुभवाशिवाय जाणतां येणार नाहीं! हा विचित्र अनुभव माझ्या वाट्याला बी. ए. ची परीक्षा दोन दिवसांवर राहिली असतांना एका प्रो. नीं आणून दिला. मी दुसऱ्या दिवशीं आमच्या बापूकडे गेलें. मनांत निराश विचारांचें कोलाहल माजलें होतें. मी तें सारें काहूर बापूजवळ व्यक्त केलें. आणि शेवटीं म्हटलं, "आशीर्वाद मागायला आलेय् मी तुमचा."

बापूंना गहिंवरून आलं, "एका का-माझ्या दोनहि हातांनीं आशीर्वाद देतों मी तुला." बापूंनीं दोन्ही हातांनीं दिलेला तो आशीर्वाद-मग अत्यानंद झाला. माझ्या नेत्रांतून आनंदाश्रू वाहू लागले. बापूंनीं मला अंतःकरणपूर्वक आशीर्वाद दिला! त्यांनीं माझें सान्त्वन केलें, माझ्या मनांतील निराशाजनक विचार काढून टाकले आणि मला उत्साह नि धैर्य दिलें! माझ्यापुढें असलेलें तें लहानसें ध्येय गाठायला प्रेमळ पित्यानं ना उत्साह दिला असता तो बापूंनीं मला दिला! तो प्रसंग माझ्या अंतःकरणावर कायमचा कोरला गेला आहे! बापूंच्या त्या उग्र मुद्रेच्या आड त्यांचं कोमल अन् प्रेमळ अंतःकरण दडलेलं आहे, नारळाच्या खडबडीत, टणक कवचाच्या आंत नाहीं का मृदु, लुसलुशीत, पांढरें शुभ्र खोबरें असतें! आमच्या बापूंचेंहि तसें आहे अगदीं! बापूंच्या प्रेमळ अंतःकरणाची ज्यांना प्रचीति आली ते खरोखरच भाग्यवान् आहेत हें जें मी म्हटलं तें खोटें नाहीं!

बापूंचें एखादं काम केलं कीं, बापूंना फारच हर्ष होतो आणि त्या उपकाराचें ओझें बापूंना इतकें होतें कीं, कितीदां तरी ते म्हणतात, "खरंच फार चांगलं केलंस." किंवा "Thanks मानायला पाहिजेत मी तुझे-" त्याचें असें

चार पाचदा म्हणून झालें कीं, मी बापूंना म्हणते, "बापू तुमच्या मधून तुमच काम केलं असत तर तुम्ही असेच आभार मानले असते का त्याचे?" यावर बापू मनमोकळेपणाने हसतात अन् म्हणतात, "बराय बुवा परत घेतो आम्ही आमचे Thanks मग तर झालं?" व त्यांनी ते परत घेतले कीं मला समाधान वाटत फार!

बापूंच्या स्वभावातलं एक वैशिष्ट्य मात्र मोठं गमतीच आहे मोठ्या लोकांच्यासुद्धा काहीं काहीं छोट्या गोष्टी असतातच कीं! आमचे बापू फार विसरभोळे आहेत विद्यार्थ्यांची नावें, पुस्तकाचा नावें, लेखकाची किंवा पानाची नावें कधींच त्यांच्या लक्षात म्हणून राहत नाहींत! आम्हा विद्यार्थिनींमध्यें 'बापूंचा विसराळूपणा' हा एक गमतीचा विषय असे, बापू कोणती गोष्ट विसरतील याचा काहीं नेमच नसे मी सीनिअरला असताना ते आम्हाला 'पास'ची तीन पुस्तकें व ऑनर्सचा कागदाचा पेपर शिकवीत त्यावर नेमलेली पुस्तकें व पासची तीन पुस्तकें यांच्या याद्या बापूंना आम्ही कितीदा करून दिल्या असतील याला गणतीच नाहीं, पण त्या याद्याच बापू कुठेंतरी विसरायचे! आणि दररोज तास घ्यायच्यावर आम्हाला विचारायचेच, "उद्या तास कोणता?" मुलांनी 'ऑनर्स'चा म्हणून सांगितल्यावर "म्हणजे पुस्तक कोणच शिकवायचं तें सांगा" असा बापूंचा पुढला प्रश्न ठरलेला असायचा! कारण, पासच्या आणि ऑनर्सच्या पुस्तकाचा घोटाळा, तीं सारीं पुस्तकें शिकवून झालीं तरी आमच्या बापूंचा होतच असे! आम्ही मुलंमुलं जमलों कीं बापूंच्या विसराळूपणाबद्दल आमच्यात हास्यविनोद झाले नाहींत असे क्वचितच होई

मात्र बापूंच्या शिकविण्याबद्दल लिहावें तितकें थोडेंच आहे, बापू शिकवीत असताना वर्गात नेहमीच शान्तता असे, पण बापूंनी एखादा मार्मिक विनोद केला कीं, सबंध वर्ग हास्यानें हादरून निघे मी इंटरला असतानाचा एक गमतीदार प्रसंग मला आठवतो, बापूंनी विनोद केला कीं मुलें नुसतींच हसत नसत तर त्याबरोबर 'स्टॅंपिंग' हि करीत एकदा थोडेसें रागावल्यासारखें करून ते म्हणाले, "विनोद झाल्यावर तुम्ही हसता हें ठीक आहे पण हातपाय काय झाडता?" यावर पुन्हा एकदा 'स्टॅंपिंग' झालच!!!

आम्ही युनिअरला असताना आमची 'मराठी मंडळाची' ट्रिप निघाली त्या वेळेस बापू ट्रिपला आले नाहींत ते का आले नाहींत याच अजून

# सामुदायिक अभ्यासपद्धतीचा एक प्रयोग : ८

शं. गो. साठे

'महाराष्ट्र सांवत्सरिक' हा ग्रंथ सन १९३३ च्या फेब्रुवारींत प्रसिद्ध झाला. हजार पानांच्या या ग्रंथाचें संपादन प्रो. श्री. म. माटे यांनीं केलेलें आहे. 'मराठी वार्षिक ज्ञानसंग्रह' हें जें दुसरें नांव या ग्रंथाला दिलेलें आहे त्यावरून दरवर्षी पुरवणीवजा एक छोटें सांवत्सरिक प्रसिद्ध करण्याचा संपादकांचा विचार होता असें स्पष्ट दिसून येतें; व त्याप्रमाणें १९३४ सालीं व १९३५ सालीं दोन छोटीं 'सांवत्सरिकें' निघालींहि, त्यानंतर मात्र हें वार्षिक प्रकाशन बंद पडलें. त्याचें कारण असें कीं, पहिलें मोठें 'सांवत्सरिक' तयार झालें त्याचा सगळा खर्च टिळक-स्मारक-मंदिर व टिळक-पर्स फंड या संस्थानीं सोसला. टिळक-स्मारक-ट्रस्टनें चार हजार रुपये व टिळक पर्स फंड ट्रस्टनें दीड हजार रुपये ग्रंथरचनेसाठीं दिल्यामुळेंच हजार पानाचा एवढा मोठा ग्रंथ तयार होऊन, तीन छापखान्यांत छापला जाऊन, अवघ्या बारा " महिन्यात प्रसिद्धहि झाला. नंतरचीं दोनहि छोटीं 'सांवत्सरिकें' मात्र प्रो. माटे यांनीं केवळ एकट्याच्याच आर्थिक जबाबदारीवर प्रसिद्ध केलीं; आणि 'वार्षिक ज्ञानसंग्रह' व त्या ज्ञानदानापासून होणारा 'वार्षिक द्रव्य-संग्रह' या दोहोंचा खिशाला परवडण्याइतका मेळ बसत नाहीं असा अनुभव आल्यामुळें, त्याना हा आवडता उद्योग, तीन सांवत्सरिकानंतर नाइलाजानें आखडता घ्यावा लागला. असो. या तीन 'सांवत्सरिका' पैकीं १९३३ सालीं प्रसिद्ध झालेल्या पहिल्या मोठ्या 'सांवत्सरिका'पुरतीच माझ्या लेखाची मर्यादा आहे. दरवेळीं 'पहिलें सांवत्सरिक' किंवा '१९३३ चें सांवत्सरिक' असें लिहावें लागूं नये म्हणून हा खुलासा केला आहे.

प्रो माटे यांचें नांव ' संपादक ' या नात्यानें ग्रंथाशीं निगडित आहे. अर्थात् माहिती गोळा करणें, ती तपासून घेणें व योग्य जागीं, योग्य स्वरूपांत तिचा ग्रंथांत समावेश करणें हें 'संपादन' कार्य तर त्यांना करावेंच लागलें, पण त्याशिवाय ग्रंथयोजना तयार करण्याच्या कामींहि त्यांना लक्ष पुरवावें लागलें मराठी भाषेंत इयर बुक ( म्हणजेच ' सांवत्सरिक ' ) करण्याच्या या योजनेशीं इतक्या व्यक्तींचा संबंध आलेला आहे कीं त्या सगळ्यांत प्रो माटे यांचें स्थान कोणतें याचा बोध केवळ ' संपादक ' या शब्दानें होण्यासारखा नाहीं त्यासाठीं ग्रंथयोजनेची आरंभापासूनची थोडी हकीकत सांगावयास हवी.

ग्रंथ १९३३ सालीं प्रसिद्ध झाला, पण श्री. केळकरांनीं ग्रंथाच्या सुरुवातीस म्हटल्याप्रमाणें, " ग्रंथाची कल्पना सुमारें दोन वर्षांपूर्वी पुढें आली. प्रथम तिची चर्चा खाजगी रूपानें कांहीं मित्रमंडळींनीं केली " पण लवकरच या खाजगी चर्चेला सार्वजनिक रूप आलें. लो टिळक यांचें स्मारक म्हणून कांहीं राष्ट्रोपयोगी वाङ्मय प्रसिद्ध करीत रहावें या टिळक-स्मारक ट्रस्ट कमिटीच्या हेतूस अनुसरून मराठी भाषेंत एक ' इयर बुक ' करावें हीहि कल्पना कमिटीस सुचली, व सन १९३१ च्या वार्षिक बैठकींत तिनें असा ग्रंथ करण्याची कल्पना कायम केली. योजनेच्या प्रत्यक्ष अमलबजावणीचें काम कमिटीनें श्री अण्णासाहेब भोपटकर यांजवर सोंपविलें व त्यांनीं श्री. दा. वि गोखले यांचे विचारानें ती जबाबदारी पत्करिली प्रत्यक्ष ग्रंथ तयार करण्याचें काम त्या दोघांनाहि हातीं घेण्याजोगें नव्हतें म्हणून श्री भोपटकर यांनीं प्रो. माटे यांचेसह ' महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ ' नांवाचे एक मंडळ बनवून ग्रंथ तयार करण्याचें काम त्यांचेवर सोंपविलें. प्रो. माटे यांनीं हें काम पत्करून ग्रंथ तयार केला.

यावरून असें दिसून येईल कीं, ग्रंथाची मूळ कल्पना निघाल्यावर, तिच्यावर चर्चा होऊन अनेक घळणावळणांनीं ती अखेर प्रो माटे यांचे हातीं आली. या मधल्या काळांत योजनेला थोडें स्वरूप आलें होतें. प्रो माटे यांनीं ग्रंथ रचनेची जबाबदारी स्वीकारल्यानंतर हें पूर्वीचें स्वरूप पुसून टाकलें व स्वत च्या कल्पनेप्रमाणें नवी योजना तयार केली, ग्रंथरचनेची स्वत च पसंत अशी पद्धति अवलंबिली व मराठी ' इयर बुका ' विषयींच्या स्वत च्या कल्पनेस मूर्त स्वरूप दिलें ' मराठी सांवत्सरिक ' हा ग्रंथ म्हणजे प्रो. माटे यांच्या

आम्हाला कोर्डेन आहे पण बोलावणे पाठवूनहि ते आले नाहीत या गोष्टीने आम्ही सारे विद्यार्थी बापूंवर थोडे नाराज झालो होतो! मात्र दुसऱ्या वर्षी आमच्या ट्रिपमध्ये बापूंनी अत्यंत उत्साहाने भाग घेतला, ट्रिपला श्रीखंड नेले ते बापूंच्याच घरी तयार केलेले होते! अर्थात् त्या श्रीखंडाची लज्जतहि काही न्यारीच होती!

आमचा मागच्या वर्षीचा अभ्यास जानेवारी अखेरपर्यंत संपवायचा अशा निश्चयाने बापूंनी मागच्या वर्षी शिकवण्यास सुरुवात केली. अर्थात् अभ्यास संपवायचाच म्हणून कसा तरी संपवायचा हे बापूंच्या स्वभावात बसतच नव्हते. शिकवितांना बापू फारच रंगून जात. सर्वच विषयात आपले अंतःकरण ओतून ते शिकवीत. आम्ही सारे विद्यार्थीहि तल्लीन होऊन जात असू. मोरोपंताची 'केकावलि' शिकवितांना 'कृतान्तकटकामलध्वजजरा दिसो लागली' हा श्लोक शिकवितांना बापू क्षणभर थांबले. त्यांचा चेहरा अधिकच गंभीर झाला व त्यांनी म्हटले, "खरं आहे हें. वृद्धपणाची ध्वजा दिसू लागली की माणसाच्या अंतःकरणाला नाना प्रकारच्या वेदना होऊ लागतात. प्रत्यक्ष मृत्यु दारात उभा असतो, तो आपल्या मगरमिठीत आपल्याला केव्हा पकडेल याची निश्चिति नसते. आपण म्हणतो, पण माणसाला मृत्यूचे भय वाटते. त्याच्या भोवताली असलेल्या व्यक्तींच्या प्रेमाचे पाश त्याच्या जीवाला जडलेले असतात, म्हणून मृत्यूचा पाश त्याला दुःसह वाटतो..." मला बापूंचे सगळेच शब्द नीटसे आठवत नाहीत. पण त्या दिवशीचा तास मला फारच आवडला होता! त्याप्रमाणे एकदा रामदासावर विवेचन करीत असतांना त्यांनी आम्हा विद्यार्थ्यांना रामदासाचे एक 'भावगीत' सांगितले. "येथें का तू उभा रामा" हेंच ते भावगीत होय! त्या भावगीताचे विवेचन बापूंनी इतक्या रसिकतेने आणि सहृदयतेने केले की, सारा वर्ग तल्लीन होऊन गेला. शेवटी बापू म्हणाले, "भक्ताची भक्ती पराकोटीला पोचली म्हणजे त्याला आपल्या देवाचेंच रूप सगळीकडे दिसतात! रामदासाचा मन पिंड राममय झाला होता. त्याला विटेवर उभा असलेला विठ्ठल दिसला नाही. त्याच्या अंतःकरणात असलेला रामच त्याला त्या विटेवर उभा असलेला दिसला! रामदासी जैसा भाव। तैसा होई पंढरीराव।।" केवढी ही असीम भक्ति! 'भावगीत' हा काव्यप्रकार आधुनिक आहे अस

आपल्याला वाटतं. परंतु पूर्वीच्या साऱ्या संतवाङ्मयांत या 'भावगीता'चे उत्कृष्ट नमुने पाहावयास सापडतात. भावगीत म्हणजे काय? वर्ण्य विषयाशीं समरसतेची तन्मयता प्राप्त होणें—यापेक्षा अधिक त्याविषयीं धन होणें अशक्य होय—हेंच खरें भावगीत!" बापूंचे सारेच तास मोठे मनोरंजक आणि उद्बोधक होत. आणि केव्हां केव्हां तर आमच्या अंतःकरणातल्या सूक्ष्म तारा हळुवार हातानें छेडून वर वर्णिल्याप्रमाणें भावनात्मक आनंद उपभोगावयास लावण्याचें सामर्थ्यहि बापूंच्या ओघवती न् प्रभावी वाणींत होतें!

या दोन वर्षांत बापूंनीं आम्हाला जीं उच्च न् उदात्त विचारांचीं अगणित अमूल्य रत्नें दिलीं, आमच्या विचारांत जी क्रान्ति घडवून आणली, प्रत्येक गोष्टीचा कार्यकारणभाव पाहण्याची जी संवय आम्हाला लाविली, निरनिराळ्या सामाजिक चालीरीतींची कारणमीमांसा करून त्यांची उपयुक्तता किंवा त्यांचे दुष्परिणाम पटवून देऊन आमच्या विचारांना जी चालना दिली—बापूंनीं आम्हाला जें दिलें तें अनन्त आणि विशाल आहे! खरच बापूंनीं 'अनन्त हस्तां'नीं आम्हाला दान केलें. आम्ही मात्र या दुबळ्या 'दो करानीं' तें घेण्यास असमर्थ ठरलों!

---

# सामुदायिक अभ्यासपद्धतीचा एक प्रयोग : ८

शं गो साठे

'महाराष्ट्र सांवत्सरिक' हा ग्रंथ सन १९३३ च्या फेब्रुवारींत प्रसिद्ध झाला हजार पानाच्या या ग्रंथाचें संपादन प्रो. श्री म माटे यांनी केलेलें आहे 'मराठी वार्षिक ज्ञानसंग्रह' हें जें दुसरें नाव या ग्रंथाला दिलेलें आहे त्यावरून दरवर्षी पुरवणीवजा एक छोटें सांवत्सरिक प्रसिद्ध करण्याचा संपादकाचा विचार होता असें स्पष्ट दिसून येतें, व त्याप्रमाणें १९३४ सालीं व १९३५ सालीं दोन छोटीं 'सांवत्सरिकें' निघालींहि, त्यानंतर मात्र हें वार्षिक प्रकाशन बंद पडलें त्याचें कारण असें कीं, पहिलें मोठें 'सांवत्सरिक' तयार झालें त्याचा सगळा खर्च टिळक स्मारक मंदिर व टिळक पर्स फंड या संस्थांनीं सोसला टिळक स्मारक ट्रस्टनें चार हजार रुपये व टिळक पर्स फंड ट्रस्टनें दीड हजार रुपये ग्रंथरचनेसाठीं दिल्यामुळेंच हजार पानांचा एवढा मोठा ग्रंथ तयार होऊन, तीन छापखान्यांत छापला जाऊन, अवघ्या बारा "महिन्यांत प्रसिद्धहि झाला नंतरचीं दोन हीं छोटीं 'सांवत्सरिकें' मात्र प्रो माटे यांनीं केवळ एकट्याच्याच आर्थिक जबाबदारीवर प्रसिद्ध केलं आणि 'वार्षिक ज्ञानसंग्रह' व त्या ज्ञानदानापासून होणारा 'वार्षिक द्रव्य संग्रह' या दोहोंचा हिशाला पाचवड्याइतका मेळ बसत नाहीं असा अनुभव आल्यामुळें, त्यांना हा आवडता उद्योग, तीन सांवत्सरिकांनंतर नाइलाजा आखडता घ्यावा लागला असो या तीन 'सांवत्सरिकां' पैकीं १९३३ सालं प्रसिद्ध झालेल्या पहिल्या मोठ्या 'सांवत्सरिका' पुरतीच माझ्या लेखाची मर्यादा आहे दरवेळीं 'पहिलें सांवत्सरिक' किंवा '१९३३ चें सांवत्सरिक' असें लिहावें लागू नये म्हणून हा खुलासा केला आहे ।

प्रो. माटे यांचें नांव ' संपादक ' या नात्यानें ग्रंथाशीं निगडित आहे. अर्थात् माहिती गोळा करणें, ती तपासून घेणें व योग्य जागीं, योग्य स्वरूपांत तिचा ग्रंथांत समावेश करणें हें 'संपादन' कार्य तर त्यांना करावेंच लागलें, पण त्याशिवाय ग्रंथयोजना तयार करण्याच्या कामींहि त्यांना लक्ष पुरवावें लागलें. मराठी भाषेंत इयर बुक ( म्हणजेच ' सांवत्सरिक ') करण्याच्या या योजनेशीं इतक्या व्यक्तींचा संबंध आलेला आहे कीं त्या सगळ्यांत प्रो. माटे यांचें स्थान कोणतें याचा बोध केवळ ' संपादक ' या शब्दानें होण्यासारखा नाहीं त्याआठीं ग्रंथयोजनेची आरंभापासूनची थोडी हकीकत सांगावयास हवी.

ग्रंथ १९३३ सालीं प्रसिद्ध झाला, पण श्री. केळकरांनीं ग्रंथाच्या सुरु वातीस म्हटल्याप्रमाणें, " ग्रंथाची कल्पना सुमारें दोन वर्षांपूर्वीं पुढें आली. प्रथम तिची चर्चा खाजगी रूपानें काहीं मित्रमंडळींनीं केली. " पण लवकरच या खाजगी चर्चेला सार्वजनिक रूप आलें. लो. टिळक यांचें स्मारक म्हणून काहीं राष्ट्रोपयोगी वाङ्मय प्रसिद्ध करीत रहावें या टिळक-स्मारक ट्रस्ट कमिटीच्या हेतूस अनुसरून मराठी भाषेंत एक ' इयर बुक ' करावें हीहि कल्पना कमिटीस सुचली, व सन १९३१ च्या वार्षिक बैठकींत तिनें अशा ग्रंथ करण्याची कल्पना कायम केली. योजनेच्या प्रत्यक्ष अमलबजावणीचें काम कमिटीनें श्री. अण्णासाहेब भोपटकर यांजवर सोंपविलें व त्यांनीं श्री. दा. वि. गोखले यांचे विचारानें ती जबाबदारी पत्करिली. प्रत्यक्ष ग्रंथ तयार करण्याचें काम त्या दोघानांहि हातीं घेण्याजोगें नव्हतें म्हणून श्री. भोपटकर यांनीं प्रो. माटे यांचेवर ' महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ ' नांवाचें एक मंडळ बनवून ग्रंथ तयार करण्याचें काम त्यांचेवर सोंपविलें. प्रा. माटे यांनीं हें काम पत्करून ग्रंथ तयार केला.

यावरून असें दिसून येईल कीं, ग्रंथाची मूळ कल्पना निघाल्यावर, तिच्यावर चर्चा होऊन अनेक वळणावळणांनीं ती अखेर प्रा. माटे यांचे हातीं आली. या मधल्या काळांत योजनेला थोडें स्वरूप आलें होतें. प्रो. माटे यांनीं ग्रंथ रचनेची जबाबदारी स्वीकारल्यानंतर हें पूर्वीचें स्वरूप पुसून टाकलें व स्वतःच्या कल्पनेप्रमाणें नवी योजना तयार केली, ग्रंथरचनेची स्वतःस पसंत अशी पद्धति अवलंबिली व मराठी ' इयर बुका ' विषयींच्या स्वतःच्या कल्पनेस मूर्त स्वरूप दिलें. ' मराठी सांवत्सरिक ' हा ग्रंथ म्हणजे प्रो. माटे यां-

सामाजिक दृष्टिकोणाचें आणि अभ्यास-पद्धतीचें एक प्रतीक आहे असेंहि म्हणता येईल.

या ग्रंथाची मूळ कल्पना श्री. केळकरांच्या शब्दांत सांगावयाची झाल्यास अशी की, " आज काल व्याख्याते व प्रचारक हे हिंडून फिरून लोकमत जागृत करतात पण त्याबरोबर तें सुशिक्षितहि केलें जावें अशी अपेक्षा आहे. पण शिक्षणाला आधार माहिती व फिरून माहितीला आधार म्हणजे अनेक संदर्भ ग्रंथ ..पण आर्थिक आमचे व्याख्याते व प्रचारक हे मध्यम स्थितीतले अर्थात् हीं सर्व ज्ञानसाधनें स्वतः जवळ बाळगण्याची ऐपत त्यांना असणें शक्य नाहीं, म्हणून व्याख्याते व प्रचारक यांची अडचण लक्षांत घेऊन... एखादा संकीर्ण संदर्भ ग्रंथ तयार केल्यास तो थोड्या खर्चांत मिळू शकेल व त्यानें व्याख्याते व प्रचारक यांचें पुष्कळच कार्य होईल " यातलें तत्त्व मान्य करून प्रो. माटे यांनीं तपशिलांत मात्र पुष्कळच फेरबदल केला. प्रो. माटे यांच्यापर्यंत पोंचलेला मूळ तपशील असा कीं, हा संकीर्ण संदर्भग्रंथ खिशांत मावण्याजोगा, डायरीवजा असावा, पण ग्रंथ तयार झाला तो मोठ्या आकाराचा आणि हजार पानांचा. मूळ कल्पनेचें हें विराट स्वरूप पाहिलें कीं, एखाद्या डोंगरातल्या कपारींतून निघणाऱ्या बोटभर धारेला शेवटीं महानदीचें रूप येतें त्याची आठवण होते. पण त्या महानदीचा उगम खरोखरीच सूक्ष्म असतो. त्या बोटभर धारेला वाटेंत ठिकठिकाणचे झरे, ओढे, नद्या येऊन सहजासहजीं मिळतात व तिचा विस्तार हळुहळू वाढत जातो. डायरीवजा ग्रंथ तयार करता करता वेळोवेळीं नवीन कल्पना येऊन मिळाल्यामुळें ग्रंथाचीं पृष्ठें आणि आकार फुगत चालला असें झालेलें नाहीं ग्रंथाचा हा विस्तार योजनेनें झालेला आहे. सांगलीस भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून प्रो. माटे म्हणतात, ' गोष्ट सहजासहजीं होणें आणि तीच योजनेनें होणें यांत फरक आहे आपल्या जीवितांत योजनाराहित्याचा दोष फार मोठा आहे. ' संपादकानें आखून दिलेला चौकट झुगारून देऊन अखेर ग्रंथ त्याच्या आवाक्याबाहेर गेला असें झालें नाहीं, तर डायरीवजा ग्रंथाची मूळ कल्पना सोडून देऊन हजार पानांच्या ग्रंथाची कल्पना प्रो माटे यांनीं सुरुवातीला योजून कायम केली व तिला सांनस्थरिक मंडळाच्या अध्यक्षांची संमति मिळविल्यानंतरच त्यांनीं ग्रंथरचनेची जबाबदारी पत्करली. "या

ग्रंथाची मूळ कल्पना होती त्यापेक्षा हल्ली तो पुष्कळच मोठा झाला आहे" या श्री. केळकर यांच्या अभिप्रायाचें मर्म यावरून वाचकांच्या चांगलें लक्षात येईल.

प्रो. माटे यांनी ग्रंथाची पृष्ठे जशी 'योजून' आधीच निश्चित केलीं त्याप्रमाणेंच ग्रंथरचनेला कालमर्यादा घातली. या ग्रंथाचे वेळीं प्रो. माटे हे आपल्या सामुदायिक अभ्यासाच्या कल्पनेचा प्रत्यक्ष प्रयोग करून पहात होते असें दिसतें. या व यानंतरच्या प्रयोगानंतर मात्र त्यांना त्या कल्पनेच्या उपयुक्ततेविषयीं संदेह राहिला नाहीं. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत "वेळ आखून घेऊन सामुदायिक अभ्यासाची कल्पना त्वरेनें निकालात काढणें ही पद्धति प्रगतिप्रिय देशानीं उचलली पाहिजे" असें ते म्हणतात. 'संवत्सरिका'च्या रचनेला बारा महिन्यांची मर्यादा घालून प्रो. माटे यांनी याच पद्धतीचा अवलंब केला आहे. त्वरेनें निकालात निघाल्यामुळें 'सांवत्सरिका'त पुष्कळ ठिकाणीं अपुरेपणा दिसून येतो. संपादकांनीं आपल्या प्रस्तावनेंत हेतु कितीहि थोर असला व हौस कितीहि बलवत्तर असली तरी हातीं घेतलेल्या प्रयत्नाला इतर दृष्टींनीं मर्यादा या बसतातच असें म्हणून या अपुरेपणाचें काहीं समर्थन केलें आहे. मध्यप्रांत व वऱ्हाड अथवा मराठवाडा यांचा जितका उत्तम परामर्श घ्यावा तितका घेता आला नाहीं 'आर्यसंस्कृति' प्रकरणात हिंदु धर्मातील धार्मिक संस्कृतीचीच हकीकत आली आहे, संस्कृतीचीं जीं आणखी अंगें आहेत त्यांचा विचार याच ठिकाणीं करता आला असता तर बरें झालें असतें, या त्रुटपुटींचें मूळ ग्रंथाची पृष्ठमर्यादा व कालमर्यादा यांतच आहे 'वेळ आखून' घेतल्यामुळें, उशिरा हातीं आलेल्या काहीं चरित्रांचा आणि संस्थांच्या अहवालांचा ग्रंथात अंतर्भाव झाला नाहीं, आणि आधुनिक महाराष्ट्रांतील दिवंगत व जिवंत अशा ज्या गुणी माणसांचीं चित्रें द्यावयाचीं असें ठरलें होतें त्या सर्वांचीं चित्रें देता आलीं नाहींत.

ग्रंथाची पृष्ठमर्यादा व कालमर्यादा हीं जशी प्रो. माटे यांनीच निश्चित केली त्याचप्रमाणें ग्रंथाची रूपरेषा व तपशीलवार आराखडा तयार करण्याचें कामहि त्यांजकडेच पडलें. ज्या टिळक स्मारक संस्थेनें या ग्रंथाचा पुरस्कार केला तिने जेव्हा असें ठरविलें, 'एखाद्या चांगल्या ग्रंथास मदत करावयाची पण

त्याची इतर जबाबदारी स्वतः सरवेशर घ्यावयाची नाहीं.' अर्थात् मराठी 'इयर बुक' एवढी एक स्थूल कल्पना सरवेशनें श्री. भोपटकर याच्या हवाली केली. व श्री. भोपटकरांनीं ती जशीच्या तशी प्रो. माटे यांचेकडे सोपविली. अशा रीतीनें ग्रथाची 'इतर' (म्हणजे पैशाखेरीज इतर) सर्व जबाबदारी प्रो. माटे यांचेवरच येऊन पडली त्यांनींहि ती मोठ्या हुरूपानें पत्करिली असली पाहिजे, कारण यांच्या आधीं नुकताच 'केसरी'-च्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त जो 'केसरी प्रबोध' नावाचा गौरवग्रंथ निघाला होता तो तयार करण्यातहि प्रो. माटे यांनींच पुढाकार घेतला होता. निरनिराळ्या व्यवसायाची व प्रवृत्तींची मडळी एकाच भावनेनें उद्युक्त होऊन एकत्र काम करू लागली म्हणजे मोठमोठ्या योजनाहि सहज पार पाडता येतात असा विश्वास 'केसरी प्रबोधा' मुळें त्याच्या मनात उत्पन्न झाला असल्यास नवल नाहीं. सामुदायिक अभ्यासाची कल्पना त्यांच्या डोक्यात या पूर्वीहि कित्येक वर्षे घोळत असली पाहिजे त्या कल्पनेचा पहिला प्रयोग 'केसरी प्रबोधा' नें यशस्वी झालेला पाहून 'सावत्सरिका' च्या रूपानें तिचें आणखी एक प्रात्यक्षिक करून पाहण्याची सधि आयती चालून आलेली पाहताच त्याना हर्षच झाला असेल. या ग्रथाचे वेळीं त्यानीं सामुदायिक अभ्यासाच्या कल्पनेचें बळ तोलून, पारखून घेतलें व तिच्या 'अवलम्बन योग्यते' विषयीं स्वत ची खात्री करून घेतली. सागलीच्या अध्यक्षीय भाषणात ते म्हणतात, "नवोदित अभ्यासकाना ही अभ्यासाची व ज्ञानसग्रहाची सामुदायिक आणि योजनापुरस्सर पद्धति अवलबनयोग्य आहे असें मी आग्रहानें म्हणतों." या १९४३ सालातील आग्रहामागें निदान १०।१२ वर्षांची प्रचीति आहे हें विसरून चालणार नाहीं हा अनुभव त्यानीं बोलूनहि दाखविला आहे. "माझ्या स्वत च्या मनात ही सामुदायिक अभ्यासाची कल्पना अगदीं दृढमूल झालेली आहे, कारण तिची फलश्रुति केवढी असते याचा प्रत्यय मला अनेकदा आला आहे .. वाङ्मयाच्या आणि ज्ञानाच्या कित्येक शाखा आणि त्यांचीं प्रागणें अशीं आहेत कीं, सामुदायिक पद्धतीनें एक एक उद्योग उरका वयाचा म्हटलें तरच तें शक्य असतें. 'केसरीप्रबोध,' 'सावत्सरिक,' 'विज्ञानबोध' या ग्रथाच्या सपादनप्रसगीं मला याचा 'उत्तम अनुभव' आलेला आहे."

ग्रंथरचनेस प्रत्यक्ष सुरुवात करण्यापूर्वी प्रो. साठे यांनी 'इयर बुका' बद्दलची स्वत:ची कल्पना निश्चित केली. अशा ग्रंथाचे स्वरूप लक्षात यावे म्हणून त्यांनी निरनिराळ्या देशातील 'इयर बुके' लक्षपूर्वक नजरेखालून घातली. दक्षिण आफ्रिका, चीन, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया व कॅनडा या देशातील 'इयर बुके' मुंबईच्या 'टाईम्स'चे इयर बुक, 'डेली मेल' इयर बुक, इंडस्ट्रीज इयर बुक इत्यादि अनेक इयर बुकातील विषय पोटविषय तपासून, प्रत्येकाचे वेगळेपण लक्षात आहे याचा त्यांनी अभ्यास केला व नंतर 'महाराष्ट्र सावास रिका'चा आराखडा तयार करण्याचे काम त्यांनी हाती घेतले इंग्रजी इयर बुकाची केवळ नक्कल न करता महाराष्ट्रीय जनतेच्या गरजा व अपेक्षा लक्षात घेऊन त्यांनी ही योजना तयार केली. महाराष्ट्रीयाना जे विषय जिव्हाळ्याचे वाटतात किंवा वाटत नसल्यास वाटणे अगत्याचे आहे असे विषय प्रो साठे यांनी या ग्रंथात समाविष्ट केले आहेत ही योजना तिच्या तपशिलासकट निश्चित करण्याचे कार्य प्रो साठे यांनी एकट्यानी केलेले आहे त्यात दुसऱ्या कोणा चाहि हात नाही. किंबहुना 'ग्रंथरचनेत दुसऱ्या कोणाचेहि बंधन अगर हुकमत राहणार नाही' असे स्पष्ट आश्वासन मिळाल्यानंतरच त्यांनी कामास सुरुवात केली.

व्याख्याते व प्रचारक याना उपयोगी पडेल अशाच रीतीने या ग्रंथाची रचना करावयास हवी होती त्याच्या गरजा कोणत्या हे प्रो साठे याना अचूक माहीत होते, कारण प्रो. साठे हे स्वत: च व्याख्याते व प्रचारक आहेत. सामाजिक प्रश्नांचे सदैव चिंतन करणे व त्या चिंतनातून अभ्यासपूर्वक काढलेले निष्कर्ष व्याख्यानातून आणि लेखनातून समाजापुढे मांडणे हे त्यांनी स्वत:वर घेतलेले एक समाजकार्य आहे अस्पृश्यता-निवारणाच्या चळवळीत त्यांनी १९१७ सालापासून अस्पृश्यांचा पुढाकार (व स्पृश्यांचा रोषहि) पत्करला आहे व्याख्यात्याना व प्रचारकाना कोणत्या माहितीची विशेष जवळ बाळगावी लागते हे त्याना अनुभवाने ठाऊक आहे. त्यामुळे 'सावासरिका'चा आराखडा तयार करताना त्यांनी त्या त्या विषयावर नेमके बोट ठेवून त्याचा ग्रंथात समावेश केला. 'संपादका'च्या भूमिकेबरोबरच स्वत: ची 'प्रचारक आणि व्याख्याते' ही भूमिकाही जागती ठेवून समाजाच्या जिव्हाळ्याच्या ज्या विषयांचे त्यांच्या मनात नेहमी चिंतन चालले असेल

त्याचें महत्त्व महाराष्ट्रीय जनतेस पटवून देण्यासाठीं त्यांना या ग्रंथाचा उपयोग झाला असला पाहिजे. अशा काहीं विषयांची थोडी ओळख करून देणें अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें.

**महाराष्ट्राचें एकीकरण** —बेळगावच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष श्री ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं आपल्या भाषणांत 'महाराष्ट्राचें एकीकरण' या एकाच विषयाचा पुरस्कार केल्यापासून त्यास जोरानें चालना मिळाली आहे. महाराष्ट्रांतील पुढारी या महत्त्वाच्या प्रश्नाविषयीं आजवर म्हणावे तितके जागरूक राहिले नाहींत असा एक तक्रारीचा सूर त्यांच्या भाषणांतून डोकावतो. 'केसरी'नें एक अग्रलेख लिहून, ही तक्रार अवास्तव आहे असें दाखवितांना निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं या प्रश्नासंबंधीं आजवर काय काय मतप्रदर्शन व प्रयत्न केले त्याचा आढावा घेतला आहे. पण त्यांत प्रो. माटे यांनीं 'सांवत्सरिक' ग्रंथांत या विषयाचा जो स्पष्ट शब्दांत आग्रहानें पुरस्कार केला त्याची नोंद नाहीं हें आश्चर्य आहे. प्रो. माटे हे राजकीय पुढारी नाहींत हेंही त्याचें कदाचित् कारण असू शकेल, पण 'एकीकरणा'च्या आजवरच्या प्रयत्नांची नोंद करतांना 'सांवत्सरिका'नें केलेलें कार्य डोळ्याआड करतां येणार नाहीं, इतकें तें महत्त्वाचें आहे. 'महाराष्ट्र सांवत्सरिका'तील 'महाराष्ट्रा'ची जी व्यापक कल्पना प्रो. माटे यांनीं नजरेसमोर ठेविली होती ती पाहिली कीं, आज जें श्री. माडखोलकर म्हणताहेत तेंच, तितक्याच आवेशानें आणि आग्रहानें प्रो. माटे यांनीं १९३३ सालीं म्हटलें आहे असें दिसून येईल. ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात, "नागपुरापासून गोव्यापर्यंत पसरलेला महाराष्ट्र हा आपला देश ही मुळांत खरी असलेली भावना इंग्रज सरकारच्या प्रांतविभागणीच्या पद्धतीमुळें शिथिल होत असली तर ती पुन्हा दृढ व्हावी या हेतूनें मध्यप्रांत, वऱ्हाड, निजामशाहींतील मराठवाडा, गोमंतक, हे सर्व महाराष्ट्राचे अविभाज्य असे अवयव आम्हीं या सांवत्सरिक कल्पनेंत गोवून घेतले आहेत." ग्रंथांत गोमंतकावर ४० पृष्ठांचा एक स्वतंत्र लेख देण्यांत आला असून मध्यप्रांत, मराठवाडा वगैरेंची विस्तृत हकीकत ठिकठिकाणीं दिलेली आहे. प्रा. माटे यांच्या जोरदार पुरस्काराची ही आठवण एकीकरणाच्या आजच्या चळवळीच्या काळांत उद्बोधक ठरेल यांत शंका नाहीं.

जातिपरिचयः—महाराष्ट्रातील जातींच्या चालीरीतींची माहिती प्रो. माटे यानी निरनिराळ्या ग्रंथातून परिश्रमपूर्वक जमविली होती. तिचा त्यानी या प्रकरणात उपयोग करून घेतला आहे. जातीचें नाव, लोकसंख्या, मूळ वस्ती कोठली, सध्या वस्ती कुठें आहे, धंदा काय, पुनर्विवाह, काडीमोड, बहुपत्नीत्व आहे कीं नाहीं, मांसाहारी कीं शाकाहारी इत्यादि समाजशास्त्राच्या अभ्यासकास अत्यंत उपयुक्त अशी सुमारें ४०० जातींची तपशीलवार माहिती कोष्टकरूपानें दिलेली आहे. सामाजिक प्रश्नासंबधीं स्वतःची भूमिका जनतेसमोर मांडताना प्रो. माटे याना व्याख्याते व प्रचारक या नात्यानें जी पूर्वतयारी करावी लागली असली पाहिजे तिची एक छटा या प्रकरणात दिसून येते. सामाजिक कार्यकर्त्यांना समाजाची नाडी अचूक समजावयास हवी. याशाठीं सामाजिक पाहणींचें महत्त्व केवढें आहे हें या प्रकरणावरून दिसून येईल.

परदेशातील हिंदीः—परदेशात जाऊन स्थायिक झालेल्या हिंदी लोकांची संख्या पुष्कळ मोठी आहे. प्रो. माटे यानीं निरनिराळ्या देशातील ब्रिटिश वकिलातींशीं पत्रव्यवहार करून अशा हिंदी लोकांची माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला. परदेशातील काहीं हिंदी लोकाकडूनहि काहीं माहिती मिळाली, ती सर्व या प्रकरणात दिलेली आहे. महाराष्ट्रातील लोकाना घर सोडून कोठें बाहेर पडावयास नको असा एक आरोप परप्रांतियाकडून नेहमीं केला जातो. त्यात बरेंच तथ्य आहे हें कबूल केलेंच पाहिजे. परदेशात जाऊन नावें कमावण्याची ईर्ष्या हिंमतवान तरुणाच्या मनात उत्पन्न व्हावी या उद्देशानेंच ही माहिती देण्यात आली आहे. प्रो. माटे म्हणतात, "ही माहिती मागविण्यात स्वकीयांची तेथील स्थिति कळावी हा हेतु होताच. पण स्वदेशात जी तरुण लोकांची कुचंबणा होत आहे तिच्यातून बाहेर पडावयास या हकीकतीवरून मार्ग सापडतो का? तें पहावें हा मुख्य हेतु होता.

कालगणनाः—'सांवत्सरिका'त दिलेली कालगणना ही महाराष्ट्रापुरती नाहीं कीं, हिंदुस्थानपुरतीहि नाहीं. या प्रकरणापुरता प्रो. माटे यानीं 'सांवत्सरिका'—मागचा महाराष्ट्र हा शब्द पुसून टाकला आहे. पृथ्वीवरील सर्व देशातील जें कालगणन माहीत होणें सगळ्याच हिताचें आहे तें सर्व एकत्र करून द्यावें हा हेतु मनात धरूनच 'कालगणना' हें प्रकरण तयार झालें आहे. पाश्चात्य राजेरजवाड्यांच्या जन्ममरणाच्या तारखाना या कालगणनेंत स्थान मिळालेलें

नाही. मानवाने शास्त्र व कला ही हळुहळू कशी अवगत करून घेतली व त्याच्या जोरावर मजलदरमजल करीत त्याने संस्कृतीचा आजचा टप्पा कसा गाठला हे दर्शविणाऱ्या घटनांची नोंद या प्रकरणात पहावयास मिळते. प्रो माटे यांची ही कालगणना म्हणजे जगाचा सांस्कृतिक इतिहासच असून दुसऱ्या कोणत्याहि इयर बुकात असा प्रयत्न पूर्वी झाला असेल असे वाटत नाही या प्रकरणाला ग्रंथात जे अग्रस्थान दिलेले आहे ते त्याच्या महत्त्वाच्या दृष्टीने योग्यच आहे

प्रो माटे यांच्या विचारसरणीचा खास ठसा असलेल्या काही प्रकरणांचा निर्देश वर केला आहे हा ग्रंथ मराठी भाषेत असल्यामुळे रूढ इंग्रजी शब्दांना मराठी रूपे देण्याचे कामहि त्यांना हाती घ्यावेच लागले मराठी 'इयर बुका'-चा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळे 'इयर बुका'ला मराठी शब्द हुडकून काढण्यापासूनच, या कामास सुरुवात झाली ! प्रो माटे यांना 'सांवत्सरिक' हा शब्द सुचला, या शब्दाला वैदिक क्रियाकर्मांतराचा 'वास' येतो असा त्यावर एक आक्षेप होता तो पत्करूनहि प्रो. माटे यांनी तोच शब्द कायम केला महाराष्ट्रातील एक विख्यात प्राध्यापक–साहित्यिक मात्र दर वेळी 'सांवत्सरिका'चा उल्लेख करताना न विसरता त्या 'वासा'सकटच करीत ! *Finance ला 'हुजूरदौलत,' Graph ला 'प्रमाणदर्शिका', Affiliation ला 'पुत्रीकरण', Anarchy ला 'शासनाभाववाद' Gramophone ला 'गानमंजूषा'* असे अनेक प्रतिशब्द ग्रंथात आढळून येतात.

प्रो. माटे यांच्या सामुदायिक अभ्यासाच्या कल्पनेची आणखी एक छटा स्पष्ट करावयास हवी. 'सांवत्सरिक' ग्रंथाची योजना त्यांनी एकट्यानीच आखली आहे त्यात 'सामुदायिक' असे काहीहि नाही उलट 'दुसऱ्या कोणाचेहि उपद्रव असता कामा नये' असे आश्वासन त्यांनी मागून घेतले होते. मग 'सामुदायिक अभ्यास' म्हणजे काय, असा प्रश्न साहजिक उद्भवतो. प्रो. माटे यांनी या कल्पनेचा खुलासा पुढील शब्दात केला आहे. "एखादी मोठी कल्पना उचलून तिच्या अंगोपांगांचा अभ्यास.. जर विशेष मानाने झाला तर त्याला त्या कल्पनेचा कोश म्हणण्याची चाल आहे. अशा प्रकारच्या कल्पनेत एखादा कलक आणि अंगी आटोप असलेल्या माणसाने मन घातले व मग अनेकांना आपल्याबरोबर अभ्यासाला घेतले तर असे सामुदायिक

अभ्यास जल्दीनें तडीस जातात ..." म्हणजे असें की, कल्पक व आटोप-शीर असणाऱ्या एका माणसानें प्रथम एखाद्या मोठ्या कल्पनेंत मन घाला-वयाचें (म्हणजे योजना निश्चित आखावयाची) व मग अनेकांनीं त्या कल्पनेचा—निश्चित योजनेचा—सामुदायिक अभ्यास करावयाचा. प्रो. माटे यांनी 'सावत्सरिका'त याच पद्धतीचा अवलंब केला आहे. त्यांनीं योजना आधीं निश्चित केली व नंतरच 'संपादक मंडळ' बनविलें. ग्रंथातील बहुतेक लिखाण संपादक मंडळानें केलेलें—म्हणजे प्रो. माटे यांच्या देखरेखीखालींच झालेलें आहे. बाहेरच्या तज्ज्ञ लोकांकडून या ग्रंथासाठीं खास मागविलेले असे एकूण ३१ लेख आहेत. पण या तज्ज्ञ लोकांनाहि विषयाचें एकंदर ग्रंथातील महत्त्व, विषयाची व्याप्ति आणि लेखाची पृष्ठसंख्या यांची स्पष्ट कल्पना प्रो. माटे यांनीं आधीं देऊन ठेविली होती.

एवढ्या मोठ्या कोशकल्पनेची योजना आखताना ती एकाच कल्पक माणसानें आखावी कीं अनेक कल्पक एकत्र बसून सामुदायिक अभ्यासपद्धतीचा फायदा योजना निश्चित करण्याचे कामींहि व्हावा हा स्वतंत्र चर्चेचा विषय होऊं शकेल. प्रो. माटे याचें सामुदायिक अभ्यासपद्धतीसंबंधींचें मत काय आहे, तें वर दिलें आहे. 'सावत्सरिक' ग्रंथाची रचना त्यांनीं आपल्या पद्धतीप्रमाणेंच केलेली आहे. या पद्धतीवर आणखी प्रकाश पाडणारी एक चरकाशी घटना नमूद करावीशी वाटते, वर्तमानपत्रांतून 'सावत्सरिक' योजनेस प्रसिद्धि मिळाल्यानंतर 'ज्ञानकोश'कार डॉ. केतकर यांनीं माटे यांना पत्र पाठवून मराठी 'इयर बुका'च्या या नव्या कल्पनेचें मार्गदर्शन करून आपल्या विद्वत्तेचा आणि दीर्घानुभवाचा फायदा मिळू देण्याची तयारी दाखविली होती. पण हा फायदा 'सावत्सरिका' ला मिळण्याचा योग नव्हता असेंच म्हटलें पाहिजे. कारण, प्रो. माटे यांनीं 'चुका करीत करीत, एकट्यानें झग-डून मार्ग काढण्यांतच आम्हास खरें शिक्षण मिळणार आहे' अशा अर्थाचें उत्तर पाठवून 'ज्ञानकोश'काराचें मार्गदर्शन आभारपूर्वक नाकारलें. स्वतः आखलेल्या योजनेंत दुसऱ्या कोणाचेंहि बंधन अगर हुकमत पत्करावयाची नाहीं हा प्रो. माटे यांचा आग्रहच या नकारास कारणीभूत झाला असावा असें वाटतें. डॉ. केतकर व प्रो. माटे यांनीं एकत्र बसून सामुदायिक अभ्या-सानें ग्रंथयोजना केली असती तर 'सावत्सरिका'चें स्वरूप कसें बदललें असतें?

याची चर्चा केल्यास तिला आता बौद्धिक करमणुकीपेक्षा जास्त महत्त्व उरणार नाहीं, पण यावरून, एकाच 'योजका'च्या नियंत्रणाखालीं सामुदायिक अभ्यासानें झालेली योजनेची अमलबजावणी या प्रो माटे यांनी पुरस्कारिलेल्या सामुदायिक व योजनापुरस्सर अभ्यासपद्धतीचा अर्थ स्पष्ट होतो या पद्धतीनें तयार झालेल्या ग्रंथातील उणिवांचें खापर जसें एकट्या योजकाच्या माथ्यावर फोडण्यात येतें तसेंच ग्रंथातील गुणविशेषाचा सगळ्याच्या सगळा वाटाहि एकट्या योजकासच मिळाला पाहिजे 'मराठी संतसंपादक' हा ग्रंथ प्रा. माटे यांच्या सामाजिक दृष्टिकोणाचें आणि अभ्यासपद्धतीचें एक प्रतीक आहे असें सुरुवातीस म्हटलें आहे तें ग्रंथाच्या या 'एकसूत्री'पणास अनुलक्षूनच म्हटलें आहे.

संपादक मंडळांत सर्व तरुण मंडळी होती त्यांतील बहुतेक प्रो माटे यांचे विद्यार्थीच होते ज्ञानाचें, वयाचें व अधिकाराचें अंतर भासू न देता प्रो माटे सहकाऱ्यांशीं मिळून मिसळून वागत स्वत मजकूर तयार करणें, दुसऱ्याचा मजकूर तपासून घेणें, सूचना देणें, लोकांच्या गाठीभेटी घेणें, पत्रकें काढणें, पत्रव्यवहार करणे इतकेंच नव्हे तर ग्रंथाच्या जाहिरातींचा मजकूर लिहिणें हीं सर्व कामें प्रो माटे यांनाच पहावीं लागत सूचना देऊन दुसऱ्याकडून ते काम करवून घेत परंतु लहानमहान बाबींतहि त्यांच्या जबाबदारीचा भार हलका करणारें असें दुसरें कोणीहि नव्हतें कामाच्या वेळा, सर्वांच्या सोयी गैरसोयी पाहून ठरविलेल्या होत्या. पण ठरलेल्या वेळेचें बंधन स्वत माटे यांनीहि कधीं मोडलें नाहीं एका स्नेह्याच्या घरीं मंगलकार्यानिमित्त भोजनाचें निमंत्रण असतां तें कामाच्या वेळांत बसत नसल्यानें त्यांनी त्या स्नेह्याचा रोष ओढवून घेतल्याचें मला चांगलें आठवतें कामाच्या मधल्या विश्रांतीचे वेळीं, चहापान चालू असतां हास्यविनोदाच्या ओघांत कामाचा शीण कोठल्या कोठें निघून जात असे 'कालगणना' प्रकरणाच्या तयारीसाठीं निरनिराळ्या ग्रंथांतून महत्त्वाचे सन वेंचून काढण्याचें काम कित्येक दिवस चाललें होतें त्या सर्व टिपणांतून कालानुक्रमानें सन निवडून 'कालगणना' तयार झाली दिवसाचें काम आटोपलें की जो तो आपापल्या टिपणावर वजनें ठेवून खोलीभर पसरलेले ते कागद न हालविता, निघून जाई त्यामुळें खोलींत दिवसभर कागदाचा पसारा दिसे प्रो माटे यांचा मुलगा मधू हा तेव्हां ५।६ वर्षांचा

असेल. त्यानें हा पसारा पुष्कळदा पाहिला होता. व बापूंच्या कचेरीबद्दल त्यानें एक कल्पना करून ठेवली होती एक दिवस प्रो. साठे घरीं जातात तों मधूनें खोलीभर कागदाचीं चिटोरीं पसरून ठेवलेलीं ! ' हें रे काय मधू ? ' असें विचारताच त्यानें उत्तर दिलें, " मीं तुमच्यासरखी कचेरी केली आहे ही ! "

प्रो. साठे यांनीं ' सांवत्सरिका ' नंतरहि अनेक योजना हातीं घेतल्या. दरवर्षी नवेनवे विद्यार्थी त्यांच्या हाताखालीं आले. तरुणांच्या उत्साहाला योग्य वळण लावण्याचें, त्यांच्यातलीं सामर्थ्यबीजें ओळखून त्यांच्या विकसनास हातभर लावण्याचें मोठ्याचें कार्य अविरत चालूच आहे. ते वयानें तरुण राहिले नसले तरी या वयातला त्यांचा कामाचा उरक आणि ज्ञानसंपादनाची हौस हीं तरुणानाहि लाजविणारीं आहेत. नव्या नव्या विषयाकडे मन वळविण्याचा हुरूप आणि जिज्ञासा अद्यापहि त्यांचेजवळ भरपूर प्रमाणात आहे. त्यामुळें त्यांची लेखणी नेहमीं नवेनवे विषय शोधताना दिसते. सामुदायिक अभ्यासाच्या आणखी कित्येक योजनांचें चिंतन त्यांचे मनांत चाललें असेल, त्या सर्वांना भरघोस स्वरूप देण्याइतकें दीर्घायुष्य आणि शक्ति त्यांना लाभो अशीच त्यांच्या हितचिंतकांची इच्छा आहे.

---

# उपेक्षितांचें अंतरंग : : : ९

शान्ता ज. शेळके

"—खरोखर आमची मैत्रीची मर्यादा किती संकुचित असते! आपलाच पोषाख, आपलींच रीतभात, आपलीच विद्या, आपल्याच करमणुकी, आपलेच रागलोभ यांच्या पलीकडे आपल्याला जातांच येत नाहीं! हीं सर्व मागें टाकून आपल्याच आकांक्षा इतर कोठें सापडतात कीं नाहीं हें आपण पाहिलें आहे काय? आपल्याच वासना आणि ईर्ष्या इतर कोठें आपण शोधल्या आहेत काय? आपलींच ध्येयें आपल्या बाह्य परिवेषाच्या पलीकडे आपल्याला आढळतील असें आपण उमगतों काय? आणि एकच माणुसकी आपल्याप्रमाणें इतरत्र कोठें सांपडेल असें तरी आपल्याला कधीं वाटतें काय?..."

—कशाचा संसार!...उपेक्षितांचें अंतरंग पृ. ८८.

त्या वेळीं आम्ही ज्यूनिअर बी. ए. च्या वर्गात होतों. सासवडला आमची ट्रिप जाणार होती. प्रा. वाटवे व प्रा. माटे या आमच्या उभयतां गुरुजनांनींहि ट्रिपच्या या उत्साहात भाग घेण्याचें मोठ्या आनंदानें मान्य केलें होतें. ऐनवेळीं कांहीं अपरिहार्य कारणानें प्रा वाटवे हे आमच्याबरोबर येऊं शकले नाहींत. आमचा भारी विरस झाला. परंतु वाटवे नसले तरी बापूसाहेब माटे सोबत येत आहेत या कल्पनेनें आमच्या विरसलेल्या मनाला आम्ही सांवरलें व सारेजण मोठ्या उत्साहानें, खेळीमेळीनें व गमतीनें सासवडला गेलों.

तेथें ज्या देवळांत आम्ही उतरलों, तें विस्तीर्ण, शीतळ आणि विलक्षण निवान्त असें एक स्थळ होतें. जेवणानंतर देवळापुढील पटांगणाच्या काळ्याभोर दगडांनीं बांधून काढलेल्या थंडगार जमिनीवर आम्ही सारेजण जेव्हां एकत्र बसलों तेव्हां कांहीं अननुभूत भावनांनीं मन अगदीं भरून आलें. मित्रमैत्रिणींची कोमल जवळीक, भोंवतालची नयनरम्य वनश्री, वातावरणांत भरलेला सुगंधी थंडावा—आणि जवळ आमचे आवडते प्राध्यापक कधीं नव्हे इतक्या

निरंट सान्निध्यात आमच्याबरोबर गप्पागोष्टी करण्यासाठीं लाभलेले! मग काय विचारावें? पण पुढें हळुहळू गप्पावरहि एकप्रकारची आळसलेली छाया पडूं लागली आणि मनावर काहीं गूढ तन्द्री चढत चालली.

—अशातच प्रा. माच्यांनीं त्या वेळीं 'झंकार' मध्यें नुकताच प्रसिद्ध झालेला आपला "व-शीघर! तू आता कुठें रे जाशील?" हा लेख वाचावयाला एका विद्यार्थ्याला सांगितलें.

सुरुवातीला मी जरा आळसानें, विमनस्कतेनेंच तो लेख ऐकत होतें. प्रारंभींचें कातकऱ्याच्या तळाचें वर्णन—"त्याच्या झोंपड्या, पाचपचवीस कोंबडीं, गाईम्हशी व कालवडी, चोपलेलीं लाघोळीं पाचसहा कुत्री—" या साऱ्या तपशिलांत मला फारशी मौजहि वाटेना कीं त्याचें रहस्यहि ध्यानांत येईना नेहमीं गोष्टी वाचताना सुबक, नाजूक, रेखीव, संयमित, आकर्षक अशा तऱ्हेच्या 'तनशुद्ध' प्रारभास चटावलेल्या माझ्या मनाला हें विस्कळित व सकृद्दर्शनीं अर्थशून्य भासणारें वर्णन भारी कंटाळवाणें वाटलें. किंचित् नाखुषीनेंच मी ऐकत राहिलें—

—आणि मग, कसा कोण जाणें, अचानक त्या वाचनाला, त्या कथेला विलक्षण रंग भरला बंशी नांवाच्या एका रूपसुन्दर परंतु मलिन, दीनवाण्या भासणाऱ्या बालकानें गोष्टींत अवचित प्रवेश केला. गुडघाभर पाण्यातून गमतीनें पावलें टाकीत असतांच एकदम पृष्ठभागाखालून जाणाऱ्या वेगवान् प्रवाहांत सापडावें आणि पाठीला लागून तीव्रबरोबर ओढलें जावें तद्वत् त्या गोड, कोवळ्या, अनाथ बन्सीनें आमचीं मनें अकस्मात् वेधून, खेचून घेतलीं आम्ही सरसावून बसलों व उत्कंठेनें ऐकूं लागलों विलक्षण दैवयोगामुळें आईबापापोरक्या झालेल्या बन्सीच्या मनोवेदनेशीं आम्ही समरसून गेलों! कातकऱ्याच्या घरीं दिवस काढणाऱ्या पादरवेश 'बंशी'च्या मनात 'आइ देवकी दाइ यशोदा तिला चिकटतो हा वेडा' या कानफाट्यानें गाइलेल्या ओळी ऐकून जी अबोध व आर्त कालवाकालव निर्माण झाली तिची वेदना बन्सीबरोबर आम्हींहि अनुभविली. एके रात्रीं बन्सी जेव्हा गुपचूप कातकरीतळ सोडून आपल्या मायबापाच्या शोधार्थ अफाट जगांत निघाला तेव्हा आमचीं हृदयेंहि भयानें व उत्कंठेनें धडधडत त्याच्या पाठोपाठ गेलीं! बन्सीच्या मनाची सारी उत्सुकता, त्याच्या चिमुकल्या हृदयांतले दुर्दैवदाचे

कल्लोळ,त्याच्या चित्तानें भोगलेला दारुण निराशा हें सारें आम्ही पर्याकुल वृत्तीनें पाहिलें ! आणि असेरशेवटीं खऱ्या व मानीव अशा उभयहि मता पित्यांना मुकलेला, सर्वांथांन पोरका झालेला बन्सी सायंकाळच्या वेळीं निपण मनानें एकटाच नदीतीरावर बसून राहिला तेव्हा आमचीं मनेंही तेथें जाऊन पोंचलीं—गोष्ट संपली. अखेरचें वाक्य होतें, 'पोरका-पोरका बन्सी ओढ्याच्या काठीं बसला आहे. एक लाजोळें चोरलेलें रोडकें कुत्रें त्याच्या शेजारीं दोन पाय पुढें पसरून दीनवाणेपणानें त्याच्या तोंडाकडे पहात बसलें आहे. माझ्या गोड बन्सीपर ! तू आता कुठें रे जाशील ?

—या प्रश्नावला निव्हाळा थेट हृदयाला जाऊन भिडला आणि माझ्या डोळ्यात अचानक पाणी उभें राहिलें ! ती गोष्ट ऐकल्यानतर इतरांच्या वाङ्मयापेक्षा एकदम काहीं तरी निराळें—अजिबात निराळें ऐकल्यासारखें मला वाटलें. इतक्य आपण वाचतों त्यापेक्षा हें सारें अजिबात वेगळें—पण अधिक सत्यपूर्ण, अधिक आशयपूर्ण आणि सर्वस्वी जिवत असें काहीं तरी आहे याची मला जाणीव झाली. वाचता वाचता मन थरथरून जावें, पोटात चमत्कारिक कालवाकालव व्हावी आणि डोळे पाण्यानें भरून यावेत असा अनुभव मराठी वाङ्मयात वाचनात मला फार क्वचित् आला होता. शब्दा-शब्दाबरोबर मनाचा ठाव घेणारे लेखक मराठींत आहेत, नाहीं असें नाहीं; पण ते फार थोडे आहेत. प्रा. माटे हे अशा लेखकातलच एक आहेत याची त्या दिवशीं प्रथमच मला साक्ष पटली.

काहीं दिवसानीं 'उपेक्षितांचें अंतरंग' हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर मीं तें जेव्हा सबंध वाचून काढलें तेव्हाहि लेखकाच्या योग्यतेची हीच जाणीव अधिक स्पष्टत्वानें माझ्या मनावर ठसली. नेहमीं शहरातलें नेटकें, आटोप शीर व मार्दवयुक्त जीवन जगणारांना गर्द अरण्यातल्या भव्य व उग्र वनश्रींचें दर्शन झाल्यावर जें काहीं वाटेल तेंच इतर मराठी ललितवाङ्मयाच्या वाचना नतर या पुस्तकाकडे वळल्यावर वाटतें. 'उपेक्षितांचें अंतरंग' हें पुस्तक नेहमींच्या ठराविक चाकोरीबाहेरचें आहे. मराठी लघुकथाच्या नेहमींच्या तराची कसोटी त्याला लावून मागावयाचें नाहीं पण असें असूनहि इतर तंत्रशुद्ध कथाहून या पुस्तकातील कथा अधिक चविष्ट, अधिक वेधक, अधिक परिणामकारक वाटतात याचें कारण त्या सत्यसृष्टीवर, जीवनाच्या खऱ्या

अनुभूतीवर आधारलेल्या आहेत, निव्वळ कल्पनातरंगावर उभारलेली ही स्वप्नसृष्टि नव्हे ! आपल्या समोवतीं वावरणाऱ्या परंतु आपल्या दैनंदिन जीवनकक्षेबाहेर पडणाऱ्या व त्यामुळेच कदाचित् आपल्या उपेक्षेस पात्र झालेल्या अशा व्यक्तींच्या जीवनातलीं सुखदुःखें, भावभावना, दर्पामर्ष इथें चित्रित केले आहेत, आणि हीं चित्रें विलक्षण अर्थपूर्ण झालीं आहेत याचें कारण त्यांच्याकडे बघणारा जो कथालेखक त्याची दृष्टि तीक्ष्ण, बुद्धि चिकित्सक, भावना रसिक आणि हृदय सहानुभूतीनें काठोकाठ भरलेलें आहे.

विशाल जीवनानुभव नसल्यामुळें म्हणा अगर प्रत्यक्ष दीनदरिद्री बहुजन समाजात जाऊन मिसळण्याची इच्छा नसल्यामुळें म्हणा आपणाकडे 'जान पद वाङ्मय' म्हणून जें वाङ्मय निर्माण झालें त्यात मनाला चीड आणण्या इतका कृत्रिमपणा भरलेला आहे या विधानास कांहीं अपवाद आहेत, नाहीं असें नाहीं, पण सामान्यतः मी म्हणतें तसें सरें! जी अनुभूति कधीं आली नाहीं, जें जीवन कधीं पाहिलें नाहीं अगर जीं दृश्यें कधीं स्वप्नात देखिलीं नाहींत त्याचें केवळ 'फॅशन' म्हणून वर्णन करण्याच्या नादानें आपल्याकडे बरेंच जानपद गद्य व पद्य वाङ्मय लिहिलें गेलें! यामुळें शेताच्या बांधावर अगर मोटवणावर प्रणयालाप करणारी खेडवळ युवक युवतींचीं जोडपीं वाङ्मयात पदोपदीं आढळू लागलीं जणू प्रणय हा एकच रस त्यांच्या जीवनात अक्षय्य पिंगा घालीत असतो जानपदांच्या प्रणयाचें भेदक दृश्य पहावयाचें असेल तर 'उपेक्षितांच्या अंतरंगातील 'कशाचा संसार!' ही करुण कथा वाचावी लेखक म्हणतो, "प्रेमी माणूस आप ल्याला नाहीं म्हणून पुष्कळ लोक खिन्न असतात, पण प्रेमी माणूस असून प्रेम करावयासच वेळ नाहीं अशी सहस्रावधि लोकांची स्थिति झालेली असते" आणि पोटापाठीमागें लागल्यामुळें बायकोच्या प्रेमळ सहवासालाहि वंचित होणारा या कथेचा कथानायक म्हणतो, "कशाचा संसार! कधीं एका जागीं सुखानं बसायला सापडतय का गोडीनं बोलायला सापडतय?...साची पारन सडकेन येताना तुमचीं बायामानसं अन् बापई फिरायला निघालेलीं दिसतात, तीं सुर्पान गोष्टी करत्यात, हवा खात्यात, तवा माझ्या मनात येत का आमच जिनं असं काय मातीच्या मोलाच! देवा, चण्डाळा! ऐस का क्येलंस?"

दीन, दरिद्री, असंस्कृत पण भल्याईने जगणाऱ्या जानपदांच्या जीवनातला 'प्रणय' हा असा असतो! हा 'प्रणय' आमच्या 'जानपद' वाङ्मयात कधींच रंगवला गेला नाही! 'लई, यांईच, मायदाळ, कसनुस' असे चार-दोन फालतू व मामुली रेंगाळ शब्द घालावयाचे आणि कथा कविता लिहून वाचकांपुढें 'जानपदवाङ्मय' ठेवल्याचें भाबडें समाधान मानावयाचें ही हास्यास्पद पण तितकीच संतापजनक प्रथा मात्र पुष्कळ लेखकांनी अगदीं हिरिरीनें चालवली होती. ब्राह्मणेतर जातींत जन्मलेल्या आणि बरेच दिवस खेड्यात व रानात वाढलेल्या माझ्या मनाला हें सारें वाङ्मय वाचून काहींतरी चुकल्या-चुकल्यासारखें वाटे. खेड्यात माझी मनोवृत्ति जे निसर्गसौंदर्य पाहते, जो रस चाखते, जी अनुभूति घेऊन सुखावते तिचा आढळ या तथाकथित 'जानपद' वाङ्मयात मला कुठेंच होत नसे. वाहत्या नदीच्या खळखळ-णाऱ्या थंड पाण्यात आणि भाल्याभोंवतीं फडकें लावून तयार केलेल्या 'थंड' पाण्यात जो फरक वाटतो तोच रस्त्याखुन्या रेंगाळ जीवनात आणि मराठी वाङ्मयात दिसून येणाऱ्या त्याच्या प्रतिबिम्बात आढळून येई. आणि मग वाटे, हे लेखक स्वत ची व वाचकांची दुहेरी वंचना करीत आहेत, एक तर जें जीवन त्यांच्या संपूर्ण परिचयाचें आहे तिकडे दुर्लक्ष करून त्या जीवनास हे लोक अन्याय करीत आहेत आणि दुसरें म्हणजे जें जीवन त्यांनी अजिबात उपभोगलें नाहीं त्याचीं कृत्रिम, अनुकरणात्मक चित्रें रंगवून त्या जीवनासहि ते भयंकर अन्याय करीत आहेत त्यामुळें त्यांच्या वाङ्मयात थड सुसंस्कृत नागर जीवनाची अभिजात ऐटहि दिसत नाहीं या खडकाळ ग्रामीण जीवना-तला निरागस राकटपणाही पाहावयास मिळत नाहीं——

——अशा विविध विचारांनीं खिन्न झालेल्या माझ्या मनाला 'उपेक्षितांचें अंतरंग' वाचताना अननुभूत समाधान लाभलें. खास आपल्या वातावरणात जाऊन हिंडूनफिरून आल्याचा आनंद वाटला, 'जें इतरत्र आढळत नाहीं तें येथें आहे, असें वाटून भुकेला जीव तृप्त झाला ग्रामीण जीवनाचीं इतकीं पूर्ण, इतकीं रेखीव आणि इतकीं जिवन्त चित्रें मराठी वाङ्मयात अन्यत्र अगदीं क्वचितच आढळतील. महार, कातकरी, रामोशी, मांग शाण्णव कुळीचे मराठे–खरेखर मूठभर पांढरपेशा 'वाऱ्यावामना'चा वर्ग सोडला तर महाराष्ट्रभर जो बहुजनसमाज पसरला आहे तो या महारमांगाचा, कातकरी–

मराठ्याचा, भिल्ल रामोशाचाच आहे. परंतु मराठी वाङ्मयाने आजवर या विस्तीर्ण समाजाची दखल घेतली नाही. प्रस्तुत पुस्तकात मात्र या उपेक्षित समाजातलेच नायक व नायिका घेऊन त्यांच्या भोवती कथासूत्र गुफलें आहे. आणि या नायकनायिकांचीं स्वभावचित्रें बघता सुंदर कॉलेजकुमारी अगर क्रिकेट खेळणारा कॉलेजकुमार यापेक्षा कथेतील वर्ण्यविषय व्हायला यांची लायकी केसभरहि कमी नाहीं असें दिसून येतें ! स्नेह, प्रेम, द्वेष, क्रोध, महत्त्वाकांक्षा विनोदबुद्धि असे मानवी जीवनाला आणि वाङ्मयालाहि लज्जत आणणारे हे सर्व गुण आपणा पांढरपेशाइतकेच प्रमाणानें यांच्या जवळहि आहेत. आणि परिसाच्या स्पर्शानें लोखंडाच्या तुकड्याचें उज्ज्वल सुवर्ण व्हावें तद्वत् लेखकाच्या प्रतिभासंपन्न लेखणीचा स्पर्श होताच या दीन, दरिद्री, अज्ञानी व भावड्या माणसांच्या स्वभावचित्रांत अपूर्व रंग भरला आणि त्यात अतीव आकर्षकता निर्माण झाली.

या आकर्षकतेचें दुसरें एक कारण म्हणजे या वर्गाविषयी लेखकास वाटणारी अपार सहानुभूति ! ही सहानुभूति जानपद लोकांत असणाऱ्या भलेपणामुळें व माणुसकीमुळेंच वाटू शकते हें उघड आहे लेखकांतील लोकांचा बाह्य मलिनपणा सोडला तर लेखकाच्याच भाषेत सांगायचें म्हणजे—"त्यांच्या मळकट चैपणीच्या आड स्वच्छ अन्तःकरणाची भलाई नांदते आणि डोक्यास गुंडाळलेल्या त्यांच्या भोंगळ मुंडाशाखालीं समंजस बुद्धीची ऋजुता वागत असते " याच भलाईनें व ऋजुतेनें लेखकाचें मन या हीनदीन वर्गाकडे वेधलें गेलें आणि त्यानें त्या वर्गाची चित्रें सहानुभूतिपूर्ण कलात्मकतेनें रेखाटून आपणापुढें ठेवली

या चित्रांपैकीं 'कृष्णाकाठचा रामवशी' 'तारळखोऱ्यातील पिऱ्या' व 'सतीचें वाण' यामधील सती यांचीं चित्रें विलक्षण भेदक व आकर्षक वठलीं आहेत शूर, बळकट, जातिवन्त, जितका क्रूर तितका प्रेमळ असा रामोशाचा नाईक सत्या आपणास अगदीं मोहून टाकतो जात दरोडेखोराची असली तरी सत्या हा शब्दाचा सच्चा आहे, खाल्ल्या मिठाला जागणारा आहे पांढरपेशाचा भित्रा लाचारपणा व दुर्बलतेतूनच उद्भवणारा क्षुद्र हलकटपणा त्याच्या जवळ औषधालाहि सापडायचा नाहीं. तो बलिष्ठांचा शत्रू पण दुर्बलांचा निरपराध्यांचा त्राता व रक्षणकर्ता आहे दूधभात जेवू घालणाऱ्या सावित्री-

बाईला त्यानें आपली 'बहीण' मानली, भुकेनें कळवळलेल्या गरिबगुरिबांसाठीं त्यानें बाजार मोकळे केले आणि शाळेतल्या लहान पोरांना वत्सलतेनें मिठाई चारली. फत्त्यासारखे इमानी अनुयायी त्याला लाभले होते आणि मनगटातल्या अजिंक्य सामर्थ्याच्या जोरावर तो निर्धास्त होता. पण—दुर्दैव त्याच्या प्रेयसीनेंच अखेर त्याच्याशीं बेइमानी केली आणि हा सच्चा वीर पोलिसांच्या हातीं गवसला! त्याची अखेरची कैफियत ऐकण्याजोगी आहे. जातीचा रामोशी असला तरी त्याचीसुद्धा एक विशिष्ट कुलपरंपरा आहे व तिचा त्याला अभिमानहि आहे तो पोलिसांना म्हणतो, " साहेब! चोर कोन? आमी प्रभु रामचंद्राचे चाकर हावो. आमचा तुगभद्रकडं राजा हाय. पन आमाला अशी दशा आली. आमी कुनाचा इस्वासघात केलाय् का? कुनाला गरिबाला नाडलय् का? आमाला जवळ करतील त्यांच्या जिवासाठीं आमी जीव देऊं. आमी मर्द रामवंशी आहोंत . कधीं ना कधीं काळ फिरल आन् आमाला बर दिस येत्याल!"

—हे त्याचें भाषण ऐकून कुणाचें मन द्रवणार नाहीं? सत्याप्रमाणेंच पिऱ्या मांगहि दरोडे घालणारा परंतु अत्यंत प्रामाणिक, ईश्वरनिष्ठ व हाडाचा सच्चा माणूस आहे. अंगात मुसमुसणारी रग आणि अशिक्षितपणामुळें असलेली बऱ्यावाइटाबद्दलची अविवेकिता यांच्या मिलाफानें तो दरोडेखोर, गुण्ड बनला तरी त्याचे हृदय सच्च्या मर्दाचें आहे. खंडोबाबद्दल त्याला वाटणारी भक्ति अमर्याद होती त्याची बायको जेव्हा पोलिसांच्या भीतीमुळें त्याला खंडोबाच्या जत्रेला जाण्याच्या विचारापासून परावृत्त करूं बघते तेव्हा तो गहिंवरून बोलतो, "तू अशी कशी बोलतियास चंद्राबाई? तू अशी कशी बोलतियास? . वर्सातून एकदा खंडुबाचं दर्शन् घडतया त्यनंबी सोडलं तर चोरीदरुड्यापल्किडं काय रायलं?" या भाबड्या परंतु शूर गुण्डाचा फायदा दुबळ्या पांढरपेशांनी घेतला व त्याला हुलीवर घालून चोरीदरोड्यास प्रवृत्त केलें अखेर शेवटीं पिऱ्या मांग जेव्हा तळतळून आपली कैफियत देतो तेव्हा डोळ्यास पाणी येतं! पिऱ्या म्हणतो, "—तालेवारानीं सांगितलं म्हूनशान् धरेल. पन् त्येंचा जरीचा मंदिल त्येंच्या टकुरीला राहिला, त्येंची कंठी त्येंच्या गळ्यात ऱ्हाइली अन् माझ्या हातापायात हे बेड्या आल्या बगा—" पिऱ्या पेक्षा पिऱ्याला दुर्बुद्धीवर घालणारे 'तालेवार' अधिक गुन्हेगार नव्हेत काय?

पतीच्या मरणानंतर त्याचा जोडा जपून ठेवणारी, व त्याच्या जोरावर दुष्टापासून व हलकटापासून आपलं पातिव्रत्य सांभाळणारी सई, मायापरच्या ओझ्याप्रमाणें गरिबीचें ओझेंहि हसतमुखानें तोलून धरणारी दरिद्री पण समाधानी वृत्तीची हेलकरीण कोयना, अत्यंत सभ्य व प्रेमळ असा तवा महार, दारिद्र्यामुळेंच चेहऱ्यावर हास्याची रेषाहि उमटवू न देणारा स्थितप्रज्ञ लिंगमन्, पदोपदीं अपमान, अवहेलना व उपेक्षा सोसूनहि सौजन्याच्या सदसद्विवेकबुद्धीच्या साऱ्या सीमा सांभाळणारा 'अस्पृष्ट' पिऱ्या, धनलोभानें पोटचीं पोरें दुबजात घालणारा पण ऐनवेळीं वात्सल्यप्रेमानें काळीज फुटून मेलेला बहिरनाक–हीं सारीं व्यक्तिचित्रें आपापल्यापरी अत्यंत रेखीव वठलीं आहेत. आपण पांढरपेशे लोक अत्यंत मिळमिळीत झालों आहोंत आपले हर्षखेद, कामक्रोध सारेच जणू विशल्यासारखे, सौम्य असे असतात. कधीं आपण उत्कटतेनें प्रेम करणार नाहीं कीं कधीं उत्कटतेनें कुणाचा द्वेष करणार नाहीं. आपले भाव सौम्य आणि त्याच्या आविष्काराची आपली पद्धति त्याहून सौम्य व नेमस्त! त्यामुळें या जानपदांच्या जीवनांतले झंझावातासारखे जोरकस भावना-विष्कार बघून आपणास भय वाटतें तेथें पिऱ्या आणि त्याची पत्नी चंद्राबाई हे उजाड माळावर निळ्या आभाळाच्या चांदण्याखालीं परस्परसहवासांत दिवस व रात्री घालवतात, आपणास सत्यानें पत्नीपदावर न चढविता केवळ 'कडू रंकेली' म्हणून ठेवलें या अपमानाच्या जाणिवेनें बेहोष होऊन वेडा चंद्रेली रखमा पोलिसांना फितूर होते व सत्याचें वाटोळें करते, अगर बहिरनाक महार पैशासाठीं पोटचीं पोरें बळी द्यायला तयार होतो–ही वृत्तींची तीव्रता आपली नव्हे, ती जानपदांचीच आहे आपणास ती अतिरंजित वाटली तरी खरोखरी ती वास्तवच आहे आणि या वास्तवतेमुळेंच वरील स्वभावचित्रें अत्यंत उत्कट व आकर्षक वठलीं आहेत

आतापर्यंतच्या एकंदर विवेचनावरून 'उपेक्षिताच्या अंतरंगांत केवळ ग्रामीण जीवनाचींच चित्रें रंगवलीं आहेत असा जर कुणी समज करून घेईल तर तो मात्र खरा ठरणार नाहीं! तसें म्हटलें तर या पुस्तकांत अगदीं ग्रामीण जीवनावर आधारलेल्या अशा कथा फार तर सहासात–म्हणजे एकंदर कथासंख्येच्या निम्म्यानेंच आहेत उरलेल्या कथांतून जीवनाच्या भिन्नभिन्न परिसरांतील व्यक्ति घेऊन त्यांच्याभोंवतीं कथासूत्र गुंफलें आहे या व्यक्ती

परस्परांपासून अतिशयच भिन्न क्षेत्रांत वावरणाऱ्या व भिन्न अभिरुचींच्या असा आहेत. येथें ब्राह्मणेतर वर्गांतल्या मोलकरणी सई शनारी कृष्णाकांठच्या नैमनिष्ठ ब्राह्मण घराण्यातली मर्यादशील सून सावित्री दिसून येईल, धुंद, बळकट व बेदरकार असा सत्यापित्यासारख्या दरोडेखोरांशीच निष्ठेचा नामघोष करून इंद्रायणीच्या वाळवंटात बेहोष होऊन नाचणारा तो सुप्रिख्यात देहूचा वाणी आढळेल अगर आईबापाच्या वत्सल मायेला मुकलेल्या बन्सीजवळच खुद्द आईबापानींच पैशाच्या लोभानें कुरुजात पुरलेली नाच नाकदेवदासीसारखी अजाण, निष्पाप अर्भकेंहि दिसून येतील! कुठें महार तयाची मजुळा तर कुठें ब्राह्मण प्रभाकराची सावित्री! कुठें दरोडेखोर सत्यापित्या तर कुठें भगवद्भक्त संत तुकाराम! कुठें पुरंदरचा नामा तर कुठें मुंबईच्या दवाखान्यातला लिंफमन्! परंतु इतर बाबतींत या लोकांत कितीहि फरक असला तरी एका बाबतींत मात्र त्या सर्वांत साम्य आहे. ते सारेजण 'उपेक्षित' आहेत, वंचित आहेत—दैवानें म्हणा, समाजानें म्हणा, परिस्थितीनें म्हणा अगर खुद्द निर्बीच्या जिवलगांनी म्हणा—या अभाग्यांची उपेक्षा केली आहे, दारुण वंचना केली आहे. या एकाच साम्यानें त्या साऱ्यांतून एक सूत्र ओंवलेलें आहे. त्यांच्या भिन्नभिन्न जीवनांतून उपेक्षेचा एकच एक खिन्नकरुण सूर सारखा चाललेला आहे आणि म्हणूनच लेखकानें त्या साऱ्यांना एकत्र गोंवून टाकून त्यांच्या उपेक्षेचें, त्यांच्या मनोवेदनांचें, त्यांच्या दुर्दैवाचें भेदक चित्र वाचकांपुढें उभें केलें आहे. यामुळेच सर्व पुस्तकासहि एक प्रकारची संगति व सूत्रबद्धता लाभली आहे.

या कथांचा परामर्श घेतांना एक विचार मात्र मनांत चमकून जातो. या सर्व व्यक्तींकडे लेखकाचें लक्ष आधीं वळलें कसें? मुंबईचा लिंफमन् आम्ही बघतों, समाजाच्या भरचौकांतून अब्रू सांभाळीत जाणारी विधवा पतिव्रता सई आम्हीहि पाहिलेली असते, पुरंदरचा नामा अगर महईतली हेल्दरीण कोयनाबाई आम्हांलाहि पावलोपावलीं भेटत असतात पण आमचें लक्ष तिकडे कसें वेधत नाहीं? आणि या विशिष्ट लेखकालाच तिकडे पहायचें कसें सुचलें?

या प्रश्नाचें उत्तर पुस्तकांतच एका ठिकाणीं लेखकानें देऊन टाकलें आहे. हास्याचा शोध या लेखांत लेखक म्हणतो, "मला अशी चमत्कारिक खोड

लागलीं जाहे की इतराच्या सगतींत घर मान वरून चाल्लें असताना तो जो आपला एकतारीवाला फुटपाथवर बसलेला असेल त्याच्याकडेच लक्ष जावयाचें! शेकडों हजारों श्रीमंत, देखणीं, नटलेलीं—सजलेलीं माणसें भोंव-तालीं चाल्लीं असता माझी दृष्टि चोरून त्या अन्धाकडे जाते. त्यानें तें रेंकत म्हटलेलें 'तुका म्हणे' ऐकलें म्हणजे मनाची कालवाकालव होते व तुकारामाचें म्हणणें काय आहे तें ऐकावयाची कुणाची तयारी नाहीं हें पाहून वाईट वाटतें" लेखकाच्या मनाची विशिष्ट ठेवण ही अशी असल्यामुळें सर्वसाधारण मराठी ललितलेखकाच्या कलावन्त लेखणीनें अनाकर्षक म्हणून दूर लोटलेले विषय लेखकानें निवडले व आपल्या सहृदय प्रतिभेनें त्यावर 'वाङ्मया'चें सुंदर लेणें चढवलें! या पुस्तकातल्या नायकनायिका या दैवानें, समाजानें परिस्थितीनें उपेक्षिलेल्या, वंचविलेल्या आहेत असे मी वर म्हटलें. त्या विधानात किंचित् उणीव राहिली आहे दैव, समाज अगर परिस्थिति यांबरो-बरच आमच्या ललितलेखकांनींहि या ग्राहृत. मलिन, अमंगळ, दीनवाण्या, अज्ञानी अशा दिसणाऱ्या माणसांची उपेक्षा केली आहे. वस्तुतः आमच्या ललितवाङ्मयात हल्लीं जो विशिष्ट वर्ग वर्णनविषय झालेला आहे तो समाजान सख्येनें फार थोडा आहे. या सधन, विलासी आणि आपल्याच भाव भावनाचें चोज पुरवणाऱ्या मूठभर वर्गाबाहेर दारिद्य, अज्ञान आणि भोळे पणा यांनीं वेढलेला जो विस्तृत बहुजनसमाज आहे त्यालाच खरें म्हटलें तर ललितलेखकांनीं अधिक प्रामुख्यानें आपला वर्णनविषय बनवावयास पाहिजे, शहराची सीमा सोडून आपण बाहेर पडलों कीं पदोपदीं हेच दीन लोक आपणास भेटतात. परंतु आपलें दुर्दैव असें कीं स्वत च्या पांढरपेशेपणाला यांच्या सगतीनें मलिनता येईल कीं काय या भीतीनें आम्ही जीवनात आणि वाङ्मयातहि या लोकाना स्वत पासून फार दूर ठेवलें आणि कुठल्या तरी आभासमय काल्पनिक सृष्टीचें वर्णन करण्यातच आम्ही रंगून गेलों. यामुळे कृत्रिम ते आम्हास वास्तव वाटू लागलें आणि जें खरेखुरें, वास्तव त्याचा मार अर्थ कळेनासा झाला!

या पुस्तकात या उपेक्षिताचें जीवन लेखकानें सहानुभूतिपूर्ण कलात्मकतेनें रेखाटलें आहे. यांतील काही चित्रे आपणास किंचित् अद्भुत वाटतील, काही अलिखनाचा अर्थहि आपणास कळणार नाहीं. पण तसें झाल्यास तो

दोष आपलाच आहे, लेखकाचा नव्हे ! या पुस्तकातली सारी स्वभावचित्रें, सान्या घटना, वास्तवावर आधारलेल्या आहेत, "या गोष्टींना वास्तवाची भूमिका आहे" असें लेखकानें प्रस्तावनेंत म्हटलें आहे आणि सत्य हें कधीं कधीं कल्पनेपेक्षा अद्‌भुतरम्य असतें या न्यायानें 'तथाकथित' ल्युकथापेक्षा या कथातल्या घटना आपणास अधिक अद्‌भुतरम्य वैचित्र्यपूर्ण वाटतात आपल्या सभ्दी असलेली अनेक ल्हानसहान वृत्तें, स्मृतींत दडलेले बारीक-सारीक प्रसंग लेखकानें बाहेर काढले आणि ते सुंदर, साकार व सजीव स्वरूपात वाचकापुढें उभे केले ! या लेखारंभीं मीं जो उतारा दिला आहे त्यात प्रा माटे यांनी मराठी ललितलेखकाना एक अतिशय मोलाची सूचना देऊन मार्गदर्शन केलें आहे असें मला वाटतें पांढरपेशात वर्गात जन्मलेल्या व वाढलेल्या पांढरपेशा लेखकाना आपला पोपाख धारण करणाऱ्या, आपली ढब, रीतभात आचरणात आणणाऱ्या, आपली शुद्ध व स्वच्छ भाषा बोलणाऱ्या या सजातीय पांढरपेशा बद्दलच काय तें कुतूहल वाटतें, त्याच्या विपर्यांच काय तो जिव्हाळा वाटतो आणि त्याचेंच चित्रण कथाकविता-कादंबऱ्यातून करावेंसें वाटतें पण हा आकुंचित कोंडी फोडून जर मराठी लेखक बाहेर पडेल तर तेथें त्याला हवे तितकें आकर्षक जीवन रंगवावयास सापडेल या जीवनाचा बाह्य रविवेष दीन मलिन अमंगळ असला तरी त्याच्या आत प्रीतीचे जिवन्त झरे खळाळत आहेत, विशाल सहानुभूतीचीं सरोवरें तुडुंब भरलीं आहेत आणि या सर्व देखाव्यावर 'माणुसकी'च्या चंद्राची शीतल ज्योत्स्ना अखण्ड प्रकाशत आहे असें स्पष्टपणें दिसून येईल. या जीवनाकडे मराठी लेखकाना आजवर दुर्लक्ष केल हें त्याचें व मराठा वाचकाचें दुर्दैव ! 'उपेक्षितान्या अंतरंगात' हें जीवन लेखकानें रंगविलें आहे मूळ घटनेपुरता वास्तवाची ही उसनवारी सोडली तर पुढें मात्र चहूकडे लेखकाचे कलात्मक व मनोज्ञ कथनकौशल्य दिसून येतें. ग्रामीण जीवनावरील कथाइतकयाच नागर जीवनावरील कथाहि सुंदर उतरल्या आहेत या कथात 'सावित्री मुक्याचेच मेली' ही कथा, मला वाटतें सर्वोत्कृष्ट ठरेल वासुदेव बळवत फडक्याच्या बडात सामील झालेल्या व काळ्यापाण्यावर गेलेल्या एका ब्राह्मण तरुणाच्या नवोढा पत्नीची ही कथा अत्यंत हृदयद्रावक आहे पत्याकरान्या निर्गमनानंतर सावित्रीनें पाळलेलें नैमनिष्ठ आयुष्य, आज ना उद्या पति परत येईल ही खात्री बाळगून तिनें

चालवलेली अखंडित तपश्चर्या आणि शेवटी ऐन मोक्याच्या घडीला दुःखाने तिला आलेला अचानक मृत्यु– हें सारें वाचीत असता आपले डोळे पाणोपाणी ओले होतात. जन्मभर वंचित झालेली अभागी सावित्री अखेर मुक्यानेंच मेली! तिचा पति तिच्या चितेजवळ म्हणतो, "सती, ए सावित्री सती, ए माझे सावित्री सती, तू माझी अन् मी तुझा आहे. आता नसली तरी तुझी माझी कुठ तरी गाठ पडेल.. . सावित्री, एक शब्द जरी माझ्याशी बोल्ली असतीस तरी वीस वर्षांचं माझ दु:ख गेल असत, सगळ्या जन्मात तू आणि मी एकदाहि प्रेमळपणान बोल्लों नाहीं, कारण नशिबानच आपली उपेक्षा केली!",

वंचित प्रणयाचें इतकें हृदयस्पर्शी व उत्कट चित्र मराठी वाङ्मयात अन्यत्र सापडणें कठीण आहे. या कथेंतला कारुण्याचा आविष्कार बंग साहित्यिक, रवींद्रनाथ ठाकूर अगर शरच्चंद्र चतर्जी यांचा तोडीचा वाटतो. 'सावित्री मुक्यानेंच मेली' ही कथा या पुस्तकातीलच नव्हे तर सर्व मराठी वाङ्मयातील अत्युत्कृष्ट कथांपैकीं एक आहे.

वातावरणाच्या उत्कृष्ट परिपोषासाठीं 'नाथनाक आणि देवकाई यांची काळ-झोप' ही कथा उल्लेखनीय आहे. नरबळी देण्याची कल्पनाच आधीं भयानक, त्यांतून वातावरणाचें हुबेहुब चित्रण, महार समाजाची भाषाशैली आणि अज्ञ बहुजन समाजाच्या मनोवृत्तीचें अचूक रेखन यामुळें ही कथाहि अप्रतिम वठली आहे, वरील दोन्ही कथांतले उतारे देणें म्हणजे त्यांच्या सर्वांगीण सौंदर्याला अन्याय करण्यासारखें आहे. या सरस कथा मुळातूनच संपूर्ण वाचायास हव्यात! 'माझें मनोराज्य' व 'इंद्रायणीच्या वाळवंटात येथें खुद्द लेखकाच्याच मनाचे काहीं मधुर असे विशेष पहावयाला मिळतात इंद्रायणीच्या वाळवंटातील तुकयाच्या मानसिक उत्क्रान्तीचें केलेलें विवेचन फारच मार्मिक व अर्थपूर्ण आहे.

प्रा. माटे हे मराठींतले एक उत्कृष्ट शैलीकार लेखक आहेत, हें आता नव्यानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. परंतु तरीदेखील या पुस्तकातली भाषाशैली विलक्षणच हृदयंगम आहे व पुस्तकाचीं बरीच आकर्षकता या भाषाशैली मुळें आली आहे हें सांगणें मात्र आवश्यक आहे लहान लहान, जोरकस वाक्यें जानपद शब्दांचा अर्थपूर्ण व उचित उपयोग आणि रसाळ व वेधक

वर्णनें हीं या मावेचीं प्रमुख अंगें होत. भाषासौंदर्याच्या दृष्टीनें 'सावित्री मुक्यानेंच मेली' व 'नायनाक आणि देवकाई यांची काळझोप' या दोन्ही कथा अप्रतिम आहेत. वर्णनशैलीच्या दृष्टीनें सत्या-पिन्याची शब्दचित्रें, छोट्या बन्सीच्या मनोवेदनाचें वर्णन, खंडोबाच्या जत्रेचें वर्णन—सर्व पुस्तकातच ठिकठिकाणीं अशीं वर्णनें वैपुल्यानें पसरलीं आहेत. कांहीं वाक्यें येथें उद्धृत करण्याचा मोह अनावर होतो.

"—उत्तरोत्तर परिवेषात, सौंदर्यसामीप्यात, वैभवाच्या प्रसन्नतेत थोडें तरी दिवस राहावें ही माणसाच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति असते."

"—झोपड्यात राहणारे गरीब जर तेजस्वी होतील तर ते श्रीमताच्या हवेल्यापेक्षा ताठर होतील व श्रीमत जर रंगेलच राहिले तर त्यांच्या माना गरिबाच्या झोपडीपेक्षा खालीं वाकतील."

"—प्रेमळ सहचर्याचा, सगतीचा उन्हाळा असतानासुद्धा परस्परावर निष्ठा ठेवून माणसें कशी सुखोत्पत्ति करून घेतात हें पाहिलें म्हणजे त्याची निष्ठा वाङ्मयात स्थिर होण्यास जास्त लायक आहे असें वाटतें."

एका लहानशा वाक्यातून विस्तृत अर्थ व्यक्त करण्याची लेखकाची हातोटी विलक्षण आहे. पुढील लहान पण अर्थगर्भ वाक्यें पहावीत : रसपरिपोष, अर्थवत्ता आणि संयम या सर्व कसोट्यास तीं पूर्णतः उतरतात. 'बन्सीनें भंयानें घुटका गिळला' 'संकटाच्या प्रसंगीं सर्वांचेंच दुबळेपण उफाळून वर येतें' 'दारिद्र्य हाहि एक भोगच आहे' 'बन्सीच्या चित्ताचा कादा उन्मळून बाहेर आला.' 'विणविण करीत सगळा बाजार मागे पुढें माग पुढें रेलत होता' 'सादि-व्यापार आणि मनोव्यापार एका ल्यींत आले' 'पदरावर एकाद्या गुरा प्रमाणें ओरडला व भुईवर कोसळला' अशीं एक ना दोन, किती वाक्यें द्यावीत! जर्बर, काल्या, थापदनाईक, तालेवार, इत्यादि अस्सल मराठी पण अवापरामुळें आपणास अपरिचित वाटणारे शब्द तर पुस्तकात पदोपदी विखुरले आहेत.

—प्रस्तावनेत 'लघुकथेचें तत्र आपणास कळत नाहीं' असे लेखकानें म्हटलें आहे परंतु सखोल जीवनानुभव, जातिवत सहृदयता आणि अभिजात रसिकता याना कलेचें तत्र शिकून घ्यावें लागत नाहीं. या तीन गुणांचा मिलाफ झाला तर खरें तत्र आपोआप त्यातूनच विकसित होत असतें.

आणि 'उपेक्षिताच अतरग' हें अशा तन्मयतेचें उत्कृष्ट उदाहरण नाहीं काय!

## विज्ञानबोध : : : १०

श्री. कृ. गो. लिमये, एम्. ए. एल्एल्. बी., संपादक 'ज्ञानप्रकाश'

श्री श्री. म. माटे यांनी पहिली दोनशें पृष्ठे व्यापील, एवढी एक प्रचंड प्रस्तावना या ग्रंथाला जोडली आहे अर्थात् तिला प्रस्तावना हें साधें नाव देण्यापेक्षा, प्रस्तावनाखंड हें व्यापक नाव देण्यात आलें, हें योग्यच झालें श्री माटे यांनी विज्ञानबोधाला जोडलेला हा प्रस्तावना-खंड म्हणजे एक प्रकारचा स्वतंत्र ग्रंथच आहे, असें म्हटलें तरी चालेल त्यात मानवी ज्ञानाच्या व सुधारणेच्या उगमापासून तों आज तागायत मानवानें जी आध्यात्मिक व आधिभौतिक प्रगति केलेली आहे, तिचें विहंगमदृष्ट्या निरीक्षण करून, त्यापासून आजमितीस महाराष्ट्रानें कोणता बोध घेतला पाहिजे, हा संदेश श्री माटे यांनी या प्रस्तावनाखंडाच्या द्वारा महाराष्ट्राला आपल्या जोरदार, पीळदार, आणि खणखणीत मार्फत निवेदन केलेला आहे ज्या शास्त्रज्ञानाच्या बळावर पाश्चात्य राष्ट्रांनी आपली कल्पना तीत प्रगति करून घेतली, त्या शास्त्रीय ज्ञानाचे जिवत झरे आपल्या राष्ट्रात व विशेषत महाराष्ट्रात उत्पन्न व्हावयास हवेत, तसें झालें तरच यापुढें आपला टिकाव लागू शकेल, नाहीं तर आपले हाल कुत्रा खाणार नाहीं, अशी स्थिति होईल, हा श्री. माटे यांचा स्फूर्तिजनक संदेश महाराष्ट्रातील जनतेच्या हृदयास जाऊन भिडेल अशी आम्ही उमेद बाळगतों वस्तुत शास्त्रीय ज्ञानाची आवश्यकता व आधिभौतिक विज्ञानप्रसाराचें महत्त्व हीं महाराष्ट्रीय जनतेपुढें आज प्रथमच श्री माटे यांच्या लेखणीद्वारा माडलीं जात आहेत, असें नाहीं यापूर्वीही अनेक विद्वान् लेखकांनीं आणि विचारप्रवर्तकांनीं भौतिक शास्त्रा ध्ययनाच्या आवश्यकतेचा संदेश हिंदी राष्ट्राला दिलेला आहे कित्येकांनीं मर्यादित क्षत्रात भौतिक शास्त्रावर ग्रंथरचनाही केलेली आहे, आणि कित्ये कानीं भौतिक शास्त्रीय संशोधनाची कामही चालेली आहे. पण हें सर्व खरें

असूनही, श्री माटे यांच्या प्रस्तावनाखंडाचें वैशिष्ट्य व महत्त्व कमी मानता येणार नाहीं. कारण भौतिक शास्त्राध्ययनाच्या व्यापक ज्ञानप्रसाराचा व संशोधनाचा त्यांनीं केलेला वैचारिक पुरस्कार हा एका दृष्टीनें अपूर्व असाच आहे. त्यांनीं या प्रस्तावनाखंडांत मानवी प्रगतीचें केलेलें निरीक्षण व केवळ वेदान्त, साक्षात्कार, आध्यात्मिक उन्नति, वगैरे प्रकारच्या चर्चेत गुरफटून जाऊन सर्व जनतेची भूमिका घेणाऱ्या तत्त्वज्ञान्यांच्या समाधानी वृत्तीला दिलेला धक्का, या गोष्टी मराठींतील विद्यमान वाङ्मयांत तरी निदान अद्वितीयच ठरतील.

श्री. माटे यांचा हा जागतिक ज्ञान व संस्कृति यांचें साकल्यानें निरीक्षण करण्याचा प्रयत्न, व त्यावरून भौतिक शास्त्राध्ययनाच्या कामधेनूची आराधना व जोपासना करण्याचा स्वदेशबांधवांना कळकळीचा टाहून केलेला उपदेश, हा पहिला म्हणजे सोळाव्या शतकांतील आंग्लसाहित्यिक व तत्त्ववेत्ता लॉर्ड (फ्रॅन्सिस) बेकन याची स्वाभाविकच आठवण होते बेकनचें Advancement of Learning (ज्ञानप्रगति) हें पुस्तक ज्यांनीं अभ्यासिलें आहे, त्यांना श्री माटे यांची विज्ञानबोधाच्या प्रस्तावनाखंडांतील विचारसरणी अक्षरशः पटण्यासारखी आहे बेकनच्या पूर्वी युरोपांत जी ज्ञानप्रसाराची स्थिति होती, तशीच सध्या आपल्याकडेही आहे सामान्य जनता अज्ञानांधकारांत गुरफटलेली आहे, व जें "पवित्र ज्ञान" म्हणून समजलें जातें तें मूठभर शास्त्री, पंडित व वेदांती यांनाच प्राप्त झालेलें आहे अशी 'जाणत्या' लोकांचीहि समजूत झालेली आहे अग्निहोत्र्यांनीच व्याख्यानसत्रांना होणारी प्रौढ लोकांची बेसुमार गर्दी हें या मताच्या प्राबल्याचें द्योतकच होय, असें म्हटलें तरी चालेल बेकनच्या पूर्वीहि युरोपांत अशा धर्माध्यक्षांचेंच बंड माजलेलें होतें तच स्वतःला ज्ञानाचे मेरुपर्वत समजत. जनताहि अज्ञानानें त्यांनाच ज्ञानसागर समजे ह धार्मिक ज्ञाननिधि सदैव धटपटाच्या खटपटींत (Scholasticism) गुतून बायबलमध्यें जें नाहीं, तें विश्वांत नाहीं अशा सिद्धांताचा पुरस्कार करीत पण त्याचें तें वाग्जाल व तर्कजाल (Cobwebs of learning) हें एखाद्या कोळ्याच्या विणलेल्या सूक्ष्म जाळ्यासारखें आहे, तें टिकाऊ नाहीं, ही गोष्ट बेकनने प्रथम जाहीर रीतीनें आपल्या ग्रंथाच्या द्वारें लोकापुढें मांडली, व म्हणूनच बेकनला आधुनिक शास्त्रीय युगाचा जनक म्हणून समजतात. बेकन हा स्वतः ॲरिस्टॉट-

ल्या तत्त्वज्ञानाचा भोक्ता होता पण जगातील ज्ञानाची परिसीमा, ॲरिस्टॉटॅलिअन तत्त्वज्ञानानें किंवा त्यातील ज्ञानशास्त्राच्या वर्गीकरणानें गाठलेली नाही, असें जगाला स्वच्छ रीतीनें सांगून, बेकननें अधिभौतिक शास्त्राध्ययनाची कास धरण्याला स्वदेशबांधवांना उद्युक्त केलें निसर्गातील चमत्कारांचें संशोधन करा, त्यांतील कार्यकारणभाव मानवी मनानें व तर्कानें उघडकीस आणा, म्हणजे निसर्गावरहि मानवी सामर्थ्य स्थापितां येईल ही बेकनची विचारसरणी अखेर युरोपला पटली व तिनेंच युरोपचा गेल्या तीन शतकांत कल्पनातीत अभ्युदय झाला श्री माटे यांनी या प्रस्तावनाखंडात बेकनच्या प्रतिपादनाचें अनुकरण केलेलें नसलें, तरी बेकनच्या प्रतिपादनाची पार्श्वभूमि व श्री माटे यांच्या प्रस्तावनाखंडाची पार्श्वभूमि यांत बरेंच वैचारिक साम्य आहे, असें आम्हांस वाटतें, व म्हणून या मुद्द्याचा आम्ही येथें जरा विस्तारानें उल्लेख केला आहे अर्थात् बेकनचें तत्त्वज्ञान ज्याप्रमाणें त्याच्या समकालीन शास्त्रीपंडितांना मान्य झालें नाही व काहीं काळ त्यांनी त्याला विरोधहि केला, तसाच अनुभव श्री माटे यांच्या प्रतिपादनाच्या बाबतींतहि येणें, हें बरेंच संभवनीय आहे उदाहरणार्थ, धर्म, साक्षात्कार, वगैरे बाबतींत त्यांनीं व्यक्त केलेली विचारसरणी ही रूढ वेदांतवादी विचारसरणीला धक्का देणारी वाटेल, व काहीं पंडितम्मन्य तर श्री माटे यांच्यावर अहम्मन्यतेचा व लहान तोंडीं मोठा घास घेण्याचा उपहासास्पद प्रयत्न केल्याचाहि आरोप करावयाला मागेंपुढें पहाणार नाहींत पण ह्या वादांतूनही अखेर भौतिक ज्ञानाची कास धरा हा संदेशच विजयी ठरेल, असा आम्हांस पूर्ण भरवसा वाटतो सध्याच्या काळीं अशा उत्साहवर्धक व प्रभावशाली संदेशाची महाराष्ट्राला फार जरूरी आहे, व तें कार्य योग्य वेळीं केल्याबद्दल श्री. माटे हे अभिनंदनास पात्र आहेत

श्री. माटे यांनीं आपल्या प्रस्तावनाखंडाच्या पूर्वार्धांत मानवी प्रगतीचें केलेलें सिंहावलोकन, अर्थातच, परिपूर्ण किंवा सर्वांगसुंदर आहे, असें म्हणतां येत नाहीं तथापि, त्यासंबंधांत त्यांनीं व्यक्त केलेले काहीं विचार निःसंशय नावीन्यपूर्ण असून ते पुष्कळांच्या विचारप्रवर्तनाला कारणीभूत होतील, यांत शंका नाहीं मानवी प्रगतीचीं युगमानें किंवा कालखंड हे एकाद्या महापुरुषाच्या जन्ममृत्यूंच्या सनतांवर आधारलेले आहेत असें समजल्यानें अनेकदा

लोकांची दिशाभूल होते, ही गोष्ट काहीं खोटी नाहीं मानवी प्रगति ही अशा रीतीनें मर्यादित नाहीं तिचा स्रोत व प्रवाह फार दूरगामी आहे, ही जाणीव मनात बाळगून जर मनुष्यप्राणी मानवी प्रगतीचें निरीक्षण करू लागला, तर मनुष्याच्या ज्ञानाची व सामर्थ्याची प्रगति ही, त्या प्रमाणात त्यानें भौतिक शास्त्रावर विजय किंवा त्यात नैपुण्य संपादलें, त्याच प्रमाणात झालेली आढळून येते, हें या प्रस्तावनेंतील अनुमान निःसंशय निरपवाद आहे बुद्ध किंवा ख्रिस्त ह्यांची शिकवण मानवी प्रगतीला कारणीभूत झाली ही गोष्ट खरी आहे, परंतु ती यशस्वी होण्याचें मुख्य कारण ती शिकवण ईश्वरप्रणीत होती हें नसून, ती तत्कालीन परिस्थितीवर योग्य उपाययोजना करणारी होती, म्हणूनच होय, हें लक्षांत ठेविलें पाहिजे अशा दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहिलें, तर धर्मानें अज्ञानवर्धनाला मदत न होता, निसर्ग संशोधनाला तें साहाय्यच होईल, यांत शंका नाहीं बुद्धाचें अहिंसेचें तत्त्वज्ञान लोकांना केवळ पशुयज्ञाच्या प्रसाराविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून पटलें असावें, हें मत रा. माटे यांना मान्य नाहीं ते म्हणतात —

अखेर प्रत्यक्ष रीतीनें वस्तुजात ज्ञानाच्या पलीकडे मनुष्याला नेऊं शकत नाहीं, असें त्याचें म्हणणें आहे, व तें त्यानी बरेंच कुशलतेनें पुढें मांडलें आहे. श्री. माटे म्हणतात, "ब्रह्मविद्येच्या कालापर्यंत संसारी लोकांनीं झगडून जें ज्ञान संपादिलें होतें, त्यापलीकडचें वस्तुजातीचें ज्ञान ब्रह्मविद्यांना होतें, असें वाटत नाहीं. तें जर असतें, तर *त्याचा कांहींना कांहीं प्रत्यय त्यांच्या वाङ्मयावरून* आला असता. दाखलें देताना कोठें तरी या ज्ञानातून कांहीं दाखले आपल्या तत्त्वप्रतिपादनाच्या भरात ब्रह्मवेत्त्यांनीं उचललें असतें ! एखाद्या ब्राह्मणाच्या सुंदर यज्ञोपवीताचें वर्णन करताना शनीच्या भोंवतालच्या कड्याची उपमा त्यांना सुचायास कांहींच हरकत नव्हती. पण हें शनीचें कडें त्यांना माहीत नसावें असें वाटतें."

श्री. माटे यांचें हें अनुमान भाविक मंडळींना पाखंडमतवादासारखें वाटेल हें उघड आहे. पण त्यांच्या सवालाला अद्यापपावेतों योग्य उत्तर मिळालेलें नाहीं; किंबहुना तें मिळण्यासारखेंहि नाहीं.

"पार्थिव नियमाचें परिपालन हाच स्वर्गाचा मार्ग होय" हा श्री. माटे यांचा सिद्धांत वाचून तर धर्ममार्तंडाला धक्काच बसेल !

"आमचा मूळचा धर्म पार्थिव आहे. श्रीकृष्णानें तो स्वतः आचरिला व इतराकडून आचरून दाखविला" हें श्री. माटे यांचें विधान वाचल्यानंतर "माटे हे प्रच्छन्न चार्वाक" आहेत, असेच उद्गार काढण्याचा धर्मनिष्ठांना मोह होण्यासारखा आहे. तसेंच 'षड्रिपु हे रिपु नसून, षड्रिपु हे आमचे मित्र आहेत,' ही माटेनीति तर पुराणमतवाद्यांच्या दृष्टीनें श्री. माटे यांना जवळजवळ 'नवमतवाद'-पुरस्कर्त्यांत ढकलल्याशिवाय राहणार नाहीं. काम या रिपूबद्दल श्री. माटे लिहितात:—

"ब्रह्मानें हें विश्व जरी खेळ म्हणून उत्पन्न केलें असलें, तरी त्या खेळांतील प्रसरणाचें आदिसूत्र म्हणून त्याला 'काम' उत्पन्न करावा लागला. कामाची जी अत्यंत सूक्ष्म अशी छाया "प्रेम" या नावानें वावरते, ती अंगावर पडली असताना पंढींतल्या कोंवळ्या उन्हाप्रमाणें मधुर लागतें, आणि तिचा अनुभव घेत पुष्कळ वेळ बसावें असें वाटूं लागतें. या कोंवळ्या उन्हाच्या बळावर कसलेंहि साहस आचरावयास माणसें आजवर प्रवृत्त झालेलीं

आहेत मग त्या 'कामा'स शत्रू कसें मानता येईल? व 'क्रोधानें' तरी आपलें काय वाईट केलें आहे? त्याला बेफाम सोडता कामा नये इतकेंच"

श्री माटे यांचें हें काव्य व षड्रिपूंची त्यांनीं दिलेली ही कैफियत दुर्योधनाची कैफियत देणाऱ्या प्रो एस् एल् गोखल्यांची सहज आठवण करून देईल तथापि, श्री माटे यांच्या म्हणण्यात तथ्य आहे, व षड्रिपूंची बाधा होऊं नये, या भीतीनें वेदान्त्यांनीं भारतवर्षावर निष्क्रिय बनविणाऱ्या विचारसरणीचा पगडा बसवून या राष्ट्राचें मोठें नुकसान केलें, हेंहि नाकारता येत नाहीं निदान यापुढें तरी असे चुकीचे कार्यकारणभाव न लावता, भौतिक ज्ञानाचा आश्रय करण्यात कमीपणा नाहीं, व तें धर्मसाधनाच्या आड येणार नाहीं, असा बोध तरुण पिढीनें घेतला पाहिजे श्री माटे म्हणतात —

'आम्हाला आता मरणावर श्रद्धा ठेवू द्या अनुदार बुद्धीची वडील माणसें घरात वागत असलीं, तर नवरा-बायकोला त्याप्रमाणें मनमोकळेपणानें वागता येत नाहीं, व आटहि प्रहर जे भिन्न भिन्न रस संसारातून उत्पन्न व्हावयाचे त्यांची उघडपणें चव घेता येत नाहीं तसें आम्हाला आजवर झालेलें आहे ते आता पुरे नको"

श्री माटे यांची ही भौतिकशास्त्रज्ञानाची 'उतावीळ' व "उत्कंठा" ही येथें अगदींच अनावर झालेली दिसते! पण ईश्वराविषयींची तळमळ ही परमावधीला पोहोंचली म्हणजे जसा अखेर 'हरी भेटतो' त्याचप्रमाणें श्री माटे यांच्या या विनयशील विद्यमान ब्रह्मविद् सहानुभूतीची व सहाय्याची देणगी देतील, अशी आम्हास आशा आहे श्री माटे हे बघनें सर्वस्वी झुगारून देण्याइतके नाहींत फक्त आता 'नवीं व निराळीं बघनें' पाहिजेत, एवढीच त्यांची लडिवाळपणाची मागणी आहे ते म्हणतात —

"स्त्रियांचे महत्त्वमापन करण्याचें गणितही बदलले पाहिजे इतर मनुष्ययोनींहून आपण कोणी मूलत च निराळे नाहीं असें समजण्याचें कारण नाहीं नवमतवाद हें आपल्या प्रादेशिक, धार्मिक इत्यादि स्थिति विशेषांनीं संस्कारित करूनच, पण ते घेतले पाहिजेत "

अशा रीतीनें महाराष्ट्राला नवमतवादाचा व भौतिकशास्त्रप्रधान विज्ञानाचा आश्रय करू देण्याबद्दल श्री माटे यांनीं महार प्रभृति मागणी केली आहे वैचारिक महाराष्ट्राची मनोभूमिका आमूलाग्र बदलावयाला पाहिजे असेल, तर या

विचार प्रतिपादनाचा पुष्कळच उपयोग होण्यासारखा आहे. मुत्सद्दीगिरी केल्या-खेरीज महाराष्ट्राला गतीच नाहीं, असें श्री. माटे म्हणतात. शास्त्रसंशोधनाच्या बाबतींत ही 'मुत्सद्दीगिरी' किंवा हा 'हुशारपणा' करणें हा मानव जातीचा पवित्र धर्मच आहे. महाराष्ट्राला तर तो आवश्यक धर्म वाटावा, अशी महाराष्ट्राची एकंदर आर्थिक परिस्थिति आहे. विज्ञानबोध या ग्रंथाच्या द्वारां या शास्त्र-साधनाचा मार्ग श्री. माटे हे तरुण पिढीला उपलब्ध करून देत आहेत, व त्या-बद्दल ते जनतेच्या कृतज्ञतेला पात्र आहेत. प्रस्तुत ग्रंथात शास्त्रखंड, चमत्कारखंड व चरित्रखंड असे आणखी तीन भाग आहेत. शास्त्रखंडात शिल्पशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, मानवशास्त्र, वगैरे बारा निबंध आहेत. पण त्यांचें निरीक्षण तज्ज्ञांनीच केलें पाहिजे.

If then, Bacon himself made no contribution to science, if no discovery can be shown to be due the use of his rules, if his method be logically defective, it may not be unreasonably asked, How has Bacon come to be looked upon as the great leader of modern science? To this the true answer seems to be that Bacon owes his position not only to the general spirit of his philosophy, but to the manner in which he worked into a connected system, the new mode of thinking, and to the incomparable power and eloquence with which he expounded and enforced it.

बेकनच्या ग्रंथाबद्दल मि. जॉन मिचेल यानीं काढलेले वरील उद्गार योग्य फेरफारासह रा. माटे याच्या प्रस्तावनाखंडास लागू करता येतील. त्यात नवीन शोध नसले तरी संशोधकांना स्फूर्तिलाभ होण्यासारखें वक्तृत्वपूर्ण प्रतिपादन भरपूर प्रमाणात खास आहे.

श्री. माटे हे 'मतपरिवर्तनवादी' गृहस्थ आहेत. ही त्यांची भूमिका लक्षात घेतल्यास शास्त्रीय संशोधन करा, या साध्या तत्त्वाच्या पुरस्कारासाठीं या विसाव्या शतकातहि त्यानीं एवढा प्रस्तावना खंडाचा ग्रंथ कां केला, हें कोणालाहि सहज कळून येईल. त्याच्या इच्छेप्रमाणें विज्ञानाच्या बाबतींत लौकर मतपरिवर्तन घडून येवो, व हिंदी राष्ट्रांत शास्त्रयुगाची प्रभात उजाडून

खडकाळ 'सह्याद्रीं'तून महाराष्ट्रानें घनराशी पुण्याची प्रयत्नसर्वांची महत्त्वाकांक्षा भरपूर प्रमाणात तृप्त होवो, असें आम्ही मन पूर्वक इच्छितों

---

## एकसष्टीच्या निमित्तानें : : : ११

कु शामा देवधर, बी ए (ऑ)

---

( १ ) प्रा बापूसाहेब माटे, एम् ए.

इ स १९२५ ते १९४६ या जवळजवळ एका तपाच्या कालावधींत पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजातून जे विद्यार्थी पदवीधर होऊन बाहेर पडले, त्यांच्यामध्यें फारच थोडे विद्यार्थी असे असतील की, आपल्या विद्यार्थीजीवनातील रम्य आठवणींची पुंजी बाहेर काढून तिच्यातील एक एक कलदार नाणें पुन पुन्हा पारखून घेताना व या पुंजींत आता भर पडणार नाही या जाणिवेनें गेले ते दिवस म्हणून सुस्कारा टाकताना ज्याना प्रा बापूसाहेब माटे याची आठवण होत नसेल, जे त्यांच्या शिकवण्यातील रंजकता विसरले असतील, आणि ज्यांना फुकल्या फकिराप्रमाणें भासणारे बापूंच्या वाचाला कसें हटकून मारलेले असू व बापूंचें गाणें ऐकताना कसे वेमान होत असू याचें भान उरत नसेल

सर्वसामान्य विद्यार्थ्यांची ही स्थिति! मग ज्यांना बापूंच्या निकट परिचयाचा लाभ मिळाला त्यांच्या मनावर बापूंच्या व्यक्तिमत्त्वाच्या गुणावगुणांचे स्पष्ट ठसे उमटावेत आणि 'अविस्मरणीय' व्यक्तींत त्यांनी बापूंना मानाचें स्थान द्यावें यात नवल नाहीं

बापूंच्या अनेक विद्यार्थ्यांपैकीं कोणाला कोणत्या निमित्तानें बापूंची आठवण होत असेल हें निश्चितपणें सांगता येणार नाहीं. बहुतेकांच्या स्मृतीला बापूंचें लिखाण वाचूनच उजळा मिळत असेल, पण मला मात्र या वस्तुजाता-मधील उदात्ततेचें आणि भव्यतेचें कुठेंहि, केव्हांहि आणि कसेंहि दर्शन झालें तरी बापूंची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

पण, गंमत अशी कीं, बापूंची आठवण झाली कीं, गडकऱ्यांचा गोकुळहि माझ्या मनोद्वारात दत्त म्हणून उभा रहातो. उदात्तता, भव्यता आणि गोकुळ यांना एका दावणीला बांधण्याचें कार्य माझ्या मनांत करावं हें काहीं माझ्या आरसिकपणाचें अवलक्षण नव्हे. बापूंच व्यक्तिमत्वच जिथें उदात्तता, भव्यता आणि विस्मरणशीलता यांच्या मिलाफानें घडलेलें आहे तिथें मी तरी काय करणार!

(२) 'गोकुळचा' नवा अवतार'

विसरभोळेपणाच्या बाबतीत गडकऱ्यांचा गोकुळसुद्धां बापूंना सपशेल शरणचिठ्ठी लिहून दिल्याशिवाय रहाणार नाहीं बापूंची विस्मरणशीलता खरो-खरच अगाध आहे चिंतनशीलतेनें बापूंच्या विचारांचा पुरा कबजा घेतलेला पाहून स्मृतीनें सूज्ञपणानें पण निरुपायानें काढता पाय घेतला असावा अशी कुशंका बापूंच्या एका वात्रट शिष्याच्या मनात नेहमीं डोकावत, आणि बापूंच्या विस्मरणशीलतेचा ताजा आणि गरमागरम मासला चाखायला मिळाला कीं त्या शंकेचें 'प्रकाशन' केल्यावाचून त्याला रहावत नाहीं.

'बापू' तुम्ही आता म्हातारे झाला अन् म्हणून तुमच्या ध्यानात रहात नाहीं, असें बापूंना उद्देशून म्हणायची अगदीं सोय नाहीं. ते अधिकच ताठ होऊन म्हणतील, 'साठ वर्षे म्हणजे काहीं फार नाहींत, शिवाय मनानं अन् शरीरानाहि मी अगदीं तगडा आहे. अजून दहाबीस वर्षे तरी मला काहीं होणार नाहीं. आणि अजून दहा वर्षे तरी तरुणांनाहि लाजविण्याइतक्या तडफेनं काम करीन मी.'

बापूंचा हा विश्वास अगदीं युक्त आणि सार्थ आहे. पण त्याबरोबरच, त्यांची विस्मरणशक्ति हि अजून तडफदार आहे हेंहि तितकंच खरं.

विशेषतः पुस्तकांचीं, लेखकांचीं आणि विद्यार्थ्यांचीं नांवें बापू इतक्या सफाईनं विसरतात कीं, काहीं विचारू नका. ज्या लेखकाचं पुस्तक शिकवा

यला म्हणून घेऊन बापू 'टेबलावर' बसत. त्या लेखकाचेंहि नांव विसरण्याचा पराक्रम त्यांनीं अनेक वेळा केलेला आहे. सामराजाचें 'रुक्मिणीहरण' किंवा रघुनाथ पंडिताचें 'नलदमयंतीस्वयंवर' हीं काव्यें बापू शिकवूं लागले कीं त्या कवींचीं नांवें त्यांना हटकून दगा देत. 'आपला तो हा, 'आपला तो हा' असें दोनचार वेळा झालें कीं पहिल्या बाकावर बसलेल्या विद्वानांपैकीं कोणीतरी साथ करी 'रघुनाथ पंडित'! पण पाठीमागच्या उजव्या बाजूच्या कोपऱ्यांतून हळूच आवाज येई, 'वामन पंडित'! रागावल्याचा आव आणून बापू क्रुद्ध मुद्रेनें कोपऱ्याकडे एक कटाक्ष टाकीत. पण तें उसनें अवसान फारच थोडा वेळ टिके. आपण आठवणीचे कसे खंदक आहोंत या जाणिवेनेंच कीं काय बापू मिशांतल्या मिशांत हसत आणि मग पहिल्या बाकावरील पंडितापासून तो कोपऱ्यातील डुड्ढाचार्यापर्यंत सारेजण खिदळूं लागले कीं 'हसतां काय येवढ्यातेवढ्यावरून? तुम्हा अलिकडच्या पोरांना गांभीर्य कसें तें नाहींच' असें मुलांना बापू बापू पुढें वाचूं लागत.

बापूंच्या विसराळूपणाविषयीं माझ्या मनांत जो कांहीं थोडाफार संशय उरला होता तोहि 'माटे' आडनांवाच्या माझ्या एका ओळखीच्या विद्यार्थ्यानें झुकताच पुरता फेडून टाकला. थोडीफार तोंडओळख आणि समान नामाभिधानामुळें निर्माण झालेली जवळीक यांच्या जोरावर तो विद्यार्थी आणि बापू यांची कुठेंहि गांठ पडली तरी थोडीफार बोलाचाली, किमानपक्ष 'हसवदती' तरी होईच होई. एकदा काय झालें, बापूंची आणि त्याची कुठेंतरी गांठ पडली.

बापूंनीं त्याला विचारलें, "तुम्ही माटे नाहीं का?"

"होय सर!"

"सध्या काय बी. ए. ला?"

"नाहीं! बी. एस्सी. ला बसणार मी यंदा!"

"छान! तुम्ही चौघे भाऊ नाहीं का? ते काय करतात?"

"एक बँकेंत आहे, एक रेल्वे ऑफिसमध्यें, एक टग—"

"ठीक ठीक!"

पुन्हां एकदा बापूंची आणि त्याची गांठ पडली. सर्व कांहीं यथापूर्वम्. विचारणादि अशेष झालें. चवथ्यांदा मात्र त्या विद्यार्थ्याला धीर धरवेना.

त्यानें आपण होऊन सुरुवात केली. " सर ! मी म्हटे ! रदा बी. एसुसी. ला वसणार आहे आम्ही चौघे भाऊ एक बँकेंत आहे, एस—" झालें. आता मात्र, बापूंच्या डोक्यात प्रकाश पडला. पण, बापू भारी प्राजल. त्यांनी तावडतोब आपल्या स्मृतीचा दुबळेपणा कबूल केला.

बापूंचा नेहमींचा 'लेखक' एकदा गावाला जायचा होता, म्हणून देशपांडे नावाच्या आपल्या एका मित्राला घेऊन तो बापूंकडे आला. परिचय-विधि झाला मग 'लेखक' म्हणतो "सर मी गावाला असेपर्यंत हे देशपांडे येतील लिहायला "

बापू पसंतिदर्शक मान डोलावतात.

दुसऱ्या दिवशीं ' देशपांडे ' ठरल्या वेळेच्या जरा आधीच आले. बापूंनी निर्विकार मुद्रेनें देशपांड्यांना न्याहाळत पुसलें, 'ह बसा ! कोण बर तुम्ही ! काही काम आहे ? '

प्रसंगी जागीं अदृश्य होण्याची शक्ति आपल्या अंगीं असती तर बरें झालें असतें असें देशपांड्यांना त्या क्षणीं वाटलें की नाहीं हें मला सांगता येणार नाहीं

बापूंच्या विसराळूपणाविषयींच्या आख्यायिका मला नेहमीं कर्णोपकर्णी ऐकायला मिळत पण मला स्वत ला त्याचा प्रसाद कधीं काळीं मिळेल असें चुकूनसुद्धा मला कधीं वाटल नव्हतें. पण तो योग एकदा आलाच.

डिसेंबर महिन्याच्या सुरवातीला बापूंनी मला तंबी दिली, " ह बघ, तुझ लक्षण काहीं ठीक दिसत नाहीं मला. पधरा दिवसात काहीं लिहून आणून दाखवल नाहींस —"

डिसेंबरचा शेवट आला तरी काहीं लिहून झालें नाहीं म्हणून बापूना भेटण्याची मी टाळाटाळ करीत हतें पण शेवटीं त्यांनीं मला गाठलेंच, आणि तें, चांगले रागावले

" बरस ! आता बापूना काहीतरी लवकरात लवकर लिहून दर्शन तरच नावाचो— अशी भीष्मप्रतिज्ञा करीत मी परतलें नुकताच बापूंनी आम्हाला ज्ञानेश्वरींचा १५ वा अध्याय शिकवला होता, तेव्हा प्रथम ज्ञानेश्वरावाच ' उद्धार ' करायचा असें मी ठरविलें मग काय ?—सगळीं ज्ञानेश्वरचरित्रें, ज्ञानेश्वर-दर्शनाचे दोन्ही खंड, महाराष्ट्र सारस्वत, पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इतिहास, १६ व्या अध्यायाच्या दोन्ही आवृत्त्या, बापूंच्या व्याख्यानांची

टिपणें इ. प्रचंड जमाव बरोबर घेऊन मी 'ज्ञानेश्वराचें कवित्व' या विषयाचा डोंगर पोसरण्यास सुरुवात केली. माझ्या मतें मी लिहिलेला निबंध कोणाच्याहि तोंडात मारील असा होता. दुसऱ्या दिवशीं सकाळींच मी बापूंच्या दारात दत्त म्हणून हजर.

"लिहून दे, लिहून दे म्हणून सासुरवास चालवला होतात ना! हें घ्या आता!" असें (मनातल्या मनात) म्हणत मी तो निबंध बापूंना 'सादर' केला.

बापूंना स्वतः वाचायचा कंटाळा! 'वाचून दाखव.'

मी मोठ्या ऐटींत वाचून दाखविला. वाचन संपल्यावर भीतभीत मी बापूंच्या चेहऱ्याकडे पाहिलें तों काय-(श्री विश्वर्स फॉर मी!) बापू अगदीं भयंकर खूष झाले होते. "छान! फारच छान! असं लिहिलंस तर अगदी फर्स्ट क्लास मार्क मिळतील तुला." बापूंनीं तोंड भरून आशीर्वाद दिला, नंतर मी घरीं परतलें ती सायकलवरून, पण मला वाटत होतं मी हवेंतूनच सायकलसकट तरंगत चाललें आहें.

नंतर चार पांच दिवसांनीं परत बापूंच्या घरीं जायचा प्रसंग आला कशावरून तरी बोलण्यांत निघालें तें ज्ञानेश्वरापाशीं येऊन स्थिरावलें. 'बापू! माझ्या त्या दिवशींच्या निबंधात मी अगदीं असंच लिहिलं होतं' मी मोठ्या अभिमानानं बापूंना सांगितलं. बापूंनीं केलेली स्तुति मला अजून आठवत होती. पण बापू दिलगिरीप्रदर्शक चेहऱ्यानं म्हणतात, "असेल, असेल. कांहीं आठवत नाहीं बुवा . " अस्मादिकांचा चेहरा किती फूट खालीं 'पडला' असेल त्याची कल्पना कोणालाहि सहज करता येईल.

बापू तसे व्यवस्थित आहेत, म्हणजे व्यवस्थितपणा अंगीं आणण्याचा ते प्रयत्न करतात, पण त्यांना तो फारसा जमत नाहीं. बापूंच्या मधुकर पुस्तकसंग्रहाल्यातील पुस्तकाचेंच उदाहरण घ्या. त्यातलं एखादं जुनं पुस्तक जर बापूंच्या मेहरबानगीनं कुणी अपरिचितानं उघडलं आणि पहिल्याच पानावर डकवलेली सूचनांची यादी वाचली तर त्याला वाटेल काय विलक्षण व्यवस्थित गृहस्थ आहे हा! त्या सूचना आहेतच तशा.

'हें पुस्तक दुसऱ्यास देऊं नये.
यावर कसल्याहि खुणा करूं नयेत.

अतिशय काळजीपूर्वक वापरावें.
जसें घेतलें असेल तसेंच परत द्यावें.'

श्री. म. माटे

बापूचा आणि माझा फारसा परिचय नव्हता तेव्हा त्याच्याकडून एकनाथाची गाथा मी मोठ्या मिनतवारीनं मिळविली होती, परंतु पहिल्याच पानावरचा तो सूचना–फलक पाहून मी इतकी हादरलें कीं दुसरें पान उलटू का नको, उलटू का नको, या विचारानं माझ्या हृदयात अर्धा एक तास कालवाकालव होत होती.

आता अधिक परिचयानें मी अस निःशंकपणें सांगू शकेन कीं पहिल्या पानावर डकवलेल्या सूचना–फलकातून प्रतीत होणारा बापूचा व्यवस्थितपणा वरवरचा आहे. कारण असं कीं आपण कोणाला कुठलं पुस्तक दिलं हेंच मुळीं त्याच्या ध्यानात रहात नाहीं. 'मधुकर पुस्तक–संग्रह' रोडका होता तरी बापूची विस्मरणशीलता इतकी बाळसेदार होती, मग 'प्रभाती' परामर्श घेण्यासाठीं आलेल्या पुस्तकाचा रतीब पचवून पुष्ट 'मधुकर पुस्तक संग्रहच' बाळसेदार बनल्यावर बापूच्या विस्मरणशक्तीला किती बाळसें चढलें असेल याची कल्पनाच केलेली बरी.

एकदा 'शहाराहाच्या भिंती' हें भाई गोरे यांचें पुस्तक बापूच्याकडे अभिप्रायार्थ आलें होतें. मी त्या पुस्तकाचीं पानें चाळू लागलें पाच दहा मिनिटें झालीं तरी तें पुस्तक मी खालीं ठेवेना. बापू तसे चाणाक्ष आहेत. ते म्हणाले, 'हे बघ, तुला हवं असल तर तें पुस्तक घेऊन जा. मी जाणार आहे उद्यां सांगलीला. दोन दिवसांनीं येईन. त्या दिवशीं मात्र नक्की आण. 'प्रभात'मध्यें लिहिणार आहे मी त्या पुस्तकावर. विसरू नको'"

बापू सांगलीहून यायचे होते त्या दिवशीं पुस्तक परत द्यायला हवेंच होतें. पण काहीं कारणानें तें तसेंच राहिलें. दुसऱ्या दिवशीं पुस्तक परत द्यायला मी बापूच्या घरीं गेलें ती जीव मुठींत धरूनच वाटलं बापू आता चांगलेच भडकणार. आत गेलें डोक्याला मफलर गुंडाळून व चॉकोलेटी रंगाचे पायमोजे चढवून बापू काहीं तरी वाचत पडले होते अर्धा एक तास झाला पण बापू पुस्तकाची भाषा काढानात. शेवटीं जायच्या वेळेला मीच म्हटलं, "बापू! हें पुस्तक...मी कालच आणणार; पण..." "हं! हं! हें पुस्तक होय!

तूच नेलं होतस वा ! मी म्हणत होतो झाल काय !" इतक्‍ पुराण सांगितल तरी आपण विसराळू आहोत हे बापूच्या लक्षात राहील की नाही कोण जाणे. ते स्वत: ला, परिचितांना नि मलासुद्धा विचारती—

"खरच का मी इतका विसराळू आहे ?"

( ३ ) भोजनप्रिय ब्राह्मण !

आपल्या ऐन तारुण्याचीं वीस वर्षे अस्पृश्यांच्या सेवेत घालवूनहि बापू भोजनाच्या बाबतींत अगदीं कडक ब्राह्मण्य सभाळून राहिले आहेत बापूचा आमच्या वर्गावर दहा वाजता एक तास असे. साडेदहापर्यंत बापू शिकविण्यात अगदीं रगून जात, पण साडेदहा वाजले रे वाजले कीं बापूची विचारणा झालीच सुरू. काय रे किती वाजले ! किंवा घटेला किती अवकाश आहे ? आमचा जरासा विरस होई, पण बापू दिलखुलासपणे म्हणत, " हे पहा, हा साडेदहाचा सुमार म्हणजे जेवणाचा अशी भूक लागते या वेळेला,शिकवण्या पेक्षा जेवणाकडेच लक्ष लागतें जास्त ! बापूच्या या भुकेची आम्हालाच इतकी सवय झाली होती कीं, शेवटीं आम्हीच त्याना सागत असू

" सर् ! दहाच मिनिटें राहिली आहेत तास सपायला "

आमच्या वर्गात एखादा ट्रीपचा किंवा पार्टीचा बेत ठरवला कीं बापू सेक्रेटरीला बजावीत, "सारे पदार्थ अगदीं चवदार अन् चमचमीत असले पाहिजेत रे बुवा उगाच दरिद्यासारख काहीं करू नका "

" मला काहीं सिनेमा नाटकाचा नाद नाहीं चागलचुंगल खाणपिण हीच माझी करमणूक" अस बापू स्वत च सागतात.

बापू एकदा कोल्हापूरला जायचे होते मी बापूना म्हटल, 'तुम्ही जाताच आहात तर माझ तेवढ काम करून याल का ? ' बापूनीं उदार अंत करणान कबूल केल चारपाच दिवसानीं बापू काल्हापुरहून आल्याच कळल बापूच्या घरीं जाऊन पहातों तों बापू स्वयपाकघरात चिक्कू ' खात बसले होत मला वाटल होत कीं, काल्हापुरच्या माझ्या कामाच काय झाल तें बापू आपण होऊनच सागतील पण ते अशा तन्द्रन बोलत होते कीं जणू आपण त्या गावचेच नव्हे मी सूचक प्रश्न टाकला

" कसा काय झाला काल्हापूरची दौरा ? " " छान ! राजाराम कॉलेजात व्याख्यान दिल "आणि मग मी पुन्हा बापूच्या घरीं सोडलेल्या श्रीखड-

पुरीच्या वर्णनातच बापू रमून गेले. 'आता काय करायं या रहस्याना!' मग मी, स्पष्टच विचारलं "बापू! मी सांगितलं होतं त्याच काय?" दिलगिरीप्रदर्शक चेहेरा करून बापू म्हणाले, "ह्या चिवड्याच्या फोडी घेना योळ्या. पण,तुझं काम मात्र विसरलो हं. इथे पुण्याला स्टेशनवर आल्यावर आठवण झाली." "बरोच लवकर झाली म्हणायची." मी म्हटलं.

आमच्या वर्गाने एकदा ट्रीप काढली होती कोपरडला.बापू आपल्या मडळींसह आले होते. काटेटोमॅटोची कोशिंबीर, तोंडली भात इ.इ. होता. स्वयपाकाची पूर्तवारी करण्याचं कार्य आम्हीच मुलामुलींनी पत्करलं होतं. कोणी भाजी निवडायला घेतली होती, तर कोणी कांदे टोमॅटो चिरत होते, तर कोणी हरभरा सोलून साग्दात गतले होते. बापूच्या 'मडळोंनी' भातासाठी तोंडल्याच्या लांब लांब फोडी करायला सुरवात केली होती. बापूना भोज्यपदार्थाबद्दल फारच जिव्हाळा. त्या फोडींकडे मोठ्या आस्थेने पहाता पहाता बापूच्या विचारांचे स्वातंत्र्यपण या प्रातावहि एकदम उसळून आलं. तोंडल्याच्या लांब लांब फोडी न करता लहान लहान चकत्या केल्या तर त्या भाताशी लवकर एकजीव होतील असा त्यानीं आग्रह धरला. 'मडळींचा' दावा असा होता की, तोंडली भाताशी एकजीव होऊ नयेत म्हणून तर लांबच्या लांब फोडी करतात. 'मडळी'च्या सौम्य विरोध ला न जुमानता 'मला काय वाटतं' हेंच बापू बसून सागू लागले व शेवटी हातात चाकू घेऊन स्वतः तोंडल्याच्या चकत्या करायास त्यानीं सुरवात केली.

तादूळ सडले तरी त्यातलं सत्त्व नष्ट होत नाहीं असं कुठेसं वाचल्याबरोबर बापूना इतका बेसुमार आनद झाला कीं, 'प्रभात' मधून तो जाहीरपणें व्यक्त केल्यावाचून त्याना चैन पडेना

(४) बापूंना पछाडणारा 'मास्तर'!

बापू मास्तरचे प्राध्यापक झाले, मोठे साहित्यिक झाले, साहित्यसमेलनाचे अध्यक्ष सुद्धा झाले पण लोकाना आपला त्याच्या मास्तरकीचाच अभिमान. प्रा. माटे असं म्हणण्यापेक्षा माटे मास्तर असा पुकारा केला कीं मगच लोकाना त्यांची ओळख जास्त लवकर पटते. बापूना स्वत.लाहि आपली मास्तरकी इतकी प्रिय आहे कीं, 'भाऊ' कॉलेजातल्या 'प्लॅटफॉर्म'वर प्राध्यापकाची भूमिका मोठ्या रुबाबदारपणें वठवीत असतानासुद्धा त्याच्या

अग्रभागला मास्तर वेळीअवेळी जागत होत असे.

आपण केलेल्या एखाद्या विनोदाला मुलें प्रमाणाबाहेर हसूं लागलीं कीं आपण प्राध्यापक आहोंत आणि समोर बसलेले विद्यार्थी शाळकरी नव्हेत हें अजिबात विसरून 'अटेन्शन' म्हणून ओरडण्याची बापूंना फार आवड.

तास संपल्याची घटा झाली तरी आपण स्वतः वर्गाबाहेर जायला उठल्याखेरीज कोणीहि विद्यार्थी जाग्यावरून उठलेला बापूंना अगदीं खपायचं नाहीं. एकदा तर विद्यार्थ्यांनाच काय, पण विद्यार्थिनींनाहि उभं करायला बापूंच्या अगातल्या मास्तरानं मागंपुढं पाहिलं नाहीं. एकदा काय झालं—

कॉलेजच्या मैदानावर स. प. विरुद्ध फर्ग्युसन अशी बास्केटबॉलची मॅच होती. बहुतेक विद्यार्थी ग्राऊंडवरच गोळा झाले होते. तास संपल्याची घटा झाली आणि 'ॲडमिनिस्ट्रेशन' शिकविणारे 'मास्तर' नेकटाय् तोंडात धरून बाहेर पडले. त्यासरशीं एफ्. वाय्. च्या वर्गातून जो लोंढा बाहेर पडला तोहि थेट मैदानावर वहात गेला. आम्ही मात्र आशाळभुताप्रमाणे वर्गाच्या दारात उभें राहून मैदानावर जाण्यासाठीं चुळबुळ करीत होतों—आमच्या बरोबरीचे काहीं बहाद्दर केव्हांच पळाले होते म्हणा—'पण जायचें कसें ?' बापूंचे लागोपाठ दोन तास होते ना आमच्यावर ! अभ्यास सोडून खेळ बघायला, जाण तर काहीं या मास्तरना आवडायच नाहीं. 'आता काय करावं ?' आजुबाजूला पाहिलं आमचा घोळका अधिकच रोडावला होता वरती पाहिलं, तों इंडियन फिलॉसॉफी शिकवणाऱ्या प्राध्यापकाना पिटाळून देऊन, पोरं एटींत walk-out करीत होती 'मग आम्हींच काय घोडं मारलं होतं ?' आपणहि जावं 'आम्ही उर्वरित सातआठजण जायला सरसावलों तों काय—समोर बापू आणि त्यांची छडी !'

" कॉलेजला सुट्टीबिट्टी नाहीं ना आज ?"

" नाहीं सर । "

" मग कुठें चालला होतात ? चला वर्गात ! "

आम्हांला वाटलं, बापू आता मुकाट्यानं शिकवायला सुरुवात करतील. बापूंनीं चष्मा डोळ्यांवर ठेवला अन् साऱ्या वर्गभर नजर फिरविली. चार पाच मुली आणि दोन विद्यार्थी.

" आज माहीत नव्हतं वाटतं कुणाला तास आहे म्हणून "

" होतें ना ! "

" मग ? " बापूंच्या स्वराची उंची नाहीं पण रुंदी मात्र भयंकरच वाढली. तेवढ्यात खिडक्यांतून बापूंनीं मैदानावरील प्रचंड गर्दीकडे पाहिलें तों टाळ्या, शिट्या, हुर्रा, वाऱ्या समिश्र आवाजाचा केवढा तरी स्रोतच्या स्रोत वर्गांत येऊन आदळला. झालें. आग भडकली. हातांतलें आज्ञापत्राचें पुस्तक टेबलावर आदळून बापू गरजले—

" थांबा ! आतां प्रिन्सिपालकडून आज्ञापत्र काढवून दंड करवतों, तास बुडवून खेळ पहायला जायला हवं नाहीं का—"

आणि मग ती सबंच तास संपेपर्यंत, अभ्यासाच्या वेळांत खेळ ठेवल्यानें काय नुकसान होतें, अभ्यास कसा संपत नाहीं. इ. अनेक रम्य विषय काढून त्यांनीं एक भलें मोठें व्याख्यान झोडलें. तास संपला. मॅचहि संपली. पळून गेलेले वीर मागल्या दारानें हळूच आंत येऊं लागले. आवक संपेपर्यंत बापू एखाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणें शांत बसून राहिले होते. वर्ग फुटून गेला. बापूंचा प्रशांत चेहेरा पहून विद्यार्थ्यांचे चेहेरेहि फुलले पण क्षणभरच.—दुसऱ्याच क्षणाला बापू उठून ताठ उभे राहिले आणि त्यांनीं गर्जना केली, "कोण कोण गेलं होतं मॅच पहायला ? उभे रहा एकदम !" उभें रहावें का न रहावें अशा व्यामोहांत सापडून एक दोन मुलें अर्धवट उठलीं. विद्यार्थिनी या बॉम्ब-हल्ल्यानें दचकून गोऱ्यामोऱ्या होऊन बापूंकडे बघण्याचें टाळूं लागल्या, पण बापू मुळीच डरले नाहींत. मुलींना उद्देशून ते पुन्हा खेंकसले. " उठा' म्हणतो ना ! हा कागद घ्या—( अरे एक कागद दे पाहूं ! ) आणि वर नांवें लिहा तुमचीं. हं ! बसू नका ! *उभ्यानेंच लिहा—प्रिन्सिपलकडे देतों* पाठवून. कोणाला विचारून गेलां होतां ? मला विचारलं होतं ?"

बापूंचा अवतार पाहिला कीं सबंध तासभर उभें रहावें लागतें कीं काय अशी मुलींना आणि मुलांनाहि धाकधुक वाटूं लागली. पण म्हणतात ना गर्जेल तें पडेल काय ?

इतरच्या वर्गांत तर, बापूंना पछाडणाऱ्या मास्तरांनी कहरच उडवून दिला. बापू 'वाग्वैजयंती' शिकवत होते. अगदीं नेहमींसारखी रंगांत येऊन. पण का कोण जाणें, मधूनच ते जरासे अस्वस्थ होत आणि पहिल्या बाकावर बसलेल्या एका विद्यार्थ्याकडे टवकारून पहात. तास संपला मुलं जायला निघालीं.—

बापू त्या विद्यार्थ्यांजवळ आले आणि मोठ्या गंभीरपणे त्याच्या पाठीवर हात ठेवून त्याला म्हणतात, " अरे ! उद्या माझ्या घरीं ये आणि कटिंग करून घेण्यासाठीं चार आणे घेऊन जा ह " तो विद्यार्थी तर जागच्या जागीं सर्द झालाच, पण हसावं का रडावें तें इतरांनाहि कळेना.

(२) नटवर्य विनादमूर्ति बापू !

हा विनोद सोडून दिला तरी बापू म्हणजे अगदीं जातिवंत शिक्षक यात शकाच नाहीं. विषय कितीहि रुक्ष आणि नेचव असला तरी तो सोप्या, सुगम आणि रजक पद्धतीनें समजावून सांगण्याची बापूंची हातोटी वाखाणावी तेवढी थोडीच उत्कृष्ट वक्तृत्व, पहिल्या प्रतीची रसिकता आणि चिकित्सक बुद्धि यांच्या मिश्रणामुळें बापूंचें शिकवणें अतिशय चवदार नी मिष्ट लागतें हें तर खरेंच, पण त्याहिपेक्षा बापूंच्या खुसखुशीत विनोदाच्या चुरचुरीत फोडणीमुळें त्याला जी लज्जत प्राप्त होते ती कांहीं न्यारीच. हास्यरसाची निष्पत्ति करण्याकरता बापू ज्या गमती करीत त्यात कोटीबाजपणाला क्वचितच स्थान मिळायचें. बापूंच्या विनोदाची सारी मदार आपल्या अभिनयपटुत्वावर ! बापूंच्या अभिनयामुळें, विशेषत मुद्राभिनयामुळें वर्गातहास्यरसाचे फवारे येवढ्या जोरानें उडत होते कीं मला राहून राहून वाटे कीं, बापू शिक्षक झाले नसते तर नटवर्य खासच झाले असते.

उचळावे त्याप्रमाणे आमच्या ध्यानीमनीं नसताहि बापू अगदीं साध्या प्रस्तुतातून अशा काहीं साध्या पण मोहक हास्यकळ्या निर्माण करीत कीं आम्ही त्यांच्या चातुर्यानें अगदीं मुग्ध होऊन जात असू. व्याकरणासारखा रक्ष विषय, पण तोसुद्धा बापूंनीं आपल्या चातुर्यानें इतका कांहीं मधुर रंजक करून सोडला कीं, त्याचें वर्णन करायचें म्हणजे 'मुस्यानें गूळ खादला, गोडी नये सांगायला,' अशीच आऊ स्थिति होते. व्याकरणाचा तास होता. दामल्यांचें व्याकरण बापू हातात घेऊन शिकवत होते. 'पुरणाची पोळी तिनेंच करावी' असें एक वाक्य कुठेंस आलं. 'तिनेंच' शब्दावर बापूंनीं मिष्किल चेहऱ्यानें दिलेला जोर ऐकून आमच्या चेहऱ्यावर उमटलेलें स्मित विरतें न विरतें तोंच 'आणि ती आम्हीच खावी' हें वाक्य त्यांनीं अशा कांहीं ठसक्यात उच्चारलें कीं, गुप्त हास्यगंगा तेवढ्याच जोरानें उफाळून वर आली.

वामराजाचें 'रुक्मिणीहरण' शिकवताना,

> "मेरे हा निद्रेच्या द्विजपति निजेला जव असे ।
> त्वरा हा घेऊन प्रभुवर तया सनिध वसे ॥"

> "जळामधें लोटूनि का न द्यावी ?
> हुताशनीं आहुति वा करावी ।
> परंतु बाहेर न पाठवावी
> हे गोष्टी माझी यक आयकावी ॥"

> "बलिष्ठ हे प्राक्तनकर्मरेखा । आरंभिलें हे विपरीत देखा ।
> हे गोवळी कोठुन आजि आले । यकायकीं चक्र फिरोन गेलें ॥"

या ओळींतील त्वऱ्हा, यक आयकावी, यकायकीं हे शब्द बापूंनीं आपल्या अंगातला सगळा रागडेपणा आणि रांगडेपणा एकवटून उच्चारले नाहींत, आणि वर्गात हशा पिकला नाहीं असें कधींच झालें नाहीं.

कधीं उपमेयाशेजारीं अगदीं विसंगत असें उपमान ठेवून, तर कधीं मार्मिक टीका करून बापू अशी उत्कृष्ट हास्यनिष्पत्ति करीत कीं एखाद्या आचार्यांनेंहि खालीं मान घालावी. 'वावैजयंती'चा आस्वाद घेताना गडकऱ्यांच्या उपमा-चातुर्यावर बापूंनीं काय खेरा मारला आहे ठाऊक ? 'म्हणे, एखादी खाणावळीणबाई जशी भराभर फुलक्या करून पानात फेकते तसे गडकरी उपमावर उपमा रसिकांच्या पुढ्यात टाकत.'

रुक्मिणीहरणाच्या पांचव्या सर्गांत रुक्मिणीकडून सुदेव ब्राह्मण हा तातडीनें श्रीकृष्णाकडे आलेला आहे. रुक्मिणीनें सांगितलेलें कार्य अगदीं निकडीचें असतानाहि कवीनें सुदेव ब्राह्मणाला श्रीकृष्णाचें लांबलचक स्तवन करावयास लावून त्याचा बहुमोल वेळ घ्यावा हें बापूंना अगदीं नापसंत होतें. शेवटीं एकदा सुदेव ब्राह्मण आणि श्रीकृष्ण यांची भेट होते आणि श्रीकृष्ण त्याला विचारतो :

> " किमर्थ, स्वामी हा श्रमित बहु आत्मा श्रमविला ?
> कळों द्यावें याचें झडकरि तुम्ही कारण मला ! "

बापूहि मोठ्या गांभिर्यानें विचारतात—

> " किमर्थ 'कविराज' हा श्रमित बहु आत्मा श्रमविला ?
> कळों द्यावें याचें झडकरि तुम्ही कारण मला !! "

आमच्या हास्याच्या जोरदार प्रवाहांत बापूंच्या गांभिर्याची वाताहत झाली हें सांगणें नलगे.

(६) बापूंची मर्में आणि वर्में—

याप्रमाणें, बापूंनीं जसें विनोदगंगेला अगदीं डोक्यावर घेतलं आहे तसेंच 'रुद्रावतार' धारण करण्यांतहि ते पटाईत आहेत, कारण गांभिर्य हाच त्यांचा स्थायीभाव आहे ज्या ज्या ठिकाणीं कर्तृत्वाचें, उदात्त विचारांचें नि पराक्रमाचें बळ साठलेलें असेल त्या त्या ठिकाणीं आपुलकीचें मंदिर उभारून अभिमानाचीं सुगंधी वाक्सुमनें वहाण्यांत बापू रंगून गेले आणि त्यांच्या वाणीला पराकाष्ठेचें तेज आणि गांभिर्य चढलें कीं आम्हाला वाटायचें, दुर्गा रागाच्या स्वच्छ आणि गंभीर स्वराचा समुद्र उसळला आहे आणि त्यांत आपण लुप्त होऊन जात आहोंत.

स्वतःवर निंदेचा नि टीकेचा केवढाहि मारा झाला, स्वतःचें वर्में काढून हरमायला कुणी उणें बोललें तरी बापू स्थितप्रज्ञ आणि अविचलित राहूं शकतील, पण ह्या बलस्थानाची अवहेलना त्यांना यत्किंचितहि खपणार नाहीं. त्या अवहेलनेचा प्रतिकार करण्यासाठीं बापू सज्ज झाले कीं, शान्तसागरामधून वादळी वाऱ्यानें झेंप घ्यावी आणि आसमंतांत थैमान घालावें त्याप्रमाणें बापूंच्या अंतर्यामींचा सारा आवेश नि आवेग उफाळून येई. तो आवेश दाहक तर खराच पण सजीवकहि ! आमची मनोभूमि त्यानें भाजून निघे पण त्या

भावाचारातूनच किल्मिषाचे तण नष्ट झाले आणि सुविचाराचे फुलोरे फुलले म्हणजे आमच्या अंतःकरणातून कसला तरी उदात्त उल्हास ओसंडू लागे

तुकाराम, रामदास आणि शिवाजीराजा ही महाराष्ट्राची बलस्थाने म्हणजे वास्तविक तीन स्वतंत्र स्फुरणें!

" ना हें ताहान प्याली, भूक भुकेने भागली।
वास वासनेसी नाहीं, मन पांगुळलें पायीं ॥ "

" बीज भाजूनि केली लाही, आम्हा जन्ममरण नाहीं॥"

असें एकानें मोठ्या विरक्तपणें ठसून सांगितलें, तर दुसऱ्यानं दुष्मनांच्या अंगाची लाही लाही केली नि महाराष्ट्रांत हिंदूंचे बीज जिवंत ठेविलें एक जीविताला लाथाडीत होता दुसऱ्याचे हजार नेत्र जीविताविषयींच्या आसक्तपणानें ओथंबलेले होते एक प्रपंचविन्मुख तर दुसरा प्रपंचशूर, आणि या प्रपंचविन्मुखतेचा आणि प्रपंचशूरपणाचा मोठा चमत्कारिक मिलाफ म्हणजेच रामदास! अशीं हीं तिन्ही स्फुरणें पिंडगतच भिन्न, पण या तिन्ही स्फुरणांचें गायन करताना बापूंना जें स्फुरण चढे त्यांत सारखाच जिव्हाळा, सारखाच आवेश नी सारखाच अभिमान!

तुकाराम बोवांची विरक्ताळाची ही मानसिक विकृती होती शिवाजी राजा हा लुटारू नी दरोडेखोर होता, ना रामदास हे निवृत्तिमार्गी होते अशा तऱ्हेचे आक्षेप बापू अगदीं हिरिरीनें आव्हानासारखे स्वीकारीत

जीवितयात्रेच्या पुढें काय याचा शोध घेण्यास जो महापुरुष प्रवृत्त झाला 'येणें दुःखें माझा फुटो आहे प्राण' असा ज्याचा आक्रोश, 'निंद नसा दीस जागतीना' याचा म्हणून ज्याच्या चित्ताला अखंड तळमळ लागली होती त्याच्या चित्ताच्या कंदातून उफाळून आलेल्या उमाळ्यांना मानसिक विकृति म्हणावें आणि ज्यानें 'शांति ता सर्व हें सुखें--शांति आनंद भोगावें' असा शांतीचा महिमा गाइला

" कैसी क्षेम राहील जगतीं--कैसी देव देवालयें तगती '
" कैसे कुटुंबवत्सल लोक जगती " या चिंतेनें ज्याचा ऊर फाटत होता
" आधीं प्रपंच करावा। मग घ्यावें परमार्थ विवेका
प्रपंच सोडून परमार्थ कराल। तेणें तुम्हीं कष्टी व्हाल "

असें ज्यानें आग्रहानें सांगितलें, ज्यानें यत्नदेवाचें पूजन केलें, 'सोनें मातीं

आम्हा मुलिंसिमारा ' असें न म्हणता ' प्रपची पाहिजे सुगर्ण ' असा आग्रह धरला त्या समर्थांचा जीवितहेतु परमार्थाचे व भक्तीचें गायन करणें हा होता असा देश यरात हें व पुन्हा अगदी बिदारी लागे

अस्पृश्योद्धारक म्हणून बापू ' ख्यातनाम ' असले तरी ' स्त्री जातीचे कैवारी म्हणून ते अजून उदयोन्मुख नाहींत परंतु, हिंदु स्त्रीविषयी बापूंच्या मनात आदराची आणि सहानुभूतीची कोवळीक किती अपरंपार आहे याची आम्हां विद्यार्थिनींना पुरती जाणीव आहे

शिवदीत केसरीचें 'बाईल पैशाची पैशाची विरळा गत पुरुषाची' हे पद वाचून दाखवताना बापू सतावा म्हणाले सता जावें, जोहार करावा, केवढी कठोर निष्ठा या समानातील स्त्रियांनी प्रगट केली, तर त्या स्त्रियांची अशी सभावना करताना, रांडा म्हणून त्याचा उद्धार करताना, आणि प्रपंचा तील घोंड केवढीच त्यांची किंमत ठरवताना परमार्थपरतांना लाज वाटला नाहीं ही शरमेची गोष्ट आहे खरोखर, हें जर सत्य असतें तर हिंदुसमाज केव्हाच रसातळाला गेला असता ! नवरे हिंदु स्त्रा आपल्या कुटुंबाशार्ठी किती खस्ता खाते याचें जें वर्णन बापूंनीं केलं ते सहानभूतीन अगदी ओथबलं होतं

आगरकरांच्या काळातील स्त्री जीवन आणि आजच्या काळातील स्त्री जीवन यातला फरक सांगून बापू आम्हाला नेहमी म्हणायचे, "हा फरक तुम्हा डोळ्यासमोर आणा म्हणजे मगच तुम्हाला त्या काळातील समाजसुधारकांच्या कार्याची खरी किंमत कळून येइल तुम्हा मुली आता एकेका दुष्ट बंधनातून मुक्त होत चाल्ला आहात, मोकळ्या आणि निर्भय चित्तानें वावरता आहात तुम्ही माणसात आला आहात याचा मला फार फार आनंद होतो "

मुलींनीं धीटपणें पुढें याव, मागेमागें राहू नये, काहींतरी कर्तृत्व गाजवाव, असं बापूना फार वाटे, आणि वेळोवेळीं ते तसं बोलून हे दाखवीत

**( ७ ) बापूंची रसिकता—**

'वाचे बरवें कवि व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं इहतत्त्व । स्पर्शु जैसा"
आपल्याला चिरपरिचित असलेलें वचन जर बदलत्या कालानुरूप वरील प्रमाणें बदलून घेतलें तर ' बरवेपणाच्या ' एकाहून एक वरचढ पायऱ्यावर एकदमच उभें रहाण्याची अपूर्व आणि अवघड कसरत बापूंनीं लालेनें साध्य करून घेतली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं

' रसंतीची जन्मकथा सांगताना बापूंनीं गद्याचे गोडवे गायले असले तरी बापू अंतःकरणाचे कवीच आहेत. छंदोबद्ध काव्य त्यांनीं लिहिलें नसेल, परंतु त्यांच्या गद्यलेखनातच काव्याची लज्जत हवी तेवढी चाखावयास मिळते. सत्य शिव सुंदरम् या ' अनुपेक्षित ' नयींच अंतरंग उकलून दाखविताना बापू उघड उघड कल्पनेच्या नादीं लागले आहेत, तर पहिल्या वसंताच्या आगमनाची स्लकारणी काव्याच्या नव्हाळीनें नुसती निथळत आहे.

वस्तूचें विधायक रूप काय आहे हें पहाणें, ज्या कारणानें ती वस्तु अस्तित्वात आली असेल तें कारण यथास्थितपणें समजावून घेणें याचेंच नाव रसिकता हा बापूंचा आवडता सिद्धांत. रसिकतेचें हेंच काय, पण कोणतेंहि लक्षण पत्करलें तरी बापू त्याच्या कसोटीला पुरेपूर उतरतील. वस्तूचें विधायक रूप जाणून घेताना ' शारदीचिये चंद्रकळे । माजीं अमृतकण कोंवळे । ' ' मनें मवाळें ' वेंचणाऱ्या मृदुल चकोरतलगाप्रमाणें बापूंच्या चित्ताला हळुवारपण प्राप्त होत असलें तरी जातिचें मुकुल जसें ' मौवाल ' असूनहि ' तीख ' असतें, तशी त्या हळुवारपणाला चिकित्सक बुद्धीची धार असतेच असते.

शनैश्वराचें माहात्म्य वर्णन करीत असता, शनैश्वरचरित्रातील ' फटकारे रेड्याच्या पाठीवर पण वळ मात्र शनैश्वराच्या पाठीवर' हा असंगति अलंकार बापूंनीं इतक्या सगतवार रीतीनें आणि भाविकपणें वर्णन करून सांगितला कीं बापूंनीं नुकतीच गळ्यात माळबिळ घालून घेतली कीं काय अशी कुशंका ही आमच्या चित्तात अनाहुतपणें डोकावून गेली. बापू सांगत होते, 'सहानुभूति किती खोलवर जाऊं शकते याचें हा अलंकार उत्कृष्ट उदाहरण आहे. मुलाच्या पायाला काटा बोचला अन् आईच्या पायाला रक्त आलें ही अतिशयोक्ति आपण अधाशाप्रमाण पत्करतोंच ना ! मग, शनैश्वरचरित्रातील या अलंकाराला आपण आधुनिकानीं का हसाव ? अतिशयोक्ति सौंदर्यवर्धिनी असते हें खरेंच, पण ती मूळ वस्तूचें विधायक रूप स्पष्ट करण्यासाठीं सकल्पिलेली असते. इमर्सननें म्हटलें आहे—A poet never thinks that he has said enough unless he exaggerates. अतिशयोक्ति

केल्याशिवाय जेवढी ऊर्मि मनात उचंबळली असेल, तेवढी सारी पूर्णतेने व्यक्त झाली आहे असे कवीला वाटतच नाही ''

ज्ञानेश्वर चरित्रातील वरील अलंकारात दडलेल्या अतिशयोक्तीचे मर्म रसिकपणे खुलवून सांगताना बापूंनी सहानुभूतीच्या अभिसरणाचे केलेले सार विवेचन मला अजूनहि स्मरत आणि वाटत, बापूसारखे रसिक बापूच !

'उपेक्षितांच्या अंतरंगा'चा मागोवा घेताना किंवा तुकारामबोवांच्या पाठीत उसाचे कांडे मारणाऱ्या 'त्राटिका' जिजाईची प्रपंचात कशी ओढा ताण होत असेल याचे कनवाळूपणे वर्णन करून तिचा कैवार घेताना बापूंच्या चित्ताला जितके हळुवारपण प्राप्त होत असे, तितकेच कारुण्य, गांभीर्य आणि चिकित्सकपणा धारण करून बापू कधी 'गुरुसत्ते'वर प्रहार करीत आणि कधी तिचा महिमाही गात, कधी ज्ञानेश्वराला वाळीत टाकल्याबद्दल तत्कालीन ब्रह्मवृंदाला कसे दोषी ठरविता येत नाही याचे ठाशीव नी समतोल विवेचन करीत कधी 'जिजाईला तुकारामाच्या मृत्यूनंतर पुत्र झाला म्हणून तुकारामाच्या वैराग्याचे पोते धारदार नव्हते असा भ्रम तुमच्या चित्ताला होऊ देऊ नका कारण देहधर्म हे कुणालाहि सुटत नाहीत आणि तेवढ्यापुरताच तुकाराम प्रपंचात होता '' असे म्हणून आम्हाला सावध चित्ताने विचार करण्याचा इषारा देत, तर कधी 'आज्ञापत्र'कर्त्या रामचंद्रपंत अमात्याच्या '' कदाचित् कोणी मामलेदार, उपाये करून गनिमाकडे गेला तो न ये असे झाले तरी त्याचे लेक गुलाम करावे, बायका बटकी कराव्या '' या शिकवणुकीचे समर्थन करीत '' माणुसकीच्या अधिक उदात्त अशा आवेगाला धरून रामचंद्र पंताची शिकवण अनुचित वाटली तरी राजकारणात, ज्याने सर्व राष्ट्राचे भवितव्य धोक्यात आणले त्याला वठणीवर आणण्याचा शेवटचा उपाय म्हणून ती सर्वथैव उचित आहे मानसशास्त्राच्या दृष्टीनेहि हा उपाय रामबाण आहे एखाद्याला जर वठणीवर आणावयाचा तर त्याला प्रिय असलेल्या व्यक्तींचा छळ केल्याने तो जितका वश होतो तितका त्याचा स्वतःचा छळ केल्याने होत नाही शिवाय, कुटुंब एक असते ना ? बायको नवऱ्याचीच बायको आहे ना ? मुले ही त्याच्यापासून अविभाज्य आहेत ना ? बापाचा वारसा मुलालाच मिळतो ना ? मग शासनाच्या बाबतीत तरी अलगपणा का ? ममत्व हा जर अविभाज्य कुटुंबसंस्थेचा गाभा आहे तर त्यासाठी प्रत्येक

घटकानें स्वतःचा स्वाहाकार करायवाला तयार असलें पाहिजे. रामचंद्रपंतांची शिकवण आरोपीला बाधक असली तरी ती परिणामतः साधक आहे. " मला वाटतं, बापूंच्या चित्तवृत्तींत रुजलेल्या काठुर्य, गांभिर्य आणि चिकित्सकपणा या त्रिगुणांना वरील समर्थनांत चांगलीच ढेरेदार पालवी फुटलेली आहे.

(८) बापूंना झालेला ' इहतत्त्व स्पर्श '!

परमार्थाच्या संशोधनाला नावें ठेवता येणार नाहींत, तो संशोधनाचा विषय होऊं शकतो, आणि परमेश्वररूपाचे संशोधनात मी सर्वस्व वेंचणार अशी ज्याला ईर्षा त्यानें अवश्य प्रपंचत्याग करावा, हें सारें बापूंना मान्य आहे; आणि म्हणूनच तुकारामाविषयीं त्याना अतोनात आदर आणि अभिमान! परंतु,

' बंगल्याच्या खालून येतो जातो ' (माणिकप्रभु)

' राधिकेचा रंग पाहुनी कृष्ण दंग जाहला ' (विठ्ठलनाथ)

(विठ्ठलाला उद्देशून) ' तुजवर आम्ही फिदा, बोल एकदा पद्मलोचनें '

(गोविंदकवि)

असा थोडा शृंगार व थोडा परमार्थ यांचें वोढण केलेलीं पदें लिहिणाऱ्या कवींनींहि ' जगत खोटें, मिथ्या मायारूप ' असें सर्व प्रापंचिकांना गर्जून सांगण्याचा ढोल मिरवावा याची बापूंना अतिशय चीड!

संताच्या परंपरेंतून आपण होऊन मोठ्या धैर्यानें उठून प्रापंचिकानीं मर्दपणानें प्रपंच करावा असें आग्रहानें सांगणाऱ्या आणि गार्हस्थ्याची उच्च पीठिका पुन्हां प्रस्थापित करून आनंदभुवनातील प्रापंचिकाना प्रपंचाची सनद देणाऱ्या कर्तृत्वशाली रामदासाचें कौतुक किती करूं आणि किती नको असें बापूंना होऊन जातें.

पाश्चात्य देशामध्यें आजच्या घटकेला भौतिकशास्त्राची जी झपाट्यानें प्रगति होत आहे तिच्याकडे बापू अगदीं आवर्जून अवधान देत असतात. भौतिकशास्त्राच्या किमयेनें नजिकच्या भावी काळांत पृथ्वीतलावर जो गंधर्वनगरी निर्माण होईल तिचीं चित्रें रेखाटण्यात ते नेहमींच रंगतात आणि आपल्याला तिचें वैभव पहायला मिळणार नाहीं यार्चे त्याना थाईटहि वाटतें.

इहलोकीचें जिणें अधिक रसमय आणि सुखकर करण्यासाठीं झगडणाऱ्या भौतिकशास्त्रज्ञांच्या अभ्यासाची आपल्या परतंत्र देशाला अतिशय

जरूरी आहे, हा विचार वाचकाच्या चित्तात स्थिर करण्यासाठी, विज्ञान बोधाच्या प्रस्तावनेत बापूंनी त्याचा जो जोरदार आणि प्रभावी प्रपंच केला आहे, तो पाहिला की, बापूना शास्त्रेला 'इहतत्परता' किती जोरदार आहे याची पुरती साक्षी पटते

आमचें बंधविमोचन व्हावयास हवें असेल तर, "आमच्या मनात कित्येक शतकें चिकटून राहिलेली ब्रह्ममायेची आणि जडसूक्ष्माची किल्मिषें झाडून टाकावयास हवीत, आमची वैराग्याची झापड आणि इह लोकींच्या जिण्याबद्दलची उदासीनता ही आम्हास फेकूनच द्यावयास हवीत" हा विचार वाचकाच्या मनात स्थिर करण्याकरता बापूंनी जे विवेचन केलें आहे, तें काहीं ( त्यांच्याच शब्दात सांगावयाचें म्हणजे ) 'चालू काळाशीं जुळतें बोलत बसावें म्हणून वरकरणी केलेलें वावपटव नव्हे, चित्ताच्या, विवेक बुद्धीच्या मूळ कढातून भराभर फुटणारे ते आरक्त पदे आहेत, ती निवत वाणी आहे

( ९ ) "मला काय वाटतें"

बापूंच्या सर्व लेखनाचा पाया 'मला काय वाटतें' हा आहे विवेचनाला घेतलेल्या विषयासंबंधीं जरूर तेवढीं सत्यें समजावून घेतल्यावर, त्या संबंधीं स्वत ला काय वाटतें याचा बारकाईनें शोध घेऊन मग त्या वाटण्याचा मराठमोळ्या, राकट, रासवट पण ठसठशीत आणि डौलदार भाषेत प्रपंच करावयाचा ही बापूंची नेहमींची रूबब आहे आपल्या बुद्धीला स्वतत्रपणें स्फुरलें तें ज्यात लिहिलें आहे, ज्ञानाचें दत्तविधान न करता स्वतत्र मौलिक चर्चा ज्यात केली आहे, असे साहित्य मराठी भाषेत कोणतें आहे? बुद्धि मूर्तीतून निघालेलें स्वतत्र धन येथें आहे काय? असे प्रश्न जर कोणी विचारले, आणि उत्तरादाखल अशा लिखाणाची मोजदाद केला तर त्यात बापूंच्या बऱ्याच लिखाणाचा समावेश करावा लागेल

परशुराम चरित्रात बापूंनी केलेला 'सकेत बोध,' पत कवितेच्या दुर्बोधत्वाची त्यांनी केलेली सामाजिक मीमासा, पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या शिलालेखाच्या सहाय्यानें मराठी भाषेच्या उगमापर्यंत जाण्याचा त्यांचा प्रयत्न, मराठी भाषेला दादोबा पांडुरंगाच्या काळापर्यंत व्याकरणाची जोड का लाभली नाहीं याविषयींचें त्यांचें विवेचन, शनिश्वर नामदेव भेटीचा त्यांनीं लाविलेला

अभिनव अर्थ, त्याच्या चित्ताला प्रतीत झालेलें ज्ञानेश्वराचें मोठेपण, ' राम वरदायिनी माता आणि रामदास ' ह्या विषयावर त्यांनीं पाडलेला नवा प्रकाश ह्या सर्व गोष्टी बापूंच्या विचाराचें स्वतंत्रपण प्रकर्षानें प्रगट करणाऱ्या आहेत.

( १० ) " जग कणें मूळीं सांगो आली " !

पंडित मालवीयजींप्रमाणें बापूंनीं कधीं 'कायाकल्पा'चा प्रयोग करून घेतल्याचें ऐकिवात नाहीं, पण साठीच्या घरात आले तरी बापू अजून शरीरानें थकले नाहींत आणि मनानें तर ते त्यांच्या तारुण्याला लाजवतील इतके यौवनसंपन्न आहेत. बापूंचें चित्त इतकें यौवनसंपन्न आणि उत्साहानें ओथंबलेलें असल्यानें बापूंच्या मित्र मेळाव्यात त्यांच्या तरुण विद्यार्थ्यांची संख्याच जास्त आहे. ' जें जें म्हणून कार्य मी हातीं घेईन त्यात कर्तबगार आणि बुद्धिवान् तरुण मित्रांची वाण मला कधींच पडायची नाहीं' असें बापू अभिमानानें सांगतात. तेंच त्यांचें वैभव आहे.

बापू अध्यापनाच्या कार्यातून निवृत्त होण्याच्या आधीं काहीं दिवस आता निवृत्त झाल्यावर काय करूं नी काय नको असें बापूंना होऊन गेलें होतें. एकदा तर मर वर्गात कीर्तनकार होण्याची घमेंडीहि त्यांनीं आम्हाला मोठ्या गंभीरपणें दिली होती ! पण आमच्या सुदैवानं, तें गाणंबिणं काहीं आपल्याला आता यापुढं जमायचं नाहीं, हें बापूंना वेळींच पटून, आपला बहुतेक वेळ लेखनात खर्च करायचा असं त्यांनीं ठरविलं आहे. हें कार्य करण्यात बापूंना अपार समाधान आहे, तरी पण अध्यापनाचें कार्य बंद पडल्यामुळें दुसऱ्याला समजावून सांगण्याची आवडती खाज थांबा चालली आहे असा तक्रार ते मधूनमधून करतातच.

ऐन तारुण्याचा वीस वर्षांचा काळ अरण्यपाच्या गेला रात्री घातला, नंतरच्या काळात अध्यापनाच्या नी लेखनाच्या कार्यासाठीं परिश्रम केले. पुष्कळ दाट वर्षे उलटलीं, पण आता विश्रांति घेत स्वस्थपणें काळ कंठावा असा विचार बापूंच्या स्वप्नातहि येत नाहीं. अजूनहि बापू मनानें ताठ आहेत, त्यांच्या मनगटात रग आहे, वाणींत आवेश आहे, आणि त्यांच्या चित्ताला लागलेली कर्तृत्वाची धगधग अजूनहि जागृत आहे.

इतक्या जोरदार विश्रांती घेण्याच्या पोक आमदारांना बापू एकच उत्तर देतील,

"वाई ! तुम्ही म्हणतां तें सारं खरं, पण अजून काय करायचं बाकी राहिलं आहे, तें पाहिलंत का ! "

"हिंदी भाषेवर मला इतकं प्रभुत्व मिळवावयाचं आहे कीं त्या भाषेत मला अस्खलित वक्तृत्व करतां आलं पाहिजे इंदूरच्या श्रोत्यांना तसं मी आश्वासनच देऊन आलों आहे. "

"महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे घेण्यात येणाऱ्या परीक्षांचा दर्जा मी इतका उच्च करावयाचा प्रयत्न करणार आहें कीं पुणें विद्यापीठाशीं, महाराष्ट्र भाषेचा व वाङ्मयाचा अभ्यास करणारी संस्था म्हणून ती संलग्न झाली पाहिजे "

"कागदाची सोय झाली तर एक साप्ताहिक काढण्याचा माझा विचार आहे- या साप्ताहिकातल्या चौथ्या पानातली ओळ आणि ओळ वाचनीय झाली पाहिजे अशी काळजी मी घेणार आहें यात ललितलेखनाला मज्जाव असेल असं नव्हे, पण वाचकांना अमाप ज्ञान देणं हेंच त्याचं प्रमुख ध्येय राहील "

"अजून हिंदुत्वकोशाचं प्रकाशन तसंच राहिलं आहे, तें झालं कीं, 'वादकोशा'चा संकल्प मी सोडणार आहें आज ज्ञानाच्या प्रत्येक प्रश्नावर त्या त्या विषयातील तज्ज्ञाकडून वेचक परिच्छेद लिहून घेऊन एकत्र केले तर वाचकाची फार मोठी सोय होण्याचा संभव आहे "

"'प्रभात'मध्ये 'स्फुट परामर्श' घेण्यात, विद्यार्थी जीवनात निर्माण होणाऱ्या निरनिराळ्या विचारणीय प्रश्नांवर लेख लिहिण्यात, आणि ट्रॉटस्कीच्या 'रशियन राज्यक्रांतीचा इतिहास' या उत्कृष्ट ग्रंथाचं भाषांतर करण्यात मी आज इतका कांहीं गुंतून गेलों आहें कीं, हें सारं कार्य याबवून विश्रांति घेण्याचा विचार मला सुचतहि नाहीं आणि रुचतहि नाहीं "

आपूच्या या साऱ्या संकल्पांची सांगता व्हावी असें मला फार फार वाटतें.

---

# गुरुवर्य बापूसाहेब माटे : : : १२

ले. वसंतराव चिंचडे, बी. ए. (ऑ.) एल्एल्. बी.

माझे मित्र श्री. (आता प्रा.) खानवेलकर व मी घाईघाईनें वर्गात शिरलों. मराठी ऑनर्सचा वर्ग सुरू होऊन १०।१२ मिनिटें झाली असतील. आम्हास वर्गात जावयास उघडच उशीर झाला होता आणि म्हणूनच घाईनें आम्हीं वर्गात शिरलों व आता बापूसाहेब जें काहीं सांगें भरतील तें ऐकून घेण्याची आम्ही तयारी ठेवली. ते शिकवीत असलेल्या विषयाची तोंपावेतों केवळ प्रस्तावना झालेली होती व मुख्य विषयाला हात लावला गेल्ला नव्हता. त्यांनीं 'या' म्हणून आमचें स्वागत केलें व आपल्या नेहमींच्या पद्धतीचें मनमोकळें असें एक हास्य केलें. आम्ही जरा भीतभीतच प्रवेश केला होता तेव्हां त्यांनीं विचारलें, 'घाबरलात का रे!' त्यांचा मनमोकळा प्रश्न ऐकून आमचा जीव जरा खालीं पडला व आम्ही त्यांना कबुली दिली कीं, 'आम्हास उशीर झाल्यानें साहजिकच आम्हास भीति वाटली!' तेव्हां ते जरासे थांबले. आमची बसाबस झाली. विद्यार्थ्यांचीं मनें ते जें काहीं सांगतील तें ऐकावयास उत्सुक झालीं तेव्हा ते म्हणाले कीं, "साहजिक आहे. माझ्या चेहऱ्याची ठेवणच जरा उग्र स्वरूपाची आहे. काहीं काहीं लोकांची Physiognomy च अशी चमत्कारिक असते कीं त्यावरून त्यांच्या स्वभावाची परीक्षा करणें धारिष्टाचेंच ठरेल! माझ्या चेहऱ्यावरून मी रागावलों असेन असें आपणास वाटणें साहजिक आहे, परंतु माझेसारखा प्रेमळ शिक्षक आपणास मिळणें कठीण आहे हें मी आपणास आग्रहानें सांगू इच्छितों!"

स्वत च्याच व्यक्तिमत्वाबद्दलचे व स्वत:च्या स्वभावाबद्दलचे त्यांनीं स्वत:-च काढलेले हे उद्गार अजूनहि माझे चांगले स्मरणांत आहेत व मला या उद्गारांची आठवण त्यांचेकडे ज्या ज्या वेळीं जाण्याचा प्रसंग मला आला त्या त्या वेळीं झाल्यावाचून राहिली नाहीं. ते पूर्वी टिळकरोडवरील त्यांच्या बंगलेवजा घरांत राहात असत त्यावेळीं दुपारचे वेळीं त्यांचा विश्रांती-

च्या वेळ असे व ते त्या वेळीं क्वचित् स्वस्थ पडलेले असत. अशा कित्येक दुपारीं त्यांचेकडे मी गेलों असतां बाहेरील फाटकाचा आवाज झाला कीं त्याचें तें 'कोण आहे'चें उग्रगंभीर गर्जित कानावर येई. तथापि लगोलगच त्यांची सहास्य मुद्रा दृष्टीस पडली कीं ती भीति क्षणार्धात वितळून जाई आणि अत्यंत मनमोकळें प्रेमळ असें सुखकर सोनेरी वातावरण सभोंवती पसरे व त्यात त्यांचें तें उग्रगंभीर गर्जित लुप्त होऊन जाई. प्रथमदर्शनीं मनामध्यें काहींसें भय उत्पन्न करणारें तथापि परिचयानंतर अत्यंत स्नेहशील, प्रेमळ, सुखकर व आल्हादक असें गुरुवर्य बापूसाहेब ह्यांचें व्यक्तिमत्व आहे! बापूसाहेबांच्या भोंवती विद्यार्थ्यांची झुंबड उडालेली पाहून कित्येक तिऱ्हाईत लोकांना आश्चर्य वाटत असे व त्याच तोंडून आश्चर्योद्गारहि बाहेर पडत असत. तथापि बापूसाहेबांच्या स्वभावांत अशी काहीं आकर्षकता व गोडवा भरलेला आहे कीं, त्यांचेकडे एकदा आकृष्ट झालेली व्यक्ति त्यांची चाहती बनल्याशिवाय राहणार नाहीं! त्यांच्या थोराड देहांत वसलेलें प्रेमळ अंतःकरण व विशाल मन हें विद्यार्थ्यांच्या मनाचा कबजा क्षणार्धांत घेत असे ह्यांत काहींच आश्चर्य नाहीं!

बापूसाहेबांच्या प्रभावी व्यक्तिमत्वाचा व प्रेमळ अंतःकरणाचा ठसा विद्यार्थ्यांच्या मनावर उमटणें अगदीं साहजिकच होतें. विद्यालयीन यौवनकाळ हा आयुष्यांतील एक अत्यंत रम्य काळखंड असून त्यावेळीं मन-पिंड अगदीं ओला व लिबलिबीत असतो, व त्यावर कोणत्याहि सुंदर, स्नेहल, सोज्ज्वळ भावनेचा पगडा सहजासहजीं बसतो व मनाची कांच त्यावेळीं अतिशय शीघ्र विरघळी झालेली असल्यानें ती मोठी ग्रहणक्षम बनलेली असते. भरपूर खावें, प्यावें, भरपूर खेळावें भरपूर हसावें रमावें, भरपूर ऐकावें, भरपूर पहावें अशा समृद्धीचा तो सुवर्णकाल असतो व त्यावेळीं व्यवहारी जगाची झळ लागलेली नसल्यानें कटु अनुभव आलेले नसल्यानें केवळ निराशय मनानें, उदार अंतःकरणानें व रसिक दृष्टीनें जगाच्या व्यवहाराकडे पहावें अशी मनाची प्रवृत्ति झालेली असते. सौंदर्याचें पूजन मनापासून करावें, सद्भावनांनी जोपासना अंतःकरणपूर्वक करावी, आपली उच्च अभिरुची जीवनाच्या सर्व शाखांत ठायीं ठायीं प्रकट करावी अशीच मनाची ठेवण त्या वेळीं झालेली असते व जेथें जेथें काहीं अशी मनाची मान्यता आढळेल व प्रशंसा उत्तुंगता दृष्टीस पडेल

तेथें तर्थ लोभावून जाण्याचा त्या वेळचा तो रम्य काळखंड असतो कुणावर तरी आपण गाढ स्नेह करावा, कुणाला तरी आपल्या व्यक्तित्वातलें सौंदर्य-धन अर्पावें, कुणासाठीं तरी झटावें अशी ओढ लागण्याचा तो रम्य काळखंड असतो वर्षाच्या दृष्टीनें त्या वेळीं जगाकडे पाहण्याची प्रवृत्ति बळावलेली असते अशा ह्या समृद्धीच्या काळखंडात बापूसाहेबासारख्या प्रभावी व्यक्तिमत्वाची मोहिनी न पडली तरच आश्चर्य ! तरुणाचा सहवास आपणास किती सुखकर वाटतो ह्याबद्दल बापूसाहेबांनीं आपले विचार अनेकवार प्रकट केलेले आहेत काय आश्चर्य, कीं तरुणानांहि त्यांचा सहवास अत्यंत प्रिय व्हावा आणि ह्याच कारणानें त्यांच्याभोंवतीं विद्यार्थ्यांचें वलय सदोदित पडलेलें असावें !

विद्यार्थी आणि शिक्षक ह्यांच्या मनाची मिळणी व जुळणी किती अखंड व एकसंध झालेली क्वचितच आढळेल मी हें दृश्य अनेकदा पाहिलेलें आहे कीं, बापूसाहेब वर्गांत खुर्चीवर बसलेले आहेत, वर्ग विद्यार्थ्यांनीं चिकार भरून गेलेला आहे, आणि बापूसाहेबांचें प्रभावी व घणाघाती वक्तृत्व धाधा घोंधो अखंड आणि अप्रतिहतपणें वाहात आहे ! तो सुखसंवाद ऐकला, तें रंगभरण पाहिलें कीं, बापूसाहेबांच्या लोकप्रियतेची व विद्यार्थिप्रियतेची साक्ष मनाला अगदीं तावडतोब पटत असे ! आणि अशाच एका सुख क्षणीं बापूसाहेबांच्या त्या वक्तृत्वामध्यें अवगाहन करण्याचें सद्भाग्य मलाहि लाभलें त्यांचा विद्यार्थी म्हणून मी त्यांचीं अक्षरश व्याख्यानें ऐकलीं त्यांचा अत्यंत सुखद सहवास पाचसहा वर्षेपावेतों मला अखंडपणें लाभला व त्यांच्या जिवंत रसिकतेचा मला अनुभव आला

एक वर्षी माटघरचें धरण पहावयास आम्ही मराठा इंग्रजी ग्रुपचे विद्यार्थी विद्यार्थिनी गेलों होतों मनुष्यवस्तीपासून दूर असलेलें तें निवांत रमणीय स्थळ त्याची मोहिनी आम्हा साऱ्यांच्याच मनावर काहीं विलक्षणच पडली.

त्या वर्षी आमच्या इथं सप्रेलनाचे प्रमुख पाहुणे गुरुवर्य वामनराव जोशी हे होते प्रथम प्रत्येकानें स्वत चा परिचय स्वत च करून देण्याचा कार्यक्रम झाला व नंतर संगीताची स्वरमाधुरी चाखण्याचाही कार्यक्रम झाला कुणी आपल्या कविताहि गाऊन दाखविण्याला कार्यक्रमामध्यें मीहि एक छोटासा भागीदार होतोंच ! मी माझे प्रिय कवि मित्र श्री श्रीनिवास विष्णू

पाटणकर ह्यांचेवरील दिरडथा पानाची ती कविता म्हणून दाखविली. थोरांची मनोवृत्ति काव्यगायकाच्या मनोवृत्तीशी समरस झाल्याची जाणीव त्या वेळी मला विशेषत्वाने आली. त्या कवितेतील—

> कितीक पानें वेलीवर वीं।
> पिकती सडती परी न पडती।
> वृथाच सळसळुनी फडफडती।
> जरी न अंगी त्राण ॥

ह्या ओळी मी म्हणत असतानाच ते Side Diversion बापूसाहेबांना इतके आवडल्याचे दिसले की त्यांच्या थेट अंतरंगांतून एक सहानुकंपाचा हुंकार बाहेर पडलेला मी ऐकला! कदाचित् त्याना पाटणकरांच्या त्यांच्याशी असलेल्या चिरस्नेहाची अत्यंत सुखद जाणीव झाली असावी! कदाचित् त्याना प्रभाकराच्या त्या—

> ' कमि नव्हते पृथ्वीत अवांतर प्राणी नेयाला '

ह्या करुण ओळीची आठवण झाली असावी! मला मात्र एक अत्यंत थोर रसिक मन येथे वावरले आहे ह्याची जाणीव त्या वेळी विशेषत्वाने झाली! तो कार्यक्रम आटोपल्यावर लगोलग बाहेर आल्यावर जो कार्यक्रम झाला त्या वेळची आठवण मला अजूनहि अगदी ताजी वाटते. कुणा विद्यार्थ्याने सोबत एक बंदुक व छरेहि आणलेले होते. त्याचप्रमाणे त्याने Bull's eye-Target लक्ष्यही बरोबर आणलेले होते. बापूसाहेबांनी घोतराचा काचा खोचला आणि बंदूक हातांत घेतली व लक्ष्यावर छरे सोडले! त्या दिवशी त्यांनी लक्ष्यांचा वेध अचूक मारण्यात उच्चांक गाठला. त्या प्रसंगी त्यांचे ठिकाणी बीजभूत असलेल्या सेनापतित्वाची व त्यांच्या नेमबाजीच्या कौशल्याची मला विशेषत्वाने जाणीव झाली.

मला बापूसाहेबांची दोन अगदी भिन्न व्यक्तिमत्वे—रसिकत्व, कवित्व आणि सेनापतित्व—त्या दिवशी पाहावयास मिळाली. त्यांच्या विद्वत्तेचा साक्षात्कार तर महाराष्ट्राला आजवर अनेक सभा-संमेलनांतून व्यासपीठावरून झालेला आहे व मीहि तो अनेकदा हजारांच्या सोबत चाखलेला आहे. तथापि त्यांच्या रसिकत्वाची अगदी खरधीत प्रतीति मला त्यांच्या खाजगी संभाषणांतून लाभ-

लेली आहे आणि हे सर्व प्रसंग जमेस धरताना मला ते काहीं सुवर्णाक्षरात लिहून ठेवण्यासारखे रविवार आठवतात! मी काहीं थोड्याशा कवितांचा जनक आहे हें त्यांना ठाऊक होतें व आपण केलेली रचना त्यांना एकदा अवश्य दाखवावी अशी मनीषा माझ्याहि मनात इतर नवथर लेखकांप्रमाणेंच होती. ती मी त्यांना एकदा बोलून दाखविली. तेव्हां त्यांनीं आपले काहीं रविवार ह्या काव्यवाचनात काव्यश्रवणात घालवू या अशी इच्छा प्रकट केली. त्याप्रमाणें आमच्या काव्यवाचनाचे कार्यक्रम त्यांचेकडे काहीं रविवारीं अगदीं निवडक-अशा श्रोत्यांसमोर झाले. हे सारे प्रसंग माझ्या आयुष्यात अगदीं अविस्मरणीय आहेत. त्या त्या वेळीं त्यांनीं जे जे मला उत्साह देणारे, मार्ग दर्शविणारे उद्गार काढले व विचार प्रकट केले ते ते सर्व जिव्हाळ्यानें भरलेले व रसिकत्वानें ओथंबणारे होते. त्यातूनच पुढें वसंतवैभव ह्या माझ्या पुस्तकाची कल्पना निघाली व ती सर्वस्वी त्यांच्याच साहाय्यानें त्यांच्या प्रेमळ प्रस्तावनेसह फलद्रूप झाली, लेखनिविष्ट का होईनात परंतु बापूसाहेब आपल्या पाठीशीं अखण्ड बसलेले आहेत ही भावना मनाला अजूनहि अतिशय दिलासा देते.

त्यांच्या प्रभावी व्यक्तिमत्वाचा आविष्कार जितका त्यांच्या खाजगी संभाषणांतून पाहावयास सापडतो तितकाच किंबहुना त्याहूनहि अधिक अशा प्रमाणात त्यांच्या व्यासपीठावरील वक्तृत्वात आढळतो. मी त्यांची अनेक व्याख्यानें निरनिराळ्या प्रसंगीं, निरनिराळ्या भूमिकावरून, निरनिराळ्या मनःस्थितींत व निरनिराळ्या दृष्टिकोनातून ऐकलीं. आणि मला अगदीं निश्चयपणानें म्हणावयास काहीं हरकत वाटत नाहीं कीं बापूसाहेबांचें वक्तृत्व हें महाराष्ट्रात तरी आज ऐकण्यास दुर्मिळ आहे. पट्टीचे वक्ते व म्हणून आपण जें ओळखतों तें ऐकावयाचें असेल तर बापूसाहेबांच्या व्याख्यानाचा लाभ आपण कधींहि टाळणें उपयोगी नाहीं. उत्तम वक्तृत्वाचीं दोन महत्त्वाचीं अंगें म्हणजे ओघवत्ता अथवा रसवत्ता आणि गाढ अध्ययन. हीं दोन्हीही अंगें बापूसाहेबांच्या वक्तृत्वांत अगदीं पराकाष्ठेला पोंचलेलीं आहेत. आपल्या प्रतिपाद्य विषयात रंग कसा भरावयाचा, आपल्या भाषणांत असलेल्या रसाचा आविष्कार श्रोत्यांच्या अंतःकरणापर्यंत नेऊन पोंहोचविण्यासाठीं चेहेऱ्यावरचे मनोविकार कसे प्रसंगशः बदलावयाचे, आपल्या आवाजांत मार्दव कोठें आणावयाचें व-

उग्रता कोठें धारण करावयाची, सभागृहाचे अगदीं कोपऱ्यात बसलेल्या रसिकापर्यंत आपणें म्हणणें जाऊन पोहोंचावें म्हणून मधूनच प्रसंगीं अगदीं पुढ्यात बसलेल्या श्रोत्याच्याकडे जवळ जवळ पाठ कशी फिरवायची, आपल्या भाषणाचा वेग प्रसंगीं भरधाव केंद्रां व कसा सोडावयाचा, श्रोत्यांच्या अंतःकरणाला गुदगुल्या हातील असा खुसखुशीत विनोद मधूनच कोठें पसरावयाचा, आपल्या पुढें बसलेल्या श्रोतृवृंदाला मधूनच गोवून आपल्यातर्फे हवा असलेला निकाल कसा संपादावयाचा, बाजू पडू लागली आहे असें दिसू लागताच आपल्याजवळ असलेल्या ज्ञानभांडारातील अमूल्य माहितीचीं हिरे-माणकें श्रोत्यांना दाखवून कसें दिपवायचें, आपलीच बाजू कशी निनतोड आहे हें तर्कशुद्धपणानें समजाला कसें पटवायचें, श्रोतृवृंदाच्या भावनांना हात घालून कसें गदगदून सोडावयाचें ह्या वक्तृत्वकलेतील बारीक-सारीक गोष्टींची ज्याला ज्याला संपादणी करण्याची इच्छा असेल त्यांनीं बापूसाहेबांचे वक्तृत्वाचा अगदीं खोल असा अभ्यास करावयास हवा! आपल्या प्रतिपाद्य विषयाची अगदीं कसून तयारी करावयाची व मगच सभागृहापुढें बोलावयाचें असा त्याचा नामदंडक आहे. त्याचप्रमाणें आपल्या समोर बसलेला श्रोतृसमुदाय कोणत्या प्रकारच्या विचाराचा चाहता आहे हें हेरून आपणास हवें असलेलें अनुकूल किंवा प्रतिकूल वातावरण त्याच्यात कसें उत्पन्न करावयाचें ह्याची माहिती अनेक वक्त्यांना क्वचितच असते. कॉलेजकर श्रोतृवृंदापुढें आपला विचार कसा मांडावयाचा व तोच विचार साहित्यसंमेलनासारख्या व्यासपीठावरून कसा मांडावयाचा हें पाहावयाचें असेल तर बापूसाहेबांचेंच वक्तृत्व अनेकवार ऐकावयास हवें! त्याचा विद्यार्थी म्हणून मी जीं त्याचीं अनेक व्याख्यानें ऐकलीं त्यात त्यांनीं कवि गोविंदाग्रजावर जी एक व्याख्यानमाला गुंफली ती तर माझे विशेषेंकरुन स्मरणात आहे. गोविंदाग्रजाचा कविता आम्हास बी. ए. च्या वर्षी अभ्यासासाठीं नेमलेली होती. त्यांचीं हीं व्याख्यानें ऐकण्यासाठीं दुसऱ्याहि महाविद्यालयातील विद्यार्थी तर येतच असत. तथापि ज्यांचा केवळ वाङ्मयात वाङ्मय म्हणूनच हितसंबंध आहे असेहि कांहीं मान्यवर साहित्यिक त्या व्याख्यानास मोठ्या उत्सुकतेनें हजर राहात असत! 'आगरकरांचे निबंध' हाहि आमच्या अभ्यासाचा एक भाग होता. त्या विषयावरील त्यांचीं व्याख्यानें अगदीं अर्थांग जिव्हाळ्यानें

व तन्मयतेनें भरलेलीं असून आगरकरांच्या लेखनाबद्दल विवेचन करताना त्याच्या रसवन्तीला सुसता बहर येई! त्याचप्रमाणें एकदा आम्ही सर्व मराठी मुलांच्या विद्यार्थ्यांनीं त्याना प्रि. गोळे यांच्या "हिंदुधर्म आणि सुधारणा" ह्या ग्रंथावर बोलावयास आमंत्रिलें होतें. त्यावर त्यांनीं तीन तासपावेतों एक असें रसभरित व कडकडीत वक्तृत्व केलें कीं तें माझ्या स्मरणांतून तर कधींच जाणें शक्य नाहीं, कारण त्यातील विषय त्याचा म्हणून त्यांनीं आजवर कसोशीनें अभ्यासलेला आहे. सामाजिक दृष्टिकोनातून कोणत्याही वाङ्मयीन, इतिहासकालीन, राजकारणात्मक अगर कौटुंबिक प्रश्नाकडे पाहावयाचें ह्या त्यांच्या अभ्यासाचा व वक्तृत्वाचा विशेष आहे. तेव्हा गोळे काय किंवा आगरकर काय ह्यांच्या कार्याबद्दल विवेचन करताना त्यांच्या वक्तृत्वाला व प्रतिभेला अगदीं बेफाम भरती येई आणि श्रोत्यांच्या अन्तःकरणावर ते अगदीं श्रावणसरींनीं आपल्या विवेचनाची बरसात करीत! उत्कृष्ट कलेप्रमाणेंच उत्कृष्ट वक्तृत्वाचें—आणि वक्तृत्व हीही एक मोठीच कला आहे.—एक गमक असें आहे कीं, ते ऐकतांना ऐकणाराचा आत्मा नितांत समाधानात डुबत राहिला पाहिजे आणि असें समाधान बापूसाहेबांच्या व्याख्यानानंतर ज्यानें अनुभविलें नसेल तो दुर्दैवीच म्हणावयाचा. त्यांनीं आजवर हजारों व्याख्यानें दिलीं असतील परंतु असें एकदाही ऐकावयास आलेलें नाहीं कीं, त्याचें व्याख्यान पडलें! व ही गोष्ट साधी नाहीं. एक दुसरी वक्तृत्वाचा नमुना म्हणून बापूसाहेबांचें वक्तृत्व नेहमींच निर्देशिलें जाईल. त्याची विषयविवेचनाची पद्धत ही मोठी वैशिष्ट्यपूर्ण असे.* ते थेट विषयाच्या अगदीं मुळापावेतों एकदम जात. रसचर्चा करीत असताना स्थायी आणि व्यभिचारी भाव ह्यांच्यांतील भेद वर्णन करताना स्थायी भाव कोणते व ते कसे विकसित होत जातात ह्याचें वर्णन करीत करीत एकदम व्यभिचारी म्हणजे चोरून मारून येऊन जेणारा अशी श्लिष्ट दृष्टात पद्धती अनुसरून त्या दोन्ही भावांतील पोटभेद अगदीं ढळढळीतपणें ते विद्यार्थ्यांसमोर मांडीत! नाट्यछटाकार दिवाकर, ह्यांच्या कौटुंबिक आपत्तींचें वर्णन करता करता ते एकदम 'काळ पुरुषानें' दिवाकराच्या घरातल्या दोन ओल्या गोंवऱ्या चोरून नेल्या होत्या. अशी काव्यमय लकेर आपल्या वक्तृत्वात सोडून देत! ते गद्याभिमानी

असूनहि व पद्याची त्यांनी एक खूप विवेचन करण्यासारखी व्याख्या केली असूनहि गद्य आणि पद्य यांतील भेद व्यक्त करून मांडण्यासाठीं ते एक-दम असें सांगत कीं, पद्य...कविता रक्तांत भिनतें तसें गद्य भिनत नाहीं!' लावणीकारांच्या रचनेंतील वैभव वर्णन करतांना ते लावणींतल्या माधवाबद्दल एकदम असे बोलून जात कीं, हा पद्यकाराची रचना अगदी माझावर आलेली आहे!' त्यांच्या बोलण्यांतली अशीं आणखी कितीतरी वैशिष्ट्यपूर्ण उदाहरणें देतां येतील. तथापि हे त्यांच्या बोलण्याबद्दल लिहिणें फारच लांबल्यानें आवरतें घेतों.

---

## "माझी तेया वंदनें" : : : १३

प्रो. शांताराम करकरे, एम्. ए., बी. टी.

---

१९३८ सालची गोष्ट. मी नुकताच इन्दूरहून एस. पी. ला आलों होतों. दोन्ही कॉलेजमधील वातावरण अजिबात निराळें होतें. मी इंग्रजी ऑनर्स घेतलें असल्यानें मराठीकडे वळण्याचा प्रसंगच येत नसे. पण एक दिवस माझ्या मित्राच्या आग्रहावरून मी मराठीच्या तासाला बसलों. घंटेच्या आधीं ५ मिनिटें वर्गांत एकदम शान्तता झाली. आणि दरवाज्यातून एक भव्य व्यक्ति आत आली. मरदार अंगलट, उग्र गंभीर चेहरा आणि त्या उग्रतेंत अधिक भर घालणाऱ्या मोठ्या मिशा, अंगात लांब पर्शियन फॅशनचा कोट, डोक्याला साधी काळी टोपी. मनांत म्हटलें, "मराठीला कसली मजा येणार! टेबलामागें उभें राहून त्यांनी कोटांतून चष्मा काढला अन् लावण्यापूर्वी चारचारदां काचा रुमालानें पुसून घेतल्या.—शेवटी एकदाचा तो लावला. व वर्गावर नजर टाकिली. कांहीं

ठराविक विद्यार्थ्यांशी हंसत बोलले तों त्यांची नजर माझ्याकडे गेली. 'पाव्हणे कोठले' अशी पृच्छा झाली. रीतसर माझी ओळख मित्रानें करून दिल्यावर अभ्यासास सुरुवात झाली. आणि मग ती गंभीर मूर्ति इतक्या सहज व खेळकर वृत्तीनें शिकवूं लागली कीं मी मनाशीं विचारच करीत बसलों, 'हीच का मघाची उग्र गंभीर व्यक्ति?' सर्व वातावरण अगदीं घरगुती स्वरूपाचें; त्यात कुठेंच कृत्रिमपणाचा वा औपचारिकपणाचा लेशही नव्हता. 'म्हणजे आपला पहिला अंदाज सपशेल चुकला म्हणायचा तर.' असें मन म्हाही देऊं लागलें. तो तास केव्हा संपला हें सुद्धा कोणास समजलें नाहीं. इतर वर्गातील मुलांची 'ये जा' सुरू झालेली पाहताच 'तास संपला वाटतं' असें म्हणून त्यांनी चष्मा काढून पुन्हा खिशात ठवला. टेबलाभोवतीं सर्वांची गर्दी झाली. त्यात मीही सटकलों. तों त्यांनीं मला विचारलें, 'इंग्रजी घेतलेंत!' पण तो आवाज मला सांगत होता कीं, 'चुकलास तूं. मराठी घे.'

दुसऱ्या दिवशींहि वर्गात गेलों. त्या दिवशीं परकेपणा, संकोच पुष्कळच कमी झाला. मध्येंच कांहींतरी सदर्भाची कविता आली. सुरुवात कोणासच आठवेना. बापूसाहेबांनीं प्रसंगाचा बरोबर संदर्भ सांगितला पण सुरुवात आठवेना. मी घाबरत घाबरतच सुरुवात सुचविली अन् ती चुकून बरोबर निघाली. 'भले भले' म्हणून बापूसाहेबांनीं शाबासकी दिली. त्या शाबासकीनें मला धीट केलें आणि तासाअखेरीस विचारलें, 'मराठी घेऊं का? इच्छा फार आहे' वाऽऽ अवश्य घ्या. तुम्हाला काळजी करायचें काय कारण? आणि त्यांच्या त्या आश्वासनांत काय जादू होती न कळे पण मी दंड मरून विषय बदलून घेतला. मराठीला नाव दाखल केल्यावर वर्गात विनोदानें म्हणाल, 'पाव्हणा म्हणून आला अन् घरचा झाला?'

ही बापूसाहेबाची पहिली मुलाखत पण त्या पहिल्या मुलाखतींत त्यांच्या प्रेमळ स्वभावाची ओळख पटली. आणि पुढें तो ४–५ वर्षें त्यांच्या प्रेमळ व ज्ञानदायी सहवासाचा लाभ मिळाला त्याचाच परिणाम म्हणजे आज मला जे कांहीं थोडेंफार बळ मिळालेलें दिसतें, तें होय. त्यांच्या सहवासात मला त्यांच्या स्वभावाचे निरनिराळे विशेष पाहावयास मिळाले. त्यांच्या सर्वगामी विद्वत्तेचे अनेक पैलू दिसले. त्यांच्या कार्याच्या पसाऱ्याची व्यापकता व मौलिकताही दिसली.

गद्य असो वा पद्य असो वाण्साहेबांचा तास अवीटच असे. त्यांत त्यांची आम्ही विद्यार्थी मोठ्या आतुरतेनें वाट पहात असूं. मोरोपंतांची बाजू मोठ्या आवेशानं मांडणारी त्यांची ती मूर्ति आजहि आठवते. मधून मधून वाचण्यापुरता चष्मा लावून लागलीच तो टेबलावर काढून ठेवून मोठ्या अभिमानानें व प्रभावी वक्तृत्वास अभ्यासाची जोड देऊन ते बहारदार रंग आणीत. महाभारत हा त्यांचा अत्यंत आवडताच लाडका ग्रंथ. त्याचें महत्त्व—यश कशांत आहे हें पटवून देतांना ते नेहमीं सांगत :—

जें कांहीं जसें घडलें तें तसेंच्या तसें, स्वच्छ शब्दांत कसलाहि आडपडदा न ठेवता मोठ्या धैर्यानें सांगितलेलें आहे आणि यांतच त्याचें असामान्यत्व आहे.

कृष्णाविषयींच्या उल्लेखांत त्यांना आवडणारा भाग म्हणजे द्रौपदीची विटंबना करून अक्रू घेण्याचा प्रयत्न करणाऱ्यांना ' नव्हतों सभेंत आम्ही म्हणून लुटायास पावलें काय ?' असा सवाल करणारा व हे बाहू उगाच पुष्ट केलेत काय ?' असा बजावणारा कृष्ण होय. ' या गवळ्याच्या पोरानें जें कांहीं पराक्रम केले त्या सर्वांचें सार यांत आहे. पण आपल्या तमाशेवाल्या कवींनीं त्याचीं घाणेरडीं वर्णनेंच रंगविलीं...असें ते रागावून सांगत. मोरोपंतांच्या आर्या समजून देतांना त्यांतील समाजपरिस्थितीवर विवेचन करून त्यांचा अर्थ कसा लावायचा हें ते शिकवीत, पांडव तिबेटांतले, तेथें बहुपतित्वाची चाल कशी आली वगैरे सांगून समाजाची वाढ कशी होते यावर सुंदर विवेचन करीत.

मराठीच्या इतिहासाचा तो तास मी ह्यातींत विसरणार नाहीं. ज्ञानेश्वर व त्यांचीं भावंडें हा भाग चालला होता. त्या दिवशीं बापूसाहेबांचा समाजशास्त्राचा—सामाजिक घडामोडींच्या इतिहासाचा सखोल अभ्यास—त्यांनीं त्या प्रांतात केलेली सरशयांच त्या दिवशीं बोलत होती. विद्वत्ता व जिव्हाळा यांचा मधुर संगम त्या दिवशीं झाला होता. त्यांची ती आवेशपूर्ण वाणी अद्यापहि कानांत घुमते आहे.

" हें व्यक्तीचें दुःख नाहीं, हें समाजाचें दुखणें आहे, तें ज्ञानेश्वरानें वेशीवर टांगलें इतकेंच. ' हीं संन्याशाचीं पोरें ' त्या सामाजिक दु खाचें गळूं होतें. त्या वेळच्या ब्राह्मणांनीं जरी एकदा हट्ट धरला-

असा प्रश्न नेहमीं विचारला जातो. पण नीट विचार केल्यास त्यांची चूक काहीं नाहीं असें आढळलें. जी गोष्ट पूर्वी घडलीच नाहीं तिचा उल्लेख शास्त्रांत तरी कसा आढळेल ! त्याचा निकाल शास्त्र तरी काय देणार ? .....

आणि हेंच बापूसाहेबांचें वैशिष्ट्य...शिकवितांना असो या बोलतांना असो एखादा सामाजिक प्रश्नावरचा मुद्दा निघाला कीं, तें तन्मयतेनें, त्यावेशानें, पण बुद्धीच्या कसोटीवर त्याचा ऊहापोह करतात. त्याचें सारभूत तत्त्व कसें आलें, त्याची वाढ कशी झाली वगैरे सांगोपांग चर्चा आपल्या रसाळ वाणीनें करूं लागत त आणि त्यांच्या वाणींत अशी काहीं जादू आहे कीं ती कोणालाहि मोहून टाकते, आपलेसे करिते.

महात्माजींच्या कार्यक्रमांत अस्पृश्योद्धाराचा अन्तर्भाव होण्याआधीं कैक वर्षे बापूसाहेब हें कार्य मोठ्या आवडीनें व उत्साहानें करीत होते. त्यांनीं सोसलेली आर्थिक व शारीरिक झीज इतकी मोठी आहे कीं, " एकदा करावयाचें ठरविल्यावर मागें सरणारा हा मराठा नाहीं. " ही त्यांची गर्जना सार्थ ठरते.

नुसता पैशाचाच नव्हे तर सामाजिक सुखाचा होम करून त्यांनीं अस्पृश्यांची सेवा केली. हजारों रुपये इंग्रजीच्या क्लासेसवर मिळवले पण ते सर्व त्या दलितांना पाट्या पेन्सिली, कपडेलत्ते व शिक्षण देण्यांत त्यांनीं खर्च केले. आणि त्यांची परतफेड काय तर अवहेलना, अपमान, कुत्सितपणानें दिलेली ' महारमाटे ' ही पदवी ! पण ही महारमाटे शिवीच भृगूच्या लत्ताप्रहारासारखी बापूसाहेबांचें भूषण ठरली. आम्ही तुम्हाला वरिष्ठ अधिकाराची मोठ्या पगाराची जागा देतों पण आम्ही सांगू तसेंच प्रतिपादन करावें लागेल असें सांगणारे अस्पृश्योद्धारक, ' मी जें काहीं केलें तें प्रसिद्धीकरितां नव्हे तर मला पटलें म्हणून ! पैशाकरितां माझें स्वत्व विकावयास मी तयार नाहीं ' असा स्वाभिमानपूर्ण जाब देऊन त्यांनीं परतविलें.

त्यांच्याजवळ अगदीं मौलिक विचारांचा अतिशय मोठा सांठा आहे. छोटे छोटे स्वतंत्र विचार–खुसखुशीत–ताज्या फुलक्यांसारखे–त्याचा फायदा त्यांच्याबरोबर फिरावयास जाणाऱ्यांना नेहमीं होतो. बारिक बारिक छोटेखानी

मौलिक विचार सुचवून त्यावर जास्त विचार करावयास मदत करणें हें त्यांना फार आवडे.

प्रत्येक युगांत असा एक प्रबळ विचार समाजात असतो कीं, त्याचा आधार प्रत्येकास पुढें येण्यास घ्यावा लागतो त्याच्या धारेला लागला तरच समाज त्याला ओळखतो हा विचार सत्कवि व कवि सन्त या वादाचे वेळीं त्यांनीं सांगितला होता महाराष्ट्रांत एकाच वेळीं शिवबा–सज्जनगडावरचा सन्यासी व देहूचा संत जन्मास आले, असे हे लोकविलक्षण परस्पर विरोधी युगकर्ते एकाच वेळीं जन्मास यावे याचें कारण काय असावें ? असे लोक जन्मास कव्हा येतात ! त्यांच्या जन्माचा व समाजातील अशांततेचा असंतोषाचा कांहीं संबंध असेल काय ? असा विचारप्रवर्तक प्रश्न उपस्थित–करून बुद्धिमंतांच्या बुद्धीस थोडेसें गुंगवून–विचार करावयास लावणारे मौलिक विचार त्यांचे जवळ कितीतरी आहेत त्यांनीं त्यांचा एक संग्रह करून त्यावर छोटे छोटे स्पष्टीकरण व मार्गदर्शन करणारे निबंध लिहावे अशी माझी त्यांना नम्र विनंति आहे.

" काय महाराजा ! आताशीं भेटत नाहीं " असें विचारतांच मी एकदा विनोदानें म्हणालों, " बापूसाहेब तुमची भीति वाटते अद्यापही मला " त्यावर ते नेहमींच्या पद्धतीनें जरा डोळे किलकिले करून मनमोकळे हसले आणि म्हणाले, ' खरच का रे हें ! काय असेल तें असो, पण माझा हा उग्र चेहरा फार जणांना घाबरवतो. पण तसा मी नाहीं जरा ओळख होऊन बघ आंत प्रेमळपणा वाहताना दिसेल. " आणि त्याची प्रचीति मला कैक वेळेला आधींच आली होती कोणतीहि गोष्ट रंगवून खुलवून सांगण्याची हातोटी ही पहिल्यापासून त्यांना साधली आहे निकट खेळण्यापेक्षा त्या सामन्याचें वर्णन चटकदार–खुमासदार भाषेंत करून सांगण्याविषयीं त्यांची लहानपणा पासून प्रसिद्धी आहे. त्यांच्या मित्रांच्यात कोणत्याहि प्रसंगाचें बातमीदाराचें वर्णन करून सांगण्याचें काम यांच्याकडेच येत असे. हावभाव करून–योग्य शब्द वापरून जिवंत वर्णन करणारा म्हणून त्यांची ख्याति होती. कोणतीहि गोष्ट वर्णन करून सांगावयाची असल्यास त्या वेळीं " हा माट्या चांगलं सांगेल हें " असा मित्रांचा विश्वास असे.

गरीब होतकरू विद्यार्थ्यांना मदत करणें व पुढें-प्रकाशात येण्यास अवसर व संधी देऊन त्याच्या गुणाची बूज राखणें हें त्याना फारच चांगलें साधतें. कैक विद्यार्थ्यांना त्यानीं आपलेकडे नाममात्र कामास ठेवून सढळ हातानीं मदत केली आहे. त्याचा 'लेखक्' म्हणून कैक विद्यार्थी पुढें आले—त्यानीं आपलें विश्वविद्यालयीन शिक्षण बापूसाहेबाच्या मदतीवर केलें. एकदा आपला म्हटल्यावर त्याला योग्य मार्गदर्शन करणें—त्याची काय किंमत आहे हें ओळखून त्यास उत्तेजन देणें हें त्याचें ब्रीद आहे. माझ्यावरील त्याचें निरपेक्ष प्रेम हें सुद्धा याचच प्रत्यंतर आहे. श्री. नातूंच्या 'जगाचा इतिहासा'चें प्रकाशनप्रसंगीं त्यानीं दाखविलेली आस्था, कळकळ—व उत्साहानें केलेली व्यवस्था—कौतुकमिश्र प्रशंसा या सर्व गोष्टींतून त्याची आपुलकी- जिव्हाळा व मनाचा मोठेपणाच दिसतो.

पुण्यात जें काहीं ५–६ फड जिंकणारे आहेत त्यात बापूसाहेब प्रमुख आहेत. त्याचा श्रोत्याच्या मनावर पकड घेणारा, अस्खलित भाषेंच ती रुबाबदार आणि गडबड पाचटपणा करणाराना धाबरवणारी उग्र मूर्ति त्याच्या विद्वत्तेला पोषकच आहे. त्यानहि त्याची—'निरध्यक्ष सभा' ही एक नवीनच प्रथा आहे. हा पायंडा त्यानीं घालून देऊन आपल्या मौलिक-तेचें व आत्मविश्वासाचें दर्शन महाराष्ट्राला करून दिलें आहे असें म्हणा-वयास काहींच हरकत नाहीं कितीही मोठा श्रोतृसमाज असो—कोणताहि विषय असो त्याची वाग्गंगा अप्रतिहत वाहते. त्यातही सामाजिक क्रान्ती—उत्क्रांतीचा प्रकार फाटा आला असल्यास त्याची विशेष फोड करून त्याचें महत्त्व रंगवून व ठसवून सागणें हें त्यानींच करावें. येरा गबाळाचें काम नोहे.

———

# प्रा. श्री. म. माटे यांचे विविध दर्शन : १४

प्रा म दा साठे, एस् ए, एल् टी

माटेनाम्नि कुले जातो चेम्बुर्मे ' शापुरे ' भवान् ।
यथार्थनामा श्रीपादो माधवानन्दवर्धन ॥ १ ॥

इतिहासपुराणज्ञ पुरातत्त्वविशेषविद् ।
प्रिय प्रगल्भो मेधावी स्मृतिशास्त्रविलासि ॥ २ ॥

विविधवद्धर्मतत्त्वज्ञो महाराष्ट्रेषु विश्रुत ।
अनेकभाषामर्मज्ञ सुहृद्गणसुपूजित ॥ ३ ॥

राजा मुख मनुष्याणा नदीना सागरो मुखम् ।
पर्वताना मुख मेरुस्त्वमेव विदुषा मुखम् ॥ ४

व्ययवर्षे नभस्यच षष्टिवर्षो भवेद्भवात् ।
तृतीयाया तिथौ दिष्ट्या येन प्राप्तोऽयमुत्सव ॥ ५ ॥

सवत्सराणा चक्र यद्विधिनैव प्रवर्तितम् ।
यातीश्वरप्रसादेन पूर्णता जीवतस्तव ॥ ६ ॥

ऋषयो मुनयश्चैव वर्षन्त्वाशीर्वचस्त्वयि ।
वाञ्छित दृढमेतन्मे सञ्जीव शरद शतम् ॥ ७ ॥

प्रा माटे याच्या वयाची साठ वर्षे सपून यदा भाद्रपद शुद्ध तृतीयेचे दिवशी त्यानी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले हे ऐकून प्रत्येक महाराष्ट्रीयाला आनद झाल्यावाचून राहणार नाही त्याचे इग्रजी शिक्षण साताऱ्यास झाल्यानतर उच्च शिक्षणासाठी ते पुण्यास आले गरीब पण सुसस्कृत

व बाळबोध घराण्यात ते जन्मल्यामुळें व त्या परपरेंत लहानाचे मोठे झाल्यानें साहाजिकच त्याचा परिणाम त्यांच्या मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं.

**उच्च शिक्षणः**—पुढें उच्चशिक्षणासाठीं पुण्यास आल्यानंतर त्यास अनेक अडचणींना तोंड द्यावें लागलें व शिक्षणात खंडही पडला. अध्ययन आणि अध्यापन असे दोन्ही कार्यक्रम कधींकधीं एकसमयावच्छेदेकरून तर कधीं पुढे मागें त्याना करावे लागले. शिक्षण घेत असतानाच शिक्षकाचा धंदा त्याना पतकरावा लागला. असें करता करता वयाच्या २८ व्या वर्षी ते एम्. ए. झाले. शिक्षणाचें शेवटचें टोंक गाठण्याची त्यांची दुर्दमनीय महत्त्वाकांक्षा शेवटीं सिद्धीस गेली. ता. १ एप्रिल १९१५ या दिवशीं आम्हीं दोघेही नाना-वाड्यात शाळेंत शिक्षक होतो. शाळा चालू असतानाच एम्. ए. पास झाल्याची तार आली. आगाऊ योजनेमुळें मीही एम्. ए. झाल्याचें त्या तारेंत होतें. त्या वेळचे सुपरिंटेंडेंट प्रा. नाइक यानीं 'साठे मास्तरांचें' हार्दिक अभिनंदन केलें.

**त्यांचें ध्येयः**—ते जरी एम्. ए. झाले तरी, 'साठे मास्तरांचे' 'प्राध्यापक साठे' होतील अशी त्यानाही कल्पना नव्हती. परीक्षेचें कळल्यावर एका समा-पण प्रसंगीं मीं त्याना विचारलें, 'काय साठे, पुढें काय बेत आहे? मी तर सरकारी शिक्षण खात्यात नोकरी मिळाल्यास करणार आहे.' तेव्हां साठे म्हणाले 'हें पहा साठे, पुण्यातच राहून मी जें समाजकार्य योजिलें आहे तें करीत राहणार नि त्याबरोबर लेखनाचें कार्यही चालू ठेवणार. मग त्यात माझें कांहींही होवो. मला पुणें सोडावयाचें नाहीं, कारण ती ज्ञानाची पेठ आहे.' प्रा. साठे यानीं हे ध्येय अखेरपावेतों ठेवलें हे आता सर्वांस माहित आहेच. ध्येयपूर्तीसाठींच त्याना न्यू. इ. स्कूल सोडून न्. म. वि. मध्यें जावें लागलें, कारण डी. ई. सोसायटीचे अधिकारी त्याना पुण्यातच ठेवण्याची हमी देईनात.

**शिक्षक साठेः**—प्रा. साठे यानीं जवळ जवळ तीन तपांच्यावर अध्या-पनाचें काम केलें व त्या कार्यांत उत्तम नावलौकिक मिळविला. ते मराठी घेऊन एम. ए. झाले असले तरी शाळेंत ते इंग्रजी विषयच शिकवीत असत. त्याचे विद्यार्थी त्यांच्या या अध्यापनाची फार स्तुति करतात. पुस्तकी शिक्षणा-बरोबरच ते सामाजिक विषयाची विशेषतः अस्पृश्य समाजाची—चर्चा करीत. याचा साहजिकच तरुण विद्यार्थ्यांवर परिणाम होऊन ते साठ्याना अस्पृश्यांच्या

शिक्षणविषयक खटपटींत मदत करीत. या कार्याला लागणाऱ्या पैशासाठी ते इंग्रजीचा वर्ग चालवीत असत. त्याला तुफान गर्दी असे. शिक्षक या नात्याने त्यांच्या व्यक्तिमत्वाचा छाप विद्यार्थ्यांच्या मनावर पडल्याशिवाय राहत नसे हे अनेक विद्यार्थ्यांच्या तोंडातून निघालेल्या उद्गारावरून कळून येते.

समाजसुधारक माटे:—नुसते 'मास्तर' म्हणवून घेऊन माटे स्वस्थ बसणारे नव्हते. काहीं तरी भरीव समाजकारण करावें अशी मनाची तीव्र इच्छा. अस्पृश्याची आर्थिक व मानसिक दीन परिस्थिति पाहून मानव्याची विटंबना झालेली त्यांना पाहवली नाहीं. आपलें तन मन धन पणास लावून त्यांनीं तें कार्य इतक्या धडाडीनें व आत्मीयतेनें केलें कीं लोक त्यांना 'अस्पृश्य माटे' म्हणू लागले त्यांचे काहीं शत्रु 'महार माटे' म्हणून उल्लेख करतात! पावसातून, चिखलातून हातात एक मिणमिणा दिवा घेऊन रात्रीं आपले विद्यार्थी व पाट्या घेऊन माट्यांनीं शाळा चालविल्या आहेत. अस्पृश्य व दलित वर्गाची पाहणी त्यांच्या चंद्रमौळी घरात जाऊन सहानुभूतीनें ते करीत असत. त्यामुळें त्यांचें या समाजावरलचें लिखाण अगदीं वास्तववादी झालें आहे. पर्यंकपंडित बनून रिकाम्या वेळचीं कामगिरी म्हणून त्यांनीं लेखनाचें काम केलें नाहीं.

प्रा. माटे स्वत:ला 'सनातनी सुधारक' म्हणवितात तें यथार्थ आहे. ते शंकराचार्यांना डंवचतील पण त्यांची अवहेलना कदापि करणार नाहींत. ते खऱ्या अर्थानें पुरोगामी आहेत. हिंदू समाजाच्या तळापासून तो शेंडच्या वरापर्यंत त्यांनीं पाहणी केली आहे. अस्पृश्य वर्गाबरोबरच ब्राह्मण समाजाचीहि पाहणी पत्रकें काढून घरोघरीं जाऊन केली. ते बोलघेवडे सुधारक नाहींत. हिंदू समाजाविषयींचीं स्वत:चीं मतें अनेक वेळा त्यांनीं बोलून दाखविलीं असून वैदिक वर्ग घेताना त्यांतील दोषावर ते फार जोराचा प्रहार करतात.

प्राध्यापक माटे—माटे आपली स्वत:ची लायकी सिद्ध करून प्राध्यापक झाले आहेत. शिक्षकाचे प्राध्यापक झाल्यानंतर याआगोदरच यांना प्राध्यापक का केलें नाहीं असें विद्यार्थी म्हणत. कोणताहि विषय शिकविताना पल्लवग्राही पांडित्याचें प्रदर्शन न करिता ते मूलग्राही पद्धति स्वीकारीत. आपल्याला पूर्ण माहित नसलेल्या विषयात लुडबुड करण्याची त्यांना संवय

नाहीं. इतिहाससंशोधनाचा विषय निघाला कीं, ते म. म. पोतदाराकडे बोट दाखवितील. मराठी विषय शिकवितांना जुन्या मराठी वाङ्मयाचा अभ्यास अधिक असल्यामुळें तोच भाग ते शिकवीत असत.

लेखक माटेः—प्रा. माटे याचें लेखक या दृष्टीनें फार मोठें स्थान आहे. साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर हे पुस्तक परीक्षण करितांना त्यांचा 'नामवंत लेखक' म्हणून उल्लेख करतात, तर आचार्य अत्रे त्यांना 'शैलीकार माटे' म्हणून त्यांचा गौरव करतात. माट्यांना शाळेंत असल्यापासूनच लेखनाचा नाद असे. त्यांच्यावर कै. शिवरामपंत परांजप्यांच्या लेखनाचा बराच परिणाम झालेला दिसतो. जुने बखरींतील व देशीय शब्द वापरण्यांत म. म. पोतदाराशिवाय त्यांची बरोबरी कोणी करील्सें वाटत नाहीं. भाषा ठसठशीत, ओघवती, शब्दमाधुर्य नसलें तरी हाडापेरानें सशक्त व नीटसर असलेल्या तरुण युवतीप्रमाणें रसरशीत, त्यांत ठायीं ठायीं दिसून येणारा विचारौघ व कमलदलाप्रमाणें एकातून दुसरा, दुसऱ्यांतून तिसरा असा उत्स्फूर्त झालेला विचारक्रम—वगैरे गुण नीं त्यांचें लेखन फडके किंवा खाडेकर यांच्याप्रमाणें नूपुरांनीं रुणझुण करणारें, धणत् किंकणाप्रमाणें आकर्षक व नटलेलें नसलें तरी लोकमान्यांच्या वळणावर तें हृदयाची पकड घेणारें आहे. त्यांचा 'विज्ञानबोध' घ्या किंवा 'अस्पृष्टांचा प्रश्न' हा ग्रंथ घ्या, किंवा 'उपेक्षितांचें अंतरंग' वा 'अनामिका' घ्या; इतकें कशाला 'रसवंतीची जन्मकथा' किंवा इतर स्फुट लेख पहा–या सर्वांतून त्यांची मुख्य भूमिका कोणची म्हणाल तर ती वैचारिक होय. लिहितांना वाचकांना त्यांना कांहीं तरी सांगावयाचें असतें असें दिसून येईल. वेळ जाण्यासाठीं रिकामपणची कामगिरी म्हणून ते लिहीत नाहींत.

तात्पर्य, प्रा. माटे हे महाराष्ट्रांत पेशवाई गेल्यानंतर जे विचार प्रवर्तक लेखक होऊन गेले त्यांच्या प्रणालींत बसू शकतात व तें त्यांचें स्थान सर्वसुखें नसून मानाचें आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. राजकारण, समाजकारण, गत इतिहास वगैरेबद्दलचीं त्यांचीं मतें इतक्या प्रदीर्घ कालानंतरच्या अनुभवानंतर ठाम झालीं असल्यास नवल नाहीं व यावर बोलतांना ते मोठ्या आवेशानें बोलतात. कारण त्यांत त्यांचा आत्मविश्वास

असतो हे बोलत असताना त्याचे वक्तृत्व अगदी उतू जात असते कारण ते उत्कृष्ट वक्तेहि पण आहेत

**युयुत्सु माटे** –माटे हे प्रकृतीनें युयुत्सु आहेत ते मानधन आहेत या प्रवृत्तीमुळे त्याना शत्रूहि झाले आहेत त्यांचेशीं काहीं कामामध्ये झाले असले तर काहीं पुन जिगर दोस्तहि झाले! स्वत ला अजातशत्रू म्हणवून घेण्याची हौस त्याना नाहीं निर्भिडपणा त्यांच्या बोलण्यात व वाग ण्यात दर्प व अहंकार दिसतो बोलताना छाती पुढे काढून, क्वचित् मिशावर हात फिरवून ते प्रतिपक्षावर आवेशानें तुटून पडतात, कारण अकारण अप मान ते सहन करणार नाहीत मागे अत्रे–माटे वाद गाजला, नतर अपा दखाना व वार्ताहराना ते काहीं कटु पण सत्य बोलले त्यामुळे अजूनहि त्याचे मित्र म्हणवून घेणाऱ्यांशीहि त्यांचे बरें राहिलेलें नाहीं

**काहीं आठवणी**––माझा त्याचा स्नेह आज अनेक वर्षांचा आहे व मी जरी नोकरीनिमित्तानें मध्यप्रात वऱ्हाडात गेलों तरी मे महि यांची पुण्याची वारी कधीं चुकत नसे व इतर वेळीं त्याना पत्रव्यवहारानें उजळा येईल या कालातील अनेक आठवणींमुळे त्यांच्या स्वभावाचे विविध पैलू दृग्गोचर झाले त्या सर्व आठवणी देण्याचे हें स्थान नव्हे प्रा माटे याचा गणित विषय फार कच्चा या विषयानें त्यांच्या शिक्षणक्रमात फार अडचणी आल्या त्या वेळीं कॉलेजातील पहिल्या दोन वर्षांत हा विषय आवश्यक असे शाळेत गणित विषयाचा शिक्षक उपस्थित नसला म्हणजे याना एखादे वेळीं काम करावें लागे उदाहरण पाहिल्यानतर तें सोडविण्याऐवजीं त्याचें हे वाक्य पृथक्करण करीत!

असो मला जो थोडा अवधि या लेखासाठीं देण्यात आला त्या वाईत मला जे चार शब्द सुचले ते मी यथामति माडले आहेत लेखाची मर्यादाहि संपत आल्यामुळे मनात असले तरी अतिक्रमण करता येत नाहीं प्रा माटे याची कौटुंबिक परिस्थिति आता बरी आहे त्याचा काम करण्याचा उत्साह कायम आहे साहित्यपरिषदेचे कार्याध्यक्ष म्हणून ते काम करीत असून वाङ्मयात दौरे व अखंड लेखन यात त्याचा काल व्यतीत होतो साठी उल टलेल्या लोकांनीं हें उदाहरण आपल्या डोळ्यापुढे ठेवावयास नको का?

लेखाच्या प्रारंभी संस्कृत श्लोकात म्हटल्याप्रमाणे माझे मित्र प्रा बापू साहेब माटे हे शतायू होऊन त्यांना उत्तम आरोग्याचा लाभ होवो अशी ईश्वराला, त्या जगन्नियत्या प्रभूला, प्रार्थना करून हा थोडा लांबलेला लेख संपवितों

सञ्जीव शरद शतम् । सञ्जीव शरद शतम् । सञ्जीव शरद शतम् ।

इति शम् ॥

---

## "मला काय वाटते" : : : १५

ले अनादास कृ देशपांडे

---

इतर सर्व प्राध्यापकांपेक्षा प्रा माट्यांच्याबद्दल मला विलक्षण औत्सुक्य वाटे त्याचें कारण म्हणजे त्यांचा तो रुबाब, त्यांची ती भव्य आकृति, ती उंच टोपी, मोठाले डोळे व चटकन डोळ्यात भरणाऱ्या भरदार मिशा ! या सर्व गोष्टी नवख्या विद्यार्थ्यांच्या मनात हटकून दरारा निर्माण करीत असतात यगांत त्यांनी व्याख्यानाला आपल्या किंचितशा घोगऱ्या आवाजात सुरुवात केली की, मोकाटपणें सळसळाट करणाऱ्या विद्यार्थ्यांमध्यें क्षणार्धात एक प्रकारची चमत्कारिक शांतता निर्माण होत असे आणि अशा या पार्श्वभूमिकेवरून त्यांच्या वाङ्गंगेचा प्रवाह सुरू होई, त्यावेळीं खरोखरच सारें ज्ञानभाण्डार आमच्यापुढें मोकळें होत आहे असें आम्हांला वाटत असे

महाविद्यालयाच्या प्रथम वर्षालाच असताना आम्हाला असें वाटू लागलें याचें कारण तोंपर्यंत अभ्यासाला आवश्यक तेवढीच माहिती वाचण्याची व ऐकण्याची आम्हाला सवय होती. परंतु माटयांचा तास सुरू झाला कीं, मग आगरकरांच्या निबंधापासून तों गड कऱ्यांच्या नाटकापर्यंत, कसलेंहि पुस्तक असो, प्रतिपाद्य विषयातून नी त्याच्या प्रसंगातून अवांतर ज्ञानाच्या जितक्या लहानमोठ्या वारीक-सारिक झलकी आम्हाला दृग्गोचर होत कीं, आम्ही अगदीं विस्मित होऊन जात असू. गुप्त गुहेंतील संपत्ती पाहिल्यावर छोट्या अलीबाबाला जो विस्मय वाटला, तशाच प्रकारचा विस्मय ह्या ज्ञानभांडारामुळें मला वाटे. पण अशा तऱ्हेनें त्यांचीं व्याख्यानें विद्वत्तापूर्ण असलीं तरी तीं कधीं कटाळ वाणीं वाटलीं नाहींत. जितर अनेकांचीं भाषणें ऐकताना त्यांच्या पांडित्याचा उमाा मनाला वारंवार पटतो, परंतु त्याच वेळीं बापूसाहेबांच्या भाषणांतील आकर्षणाची आठवण तेथील अभावामुळें तीव्रपणें होते. गडकऱ्यांसंबंधीं शिकवीत असताना, "गडकऱ्यांच्या खोलींमध्यें पडलेल्या अडगळींपासून सुरवात करून वुधवार चावात आम्ही कशा गप्पा मारीत वेत होतों" या साऱ्या हकीकती खुलवून आपल्या रसाळ वाणीनें बापूसाहेब सांगू लागले कीं, कॉलेज, त्यांतील मुद्दाम पाळावयाची आवश्यक शिस्त, झटकन संपणारा तास या सर्व गोष्टींचा आम्हाला विसर पडे. शिवरामपंत परांजपे, आगरकर, टिळक, गडकरी, इत्यादि मराठींतील वाङ्मयीन वाक्प्रगारांचे पेंचें दिव वितांना, परक्या इंग्रजी भाषेंतील लेखकांच्या वाङ्मय शैलींचें पृथक्करण, त्यावरील दुसऱ्यांचीं मतें, मागें आलेल्या प्रश्नांचीं उत्तरें वगैरे शिकविण्याच्या कृत्रिम पद्धतीचा अवलंब बापूसाहेबांनीं कधींच केलेला आठवत नाहीं. उलट, प्रत्यक्ष त्या लेखकाच्या जीवितांतील अनेक लहानमोठ्या प्रत्यक्ष पाहिलेल्या घटनांचा, तसेंच त्यांच्या जीवनाच्या अनेकविध पैलूंचा मोठ्या खुबीनें आविष्कार करीत करीत प्रतिपाद्य विषय सांगण्याची बापूसाहेबांची हातोटी विलक्षणच होती. या त्यांच्या पद्धतीमुळें या मोठ्या वाङ्मय-भक्तांबद्दल आम्हाला एक प्रकारचें ममत्व वाटू लागे. आणि जो जो विषय आपल्या अधिक निकटचा तों तों त्याविषयीं आपुलकी अधिक आणि

म्हणूनच बापूसाहेबांचें व्याख्यान ऐकल्यावर मराठीचा आणखी काहीं विशेष अभ्यास करायचा आहे ही कल्पनाच मनाला भावत नसे.

व्याख्यानातील भारवाहकपणाचा अभाव हें अेक त्याचें प्राध्यापकीय वैशिष्ट्य आहे असें मला वाटतें. अनेक पौर्वात्य वा पाश्चिमात्य लेखकांची अथवा विद्वानाच्या नावाची जंत्री त्याच्या व्याख्यानात कधीं आढळत नसे. किंवा त्याचीं अनेक मतें सांगून पांडित्यप्रदर्शन करण्याचाहि बापूसाहेब कधींहि प्रयत्न करीत नसत. अेकदा शंकरशेठरस्त्याला आम्ही फिरायला गेलों होतों, तेव्हा बापूसाहेबांना मी माझी ही शंका बोलूनहि दाखविली. त्यावर ते म्हणाले, नेहमीं चरित्रें ( Biographies ) लिहिणारीं माणसें हीं चरित्रें, माहिती, आठवणी, आख्यायिका...इत्यादि साधनें गोळा करून त्यावरूनच लिहितात त्यामुळें चरित्रातून माणसाच्या ( चरित्र नायकाच्या ) वास्तव स्वरूपाची कल्पना येत नाहीं. व म्हणून चरित्रें वाचताना तीं ज्या साहित्यावर आधारलेलीं असतात तें मूळचें साहित्यच वाचावें हें अधिक योग्य. आत्मचरित्रें वगैरेंमधून माणसाच्या खऱ्या स्वरूपाची अधिक ओळख होते. एखादी गोष्ट जास्त महत्त्व देऊन मांडायची असली तर त्याच्याच स्वलिखित चरित्रात ती जशी सापडेल तशी दुसऱ्यानें लिहिलेल्या चरित्रात कदाचित् सापडणारहि नाहीं. ज्या विषयाचा अभ्यास करायचा त्याचें नेहमीं मूळ शोधीत जायचें हा मार्ग यांच्या बुद्धीचा कल असल्यामुळें त्याच्या व्याख्यानात एक विशिष्ट प्रकारचा अभिजातपणा आढळतो. आणि याच त्याच्या छंदातून "आपापले हितगुज"चा जन्म झालेला आहे.

याच्याच जोडीला बापूसाहेबांच्या अंगात नाट्यगुणांचीहि भर असल्यामुळें त्यांना यशस्वी शिक्षक म्हणून त्याच्या वर्गात मिळालेला मान अगदीं यथार्थ आहे. एखादें नाटक असो, प्रवचन असो, वाङ्मयाचा इतिहास असो अगर प्राचीन वा अर्वाचीन काव्य असो त्यामध्ये जो रस असेल तो नेमका विद्यार्थ्यांत उतरविण्याची त्यांची हातोटी विलक्षण आहे. गांभीर्य, कारुण्य, नर्म विनोद, सात्त्विक संताप या सर्व भावनांचा अनुभव त्यांच्या एका व्याख्यानातहि येत असतो. "तरुणपणीं अनेकवार नाटकात कामें केलीं असल्यामुळें मला त्यांचा अजूनहि उपयोग होतो." असें बापूसाहेब नेहमीं म्हणतात.

त्याची ' भाटिका ' नाटकातील ' पित्याची ' भूमिका अद्यापहि सताऱ्यच वृद्ध नागरिक विसरलेले नसतील

परंतु एक यशस्वी शिक्षक म्हणनेच काही माटे नव्हेत सांगलीच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडून आल्यानंतर ज्यावेळी बापूसाहेबांचा साहित्यमन्दिरात सत्कार झाला त्या वेळी मी त्याना हिम गिरी ही उपमा दिली होती यशस्वी शिक्षक हा माट्याच्या जीवित–कर्तृत्वातील फक्त एक अष्टमांश भाग आहे बाकीचा उरलेला सारा भाग म्हणजे माटे यांच्या जीवनांतील गामा होय माट्यांच्या या सर्वा जीवनकार्याची ओळख मला त्यांच्याच भाषेत सांगावयाचे म्हणजे सध्याकाळच्या ' सामुदायिक फिरण्या ' मुळे झाली सध्याकाळी खूप दूरवर फिरायला जाणे ही माट्यांच्या जीवनातील एक प्रमुख ' सवया ' आहे

सामुदायिक अभ्यासाची मोठ्या हिरिरीने तारीफ करणाऱ्या बापूसाहेबाना सामुदायिक फिरण्याची आवडहि तितक्याच मोठ्या प्रमाणात आहे किंबहुना निवांतपणे फिरायला गेले की अनेक मौलिक विचार सुचतात परंतु माट्यांचे नेमके ह्याच्या विरुद्ध आहे। हीच गोष्ट त्यांच्या वाचनाच्या व अभ्यासाच्या बाबतीतहि लागू आहे त्यांच्या सान्निध्यात ' हिंदुत्वकोश ' रचनेचे काम करीत असताना मला याचा पुरेपूर अनुभव आला वाचण्याच्या इराद्याने ते मोठमोठी पुस्तके, बायबल—वगैरे सारे धर्मग्रंथ टिळक मंदिरातील हिंदुत्वकोशकचेरीतून घरी नेत असत, परंतु पु हा सारी पुस्तकें घेऊन परत आम्हा सर्वांमध्ये येऊन बसलेले मी बापूसाहेबाना अनेकदा पाहिले आहे, आणि आल्यानंतर प्रथम प्र जल्पणे, " घरी काही विचार वाचन झाले नाही बुवा ! " अशी कबुली देऊन ते वाचायला सुरुवात करीत आणि मध्यंतरींच माहितीचा जरी एखादा प्रसंग कण आढळला तरी आम्हा, सर्वांना वाचून दाखविल्याशिवाय त्याना राहवत नसे, अशा तऱ्हेच्या सामुदायिक अभ्यासात एक प्रकारचा नशाच अनुभव येतो हे मात्र खचित

माझी व त्यांची राजकीय मतप्रणाली एकच असल्याकारणाने—त्यांच्याच भाषेत सांगायचे म्हणजे माझ्या ठिकाणी त्याना ' हिंदुत्वाचा पीळ ' आढळला असल्याने—हिंदुत्वकार्यांत काम करण्याची संधि मला अनायासेच मिळाली त्यामुळे रोज त्यांच्या समवेत फिरायला जायचे हे आमंत्रणहि

ओघानेंच आलें आणि या 'सामुदायिक फिरणें' सदराच्या द्वारा असा एकहि विषय उरला नाहीं कीं ज्यावर आम्ही मनमोकळे बोलूं शकलों नाहीं.

गुलटेकडीच्या बाजूला आम्ही फिरायला जात असूं त्या वेळीं एखादा रानरट माणूस आम्हाला लांबून पाहून, आपणहून नमस्कार करी व मग बापूसाहेब त्याच्याशीं कितीतरी वेळ आस्थेवाईकपणें एखाद्या घरच्या माणसासारखी चौकशी करीत थांबत. शेवटीं तो असे उद्‌गार काढी, "साहेब, आपल्या कृपेनें सारं काहीं ठीक हाय. मुलाला म्युनशीपाल्टींत नोकरी हाय. त्याला दोन ल्हानगीबी हायती. समदं ठीक हाय," नी तो नमस्कार करून पुढें चालूं लागे. तो गेला कीं, मग मग मोठें—तो भावाशीं कसा भांडे, त्याचा परचे किशोर मी कसे लिहिले—वगैरे हकीकती मनापासून आणि जिव्हाळ्यानें सांगत असत. अशा कितीतरी हकीकती त्यांनीं सांगितल्या आहेत कीं, त्या सार्‍या येथें उद्‌धृत करणें अशक्य आहे. त्यांच्या जुन्या ओळखीचे हे सारे लोक भेटले कीं त्यांना पुन प्रत्ययाचा आनंद होई

मला स्वतः ला बापूसाहेबांचा आवडणारा दुसरा गुण म्हणजे त्यांची झटकन निर्णय घेण्याची पद्धत अनेक विषयप्रश्नांसंबंधीं, राजकारणांतील उपप्रश्नांसंबंधीं किंवा त्यांच्या स्वतःच्या पुस्तकरचनेपासून तो घरगुती सामान्य गोष्टींसंबंधीं देखील मी मत हे झटकन निर्णय करतात आणि कामास लागतात. एखाद्‌ वेळेला तो चुकीचा ठरला तरी त्यांच्या स्वभावांत चंचलपणाचा अभाव असल्यामुळें त्याचे परिणाम त्यांच्या मनावर फारसे राहत नाहींत, आणि अंगीकृत कार्यामध्यें आलेल्या अडचणींनें त्यांचें मन द्विधा होत नाहीं. आणि याचमुळें सामाजिक बाबतींत, धार्मिक बाबतींत, राजकारणांत किंवा वाङ्‌मय क्षेत्रांत अनेक कुरत्या खेळण्याचा दणकटपणा मोठ्याच्या अंगीं आला आहे. त्या वादळाचा त्यांच्या अंगीकृत कार्यावर विपरीत परिणाम झालेला आढळत नाहीं.

अस्पृश्यासारख्याच हिंदु समाजांतील उपेक्षित अशा कितीतरी जमाती आहेत. त्या सर्वांच्या चालीरीति, लोककथा, स्वभावविशेष वगैरेंचादि मी माझे यांचा अभ्यास फारच दांडगा आहे. यावर आधारलेलें त्यांचें "सीमावावरील वन्य जाती" हें व्याख्यान मी ज्या वेळीं ऐकलें, तेव्हां हिंदुत्ववादी तरुणांनी खरोखर संघटना करण्यासाठीं बाहेर पडलें तर के. टै

विस्तीर्ण कार्यक्षेत्र त्याच्यापुढें आहे याची कल्पना येऊन मी त्याला विचारलें, "या बाबतींत तुम्ही तरुणांना मार्गदर्शन का करीत नाहीं ?"

त्यावर ते म्हणाले, "मी तर त्यांच्या सारखा मागें लागलों आहे कीं, या सत्ताभिलाषी राजकारणाच्या बुजबुजाटांतून तुम्ही अंग काढून घ्या आणि अशा तऱ्हेच्या एखाद्या सामाजिक कार्यांत पडा पण यामध्यें प्रसिद्धीचा झगझगाट नाहीं नाव छापून येण्याची शक्यता नाहीं, शिवाय 'मी हलद अन् हो गोरी' या न्यायानें केलेल्या श्रमाचें सार्थकहि स्पष्ट आढळणार नाहीं उलट आपल श्रम वायाच गेल असेंच वाटण्याचा संभव फार, आणि यामुळेंच तरुण लोक याला कंटाळतात मान चिकाटीनें तुम्ही यात जर पडाल व जर त्याचा विश्वास संपादन कराल तर एकजुटीनें तुमच्यासाठी जीव द्यायला ते तयार होतील

सामाजिक कार्यासाठीं समाजकार्य करायचें येवढीच त्यांची वृत्ति नसून समाजाचें दुखणें व त्याचें मूळ शोधणें हाहि त्यांच्या समाजशास्त्रीय अभ्यासाचा हेतु असतो. एखाद्या गोष्टीचें मूळ हुडकणें व त्याचा सर्वांगानीं संपूर्ण व सखोल अभ्यास करणें हीं त्यांच्या अभ्यासाचीं प्रमुख वैशिष्ट्य मला हिंदुत्व कोष रचनेच्या वेळीं आढळून आलीं. मद्रू येथें त्यांनी "या देशाचे खरे धनी कोण ?" या विषयावर व्याख्यान दिलें त्यावेळीं पृथु राजाच्या नावावरून पृथ्वी हें नाव कसें निर्माण झालें पुराणांतील पृथ्वीच्या छेदनाचा खरा अर्थ काय आहे येथून सुरुवात करून पार आधुनिक अर्थशास्त्रापर्यंत त्यावेळीं त्यांनीं आपलें व्याख्यान आणून भिडविलें त्यावेळीं सारा श्रातृवर्ग आश्चर्यानें स्तिमित झाला मुळापासून घसघशीत सर्व एकापाठोपाठ एक सांगून सभा जिंकण्याची हातोटी त्यांना फारच चांगली साधली आहे.

एकाद विषयाचा सर्व दृष्टीनें विचार करण्याची हातोटी त्यांच्याजवळ असल्यामुळें त्यांचीं व्याख्यानें नुसतींच प्रचारकी थाटाचीं न होता विद्वत्तापूर्ण होतात आणि म्हणूनच प्रतिपक्षांतील मंडळींना देखील श्री माटे यांचें भाषण ऐकावेंसें वाटतें.

हिंदुत्वकोश-रचनेच्या मुद्यादिमोल त्यांचा हेतु हाच आहे कीं नुसतें तत्त्वज्ञान सांगण्यापेक्षां इतिहास, वाङ्मय, तत्त्वज्ञान यांतील प्रत्यक्ष उदाहरणें देऊन जर मला आपला मुद्दा टसवील तर तो फारच झटकन श्रोत्यांना पटतो, म्हणून

अशा माहितीनें हा कोष समृद्ध करायचा त्यांच्या अभ्यासाच्या पद्धतींत अशा उदाहरणांना कधींच तुटवडा पडत नाहीं. याचें कारण वाचनांत सूक्ष्म तारक राफार आणि दुसऱ्यानें देखील तशाच पद्धतीनें वाचावें ही त्यांची इच्छा फार. हिंदुत्व-कोष कचेरींत मी मराठी रियासती वाचीत असतांना जेव्हां त्यांतून त्यांच्या अस्पृश्य वर्गांनीं केव्हां केव्हां नी कोठ कोठें देशासाठी आपले प्राण खर्ची घातले याचीं बारीक सारीक अनेक उदाहरणें मीं शोधून काढलीं, तेव्हां बापूसाहेबांना फारच आनंद झाला.

निर्भीडपणा व निग्रहीपणा याबाबत तर प्रा. माटे यांची ख्यातीच आहे. त्यांच्या पक्षांतील लोकांचे निरनिराळ्या प्रसंगीं मतभेद झाले, परंतु ते उघड-पणें बोलून दाखविण्याचें धाडस फक्त बापूसाहेब यांनीच दाखविलें आहे. संपूर्ण विचार करून एकदां मनाचा निर्णय झाल्यावर मग आपलीं मतें व तीं ज्यावर आधारलेलीं आहेत ती विचारपरंपरा स्पष्टपणें व उघडपणें सांगणें हाच जर कित्येकांना दोष वाटत असला तर नाइलाज आहे परंतु जगांतील व्यवहाराची ओळख करून घेण्याच्या मार्गी लागलेल्या तरुण बुद्धीला तरी हा उचित गुणच वाटेल आपल्या शिकविण्याचे लकबीनें तरुण विद्यार्थ्यांना प्रिय असलेले प्रा. माटे त्यांच्या दलील-अदलील वादांतील मतांमुळे कांहीं विद्यार्थ्यांच्या मनांतून उतरलेले मला माहीत आहेत. परंतु "हें मी कांहीं तुमची करमणूक करण्यासाठीं सांगत नाहीं" हें वाक्य बापूसाहेबांच्या हाताखालीं ज्या विद्यार्थ्यांनीं शिक्षण घेतलें आहे त्यांना अगदीं पाठ होऊन गेलें आहे. आणि हीच वृत्ति समाजामध्यें देखील मत प्रदर्शन करतांना त्यांनीं कायम ठेवली आहे. त्यांनीं रूढ केलेल्या निरपेक्ष सभा तरी कशाच्या द्योतक आहेत !

प्रा. माटे यांच्या स्वभावाचें आणखी एक वैशिष्टय मला वाटतें तें असें कीं त्यांना कोणतीही गोष्ट, मग तें एखादें व्याख्यान असो, पुस्तक असो, समारंभ असो अगर जेवण असो ती सर्व खूप मोठी भव्य, उच्च, उदात्त, भारदस्त असावी अशी त्यांची इच्छा असते. उगीच कोठें बारीक क्षुद्र अशी गोष्ट त्यांना मनापासून आवडत नाहीं महाराष्ट्र सांवत्सरिक, विज्ञान बोध, धातु-कोश, हिंदुत्व-कोष, मराठा समाजाचें पुनरुत्थान या झालेल्या या होऊं घातलेल्या सर्व ग्रंथांच्या उगमस्थानीं प्रयत्नकर्त्यांची हीच भावना

आहे 'जगाचा इतिहास' लिहिणारे श्री नातू यांचें कौतुक त्यांना वाटतें तें याच कारणानें

आज प्रा बापूसाहेब माटे हे वयाला साठ वर्षें पूर्ण होत आहेत म्हणून सेवानिवृत्त होत आहेत परंतु अितर अनेक गोष्टींपेक्षा त्यांना जर कशाचें राहून राहून वाईट वाटत असेल तर एकाच गोष्टीचें व ती गोष्ट ते नेहमी माझ्याजवळ बोलून दाखवीत असत ते म्हणत, "माझ्या तरुण मित्रांपैकीं बहुतेक शेवटचा मित्र तूच ठरशील कारण मी यापुढें 'निवृत्त' झालों कीं माझ्या विद्यार्थी वर्गातून मला मित्र मिळायचा प्रथा बंदच होऊन जाईल आणि नेहमी तरुणांच्या संगतींत राहून मन आणि शरीर तरुण राखण्याचा ह्य्यास पुढें अप्रतिहतपणें चालणार नाहीं" हीच खरी त्यांच्या मनातली हुरहूर आहे

प्रा माट्यांची साठी उलटून गेली असली तरी त्यांची काठी अजून तगडी आहे शारीरिक, मानसिक व बौद्धिक उत्साह तर तरुणाला लाजवील असा आहे आजपर्यंतच्या अभ्यासाच्या सवईनें नवीन ज्ञान संपादण्याची तळमळ त्यांना सारखी लागून राहिली आहे ते नेहमीं म्हणतात कीं, "मला यूरोपला जायला मिळालें तर वर्तमानपत्राला कमींत कमी दहा वर्षें पुरेल इतकी माहिती मी सहज पैदा करीन "

गाभथ मता, पैशाचा सतत पुरवठा, एखाद्या बड्या संस्थेचा वा व्यक्तीचा पाठिंबा यांतील कांहिं गोष्टी हाताशीं नसतांना, सान्या घरगुती अडचणींना तोंड देऊन, आपल्या शिक्षकाच्या पेशामध्यें तर नाव कमावून, स्वत चा स्वाभिमान राखून, नोकरीच्या फावल्या वेळांत एकांडे शिलेदाराप्रमाणें एक व्यक्ति किती प्रचंड कार्य करू शकते यांचें उदाहरण म्हणजे प्रा माटे आहेत आगरकरांच्या नंतर त्यांची परंपरा यथार्थतेनें पुढें चालविणारे महाराष्ट्रांतील एकमेव गृहस्थ प्रा बापूसाहेब माटे आहेत, असें मला वाटतें महाराष्ट्राच्या बौद्धिक पठडीचा अभिमान बाळगणाऱ्या बापूसाहेब माट्यांनीं यापुढें आपल्या मराठी भाषेच्या व महाराष्ट्रीय समाजाच्या अभ्यासाचा उपयोग भावी महाराष्ट्राच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक पुनरुत्थानाकरिता करून द्यावा व त्यासाठीं जगन्नियंत्या परमेश्वरानें त्यांना उदंड आयुरारोग्य द्यावें अशीच माझी प्रार्थना असणार.

# उपेक्षितांचें अंतरंग : : : १६

प्रो. शं. के. कानेटकर, एम्. ए.

महाराष्ट्रांतील अस्पृश्योद्धाराचे एक निष्ठावंत कार्यकर्ते, पट्टीचे वक्ते, व्यासंगी लेखक नि विद्यार्थिप्रिय प्राध्यापक श्री. बापूसाहेब माटे यांनीं आपल्या अंतरंगातील आजवरची तळमळ गोष्टींच्या रूपानें मांडून, हें 'उपेक्षितांचें अंतरंग' उघडें करून दाखविलें आहे. श्री. बापूसाहेबांचे जीवनांतील अनुभव बहुविध नि अलोट आहेत, आणि त्यांची आजवरची वाङ्मयीन तपश्चर्या बहुमोल आहे. निरनिराळे वाङ्मयप्रकार हाताळतांना ते गोष्टी-वाङ्मयाकडे वळलेले पाहून त्यांच्या असंख्य वाचकांना आनंदच होईल. साठीत वावरत असलेल्या बापूसाहेबांचा हा आत्मविश्वास व ही कलासक्ति पाहिली म्हणजे अंतःकरण आदरानें व आनंदानें भरून येतें व त्या भरात त्यांचें व त्यांना या लेखनास प्रवृत्त करणाऱ्या सुविद्य विद्यार्थ्यांचें अभिनंदन केल्यावांचून राहवत नाहीं.

उपेक्षितांचें अंतरंग हें एक मराठींतील उत्कृष्ट नि अपूर्व पुस्तक आहे. परकीयांच्या सत्तेखालीं थोड्याफार प्रमाणानें सर्वच भरडले जात आहेत व सर्वांचीच उपेक्षा होत आहे. पण त्यांतल्या त्यांत देशाच्या सेवेला उपयोगी पडणारीं अशीं सोन्यासारखीं सोज्वळ अंतःकरणें जेव्हां अमानुष तऱ्हेनें चिरडलीं जातात, तेव्हां कार्यकर्त्या मनाची तळमळ झाल्यावांचून रहात नाहीं. श्री. बापूसाहेबांनीं अशा उपेक्षितांचीं अगदीं जिव्हाळ्यानें दखलगिरी घेऊन, त्यांना प्रेमानें जवळ केलें आहे व त्यांच्याच जीवनांतील प्रसंग घेऊन त्यांनीं या गोष्टी तयार केल्या आहेत.

हा ग्रंथ अक्षरशः 'अपूर्व' आहे, कारण अशा तऱ्हेच्या साहित्याची संपत्ती मराठींत आजवर कोणींहि केलेली नाहीं. मराठी वाङ्मयांत इतक्या सुंदर वस्तुस्थितीवर आणखी रमणीय कलाकृति अशा आकर्षक तऱ्हेनें आजवर

कोणीहि उभारलेली नाहीं. नुसतीं "बन्सीधर, कृष्णाकाठचा रामवंशी, पिन्या, सत्या, तवा, बेभट्या, नाथनाक, देवकाई" हीं नावें ऐकलीं, तरी आपण सातारा जिल्ह्यातील खेड्यापाड्यातून किंवा दऱ्याखोऱ्यातून हिंडतों आहोंत असें वाटतें. तारळखोऱ्यातील पिन्यानें आपल्या कर्तबगारीचा प्रसाद माझ्या घराण्याला एकदा दिला असल्यानें व लहानपणीं तो मीं प्रत्यक्ष पाहिला असल्यानें, त्याची निराळी साक्ष द्यावयास नको. हे सर्व आत्मे काहीं एका विशिष्ट परिस्थितीमुळें उपेक्षिले गेले व सापडला त्या मार्गानें ते गेले, पण त्याचें खरें अंतरंग पकडून, श्री. बापूसाहेबांनीं मराठी वाङ्मयांत त्यांना अजरामर करून ठेवलें आहे

हें पुस्तक नुसतेंच उत्कृष्ट नि अपूर्व नाहीं तर प्रेरकहि आहे कोणतेंहि पुस्तक 'प्रेरक' या पदवीला पोंचण्यास त्याच्या अंगीं गुणधर्महि तसेच जबरदस्त नि अलौकिक असावे लागतात त्याच्यामागें अनुभवाची पार्श्वभूमि असावी लागते, त्याच्या उभारणीला कर्तृत्वाचा जोर असावा लागतो, त्याच्या नसानसांतून जिव्हाळ्याची तळमळ वाहावी लागते, त्यांत सूक्ष्म पण प्रेमळ सहानुभूतीची दृष्टि असावी लागते, त्याचा आव समावेशक, त्याची शिकवण थोर, त्याची भावना तळमळून उठलेली व खडबडून जागे करणारी, त्याची भाषा हृदयस्पर्शी, काव्यपूर्ण नि बोलकी व त्याचा ध्वनि कार्यसूचक असावा लागतो. असें असलें म्हणजेच तें पुस्तक प्रेरक होऊं शकतें. श्री. बापूसाहेबांच्या 'अंतरंगांत' हे सर्व गुण सामावलेले असल्यामुळें वाचकांना हें पुस्तक कार्यप्रवण करील असें वाटतें

या पुस्तकांत एकूण तेरा गोष्टी दिल्या असल्या तरी त्यांतील "सर्वच प्रकरणं 'गोष्ट' या नांवाखालीं मोडण्यासारखीं नाहींत" हें श्री बापूसाहेबांचें म्हणणं खरें आहे. या तेरा 'प्रकरणां' पैकीं 'हास्याचा शोध,' 'माझें मनोराज्य' व 'इंद्रायणीच्या वाळवंटांत' हे निबंध असून बाकीच्या दहा लघुकथा आहेत. त्यांतहि पहिले दोन ललित निबंध असून तिसरा चिंतनशील निबंध आहे 'माझें मनोराज्य' या निबंधाचें श्रेय प्रा. फडक्यांच्या ललित निबंधाच्या पिंक्तिसेंदी इतकें जुळतें आहे, की भाषावैशिष्ट्य सोडलें, तर वाचणारा प्रा. फडक्यांनीच केलेला आहे का काय, असें वाटेल हें आरंभींचें 'राज्य व मनोराज्य' यांवरील उपरोधी पण सूक्ष्म प्रवचन, नवरसांचा

'दहा लाखाचा विनियोग' नि श्री. बापूसाहेबाचा जीव कुठें कुठें अडकून पडला आहे याचें उपहासदर्शन व शेवटीं या हिंदमहमदी मनोराज्याला लाथ मारून व निबंधाला कलाटणी देऊन मूळ स्वस्थ वृत्तीवर परत खेचून आणलेली स्वताची व वाचकाची वृत्ति, हें सर्वच तंत्र ललित निबंधाला शोभण्या सारखें 'चपखल' आहे. तंत्रदृष्ट्या हा निबंध प्रा. फडक्यांच्या 'प्रयाचा सुगंध' या निबंधाशीं तुलून पहाण्यासारखा आहे. श्री. बापूसाहेब, "आपणास हें सर्व तंत्र अजून शिकावयाचें आहे" अशी उगाच सविनयता दाखवितात, म्हणून "तुम्ही आतापर्यंत गोल्फ होता ती मराठी भाषाच होती," अशी रावबहादुर परांजप्यांच्या भाषेंत त्यांना या तंत्राची जाणीव करून देण्यासाठींच हा इतका विस्तार केला 'इंग्रजांच्या वाळवंटात' या निबंधात त्यांची तुकारामावरील निर्मळ भक्ति, गाढी विद्वत्ता, वैचारिक सूक्ष्मता, मार्मिक टीकाबुद्धि नि विरघळणारें अंतःकरण हीं दिसून येतात. आता यापुढें, चिंतनशील निबंध' 'ललित निबंध' व 'लघुकथा' अशीं निरनिराळीं सदरें करून त्यांनीं तीन निरनिराळीं पुस्तकें मराठी वाचकास सवकर द्यावीं, असें मी त्यांना आर्जवून म्हणतो.

श्रीकांच्या दहा गोष्टींपैकीं 'अस्पृष्टाच्या डायरींतील पानांनीं' खानगी म्हणून अगोदरच लोकांना चटक लावलेली आहे व गोड गोड मेजवानीच्या अपेक्षा त्यांच्या मनात उत्पन्न केल्या आहेत. या सर्व अपेक्षा या पुस्तकांतील गोष्टी वाचून त्यांनीं सफल होतील

या गोष्टींपैकीं 'कृष्णाकाठचा रामचंद्री' व 'वाखळवाडी"चा तक्षा पिन्या' या गोष्टी परस्परांशीं तुलून पहाण्यासारख्या आहेत. डोंगराच्या घळींत दाण्या पाषाणासारखा ऊन खात पडलेला रामा, व संबंध सातारा जिल्हा दणाणून सोडणारा पिन्या, हीं वास्तविक पहाता एकाच दिलदार वृत्तीचीं व पराक्रमी तेजाचीं दोन निरनिराळीं चित्रें आहेत. दोघेहि रसिक आहेत, कुलीन आहेत. पण ज्या कुलीन पत्नीसाठीं सत्या आसावला होता ती त्याला कधींच मिळाली नाहीं व त्याला आपली उभी हयात एका रखमी नांवाच्या रखेली-बरोबर काढावी लागली. पिन्याला मात्र चंद्री मिळाली व तो तिच्यावर जीव लावून सुखी झाला. पण शेवटीं दोघेहि पकडले गेले तेव्हा रखमीनेंच आपला पत्र फेडा हें ऐयाला फटलें, व चंद्रीनें आपणांत यांचविन्याचा प्रयत्न

केला हा पि॰याला अनुभव आला. ही चित्रणें करताना शेवटच्या वैरेच्या प्रसंगात रुक्मीसारख्या रखेलीच्या तोंडी " न फसवाया मी काय त्याची ल्माची बायकू हाय काय ? " हे शब्द व चद्रीच्या तोंडी " म्हातान्यान काय क्येल्या, म्हातान्यान काय क्येल्या ? " हे शब्द घालण्यात श्री बापूसाहेबांनी फार मोठा औचित्यार्थ साधला आहे. जवळ जवळ " ही रखेली पहा नि ही कुलीन स्त्री पहा, नि सांगा आता कुलीनपणा हवा की नको. " असा रोखठोक सवालच त्यांनी वाचकांना विचारलेला आहे. हें पाहिले म्हणजे नातें जोडताना किंवा सोयरीक करताना माणसें कुलीनपणासाठी का धडपडतात नि राजकारणी पुरुषाच्या बाबतींत त्याचें केवढें महत्त्व आहे, हें लक्षात येतें. सत्याच्या गोष्टींत सत्याचें घोसदार वर्णन, चटकदार संवाद, सत्यनारायणाच्या पूजेचा प्रसंग व सर्वांत शेवटीं सत्याच्या तोंडीं घातलेलें 'रामवशी' (रामोशी) शब्दाचें समर्थन हीं सर्व रोचक आहेत, तर पि॰याच्या गोष्टींतील सह्याद्रीच्या द॰याचें वर्णन, चुणचाऊ मार्गेतील संवाद, पालीच्या जत्रेतील प्रसंग, चद्रीच्या सूचना, हन्या रामोशाचा पराक्रम, शेरटचा कोर्टाचा निकाल व पि॰यानें चद्रीला दिलेला दिलासा हीं हृदयस्पर्शी आहेत.

'बन्सीधर तू आता कुठे रे जाशील ! ' या गोष्टींतील मानसशास्त्र मनाला स्तिमित करून, हृदय पिळवटून काढणारें आहे. कातकऱ्यानें पळवून नेलेला बन्सीधर बापासाठीं घरीं परत येतो, तों बापानें आपल्या आईला घालवून देऊन, तो दुसरीच्या नादात असलेला त्याला दिसतो, म्हणून तो बापाला सोडून आईकडे कलेढोणला जातो, तों ती दुस॰याच एकाच्या सहवासात असलेली त्याला दिसते, म्हणून तो पुन्हा कातकऱ्याकडे परततो, तों कात कऱ्याला शिपायांनी कैद केल्याचें दृश्य त्याला दिसतें. अशा स्थितींत तो व वाचक क्षणभर स्तिमित होतात. तोंच श्री बापूसाहेब एकदम अंत करणाच्या तळमळीनें 'बन्सीधर, तू आता कुठे रे जाशील ! ' असा वात्सल्यपूर्ण प्रश्न करून गोष्ट संपवितात. जणू काहीं त्यांच्या आईच्या गळ्यांतून एकदम फुटलेला तो हुंदकाच ! ही गोष्ट वाचल्यावर काहीं वेळ तरी पुढलें पान उघडवत नाहीं व यातच या गोष्टीच्या यथार्थ सर्व रहस्य साठविलें आहे.

'नायनाक व देवकाई ' याचा किल्ल्याखालीं मळी दिल्याची गोष्ट

अधीच अगावर शहारे आणणारी आहे. फरक इतकाच की, वरील गोष्टींत फक्त वत्सल रस आहे, तर या गोष्टींत भयानक, रौद्र व वत्सल यांचें बेमालुम मिश्रण करून, शेवटीं निरुपद्रवी पोरें किल्ल्याच्या पायांत बळी देऊन हृद-याला पाझर फोडण्यात आला आहे. 'रसाचा रसार' नि 'अस्पृश्याच्या डायरींतील पानें' या गोष्टी खेडेगावातील अस्पृश्यांचें परावलम्बी नि अप-मानाचें निर्णे दर्शविण्यास पुरेशा आहेत. 'सावित्री मुक्यानेंच मेली' ही गोष्ट वाचताना पचवीस तीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील एका सुप्रसिद्ध कटातील लोकांचे व त्यांच्या कुटुंबियांचे कसे धिंडवडे निघाले, यांचें चित्रण डोळ्या-समोर उभे रहातें. सावित्रीचें शेवटचें करुण हृदय तर बघवतच नाहीं!

श्री. नाथूसाहेबांची वाणी रसाळ असून तिला कोणत्याहि रसाचा आवि-ष्कार मोठ्या तन्मयतेनें नि डौलानें करता येतो. शृंगारापासून बीभत्सापर्यंत सर्व रसांचा प्रसंगोचित उपयोग करून त्यांचें साक्षात् मूर्त स्वरूप ते वाचका-पुढें उभे करतात. वीर, करुण आणि शांत या रसांचा उठाव करण्यात त्यांचा हातखंडाच आहे, आणि सर्व रसांत योग्य ठिकाणीं विनोद पेर-ण्याची कला त्यांना साधली आहे. आजन्म जीवनाशीं व त्यात घडणाऱ्या प्रत्येक घटनेशीं प्रामाणिक राहून, त्यांनीं सहृदयतेनें प्रसंग टिपले, त्याचें हें फळ आहे, त्यांचेंच हें प्रभावशाली सामर्थ्य आहे.

या ग्रंथात त्यांनीं आणखी एक गोष्ट केली आहे. यांतील बहुतेक गोष्टी अस्पृश्यांचे जीवनचित्रपट दाखविणाऱ्याच आहेत. 'अस्पृश्योद्धार' हा, त्यांच्या अंगीकृत कार्याचा एक महत्त्वाचा भागच होय. या वर्गाविषयीं सहानुभूति उत्पन्न करण्याचें काम त्यांनीं आजवर केलेंच आहे, पण या गोष्टींच्या रूपानें त्यांनीं हें जागृति करण्याचें लोण सुशिक्षिताच्या स्वयंपाक-घरापर्यंत नेऊन पोचविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. "तमाच्या स्थानमाहात्म्यांत कित्येक सामाजिक असंतोषाचीं बीजें प्रसृत आहेत हें आपल्या समाजाची घटनापद्धति व त्याची आर्थिक स्थिति याचा विचार करणाऱ्याच्या सहज ध्यानीं येईल." (पान ८२) यासारखीं सूचक वाक्यें याचें प्रत्यंतर देतात. त्यांचा हा डाव सामीनें उपकारक होईल.

या पुस्तकाची भाषा ही, नुसतें श्री. बापूसाहेबांचेंच नव्हे, तर मराठीचें वैशिष्ट्य दर्शविणारी आहे. शुद्ध मराठी वळण कसें असतें, रसरट, रांगड्या,

ग्रामीण शब्दांत किती जिवंतपणा असतो, अर्थवान शब्दांच्या पोटीं केवढें सामर्थ्य वसत, नाटकवाडी नावांनीं वाचकाच्या डोळ्यांपुढें साक्षात खेड्याचें चित्र कसें उभें रहातें, स्त्रीच्या तोंडीं नेमकेपणानें निघालेल्या शिव्या कशा शोभून दिसतात, पोवाड्यातील शब्द ऐकतांना जवळचे वा वाटतात, किंवा कोणते शब्द उच्चारले म्हणजे आपण त्यांच्याजवळ जातों, हें पहावयाचें असल्यास, या किंवा असल्या भाषेचा अभ्यास करावा म्हणजे समजेल. श्री बापूसाहेबांनीं भाषा कमावण्यासाठीं कसे कसे श्रम घेतले आहेत, हें पहावयाचें असल्यास त्यांनीं प्रथम 'मुरारराव जीवनातील' एक प्रसंग करून तो फर्ग्युसन कॉलेजमध्यें विद्यार्थिवर्गापुढें कांहीं वर्षांमागें वाचून दाखविला होता, त्या दिवसापर्यंत मागें जावें लागेल. आजचें त्यांचें सुयश हें त्या प्रयत्नाचें फळ आहे प्रसंगानुरूप स्वपरिपोष करतांना, चाटक, शिडगाप, खाणावा, ढवरा, अलाप, स्त्रियांनीं दाखवले घोसदार शब्द, चेहरा रापला, गोफणींतून दगडी गोळीबार केला, पिरगळा मारला, कालवा माजला, पोटांत उन उन वाटलें, यासारखे प्रभावी प्रयोग, किंवा त्याच्या (वन्सीधरच्या) अंगाची ओढ लाव सरण्याची आहे, उथळेपणा, उपसून वर जाय, तालेवार आमाला कुलीनर घालतो, याना जल्दीनें फुट लागली, विषादकारक खडकांतहि एखादा बारीक पाझर वाहत असतो, तुला काय वाटलं मी वामनीनाथिमनीन हाइ, त्यालीं मान घालून मुकाट ऐकून घ्यायला? तू सती मोहरान ढवरलेल्या आम्रवृक्षासारखी आहेस, पन् या कनूस आलीं तर एखाद गळतरा, पक्षराजराला कोंबड्यासारखी मान झुकवू लागला, पाण्याच्या आधीं वळण बांधलेलें असावं म्हणतात, असलीं सुंदर बांधेसूद वाक्यें किती परिणाम करतात, हें वाचकांनीं मुळांतूनच वाचावें त्यांनीं "पीठीका, पॉश्वर, पोरसुधारसस्या, सरकोर" यासारखी कांहीं नवीन नाणींहि पाडलीं आहेत त्यांच्या उपमा हृदयाला जाऊन भिडणाऱ्या आहेत, त्यांचे संवाद मुकयाला बोलके करणारे आहेत, त्यांचीं वर्णनें वाचकाच्या मनाची सर्वस्वीं पकड घेणारीं आहेत, त्यांची पात्रांना गोष्टीच्या रंगभूमीवर आणण्याची कला विलक्षण परिणाम करणारी आहे, त्यांचीं पात्रें बोलतांना निरनिराळे हातवारे, चाळे करतात, त्यांचीं वर्णनें रेखीव व विनोदी आहेत दोषच काढावयाचा म्हटल्यास कांहीं गोष्टींच्या शेवटीं येणारें तत्त्वज्ञान

अस्थानी वाटतें व कांहीं गोष्टींचीं शीर्षकें लांबच लांब वाटतात. मी तरी दोन गोष्टींना 'गोड निराशा' व 'काळझोप' अशी नावें दिलीं असतीं. पण हें सोडतरास, पुरंदरचें वर्णन (पा. २७), तारळखोऱ्याचा उतरता प्रदेश (पा. ४२-४३), पलीस पडलेल्या इन्या रामोशयाचा फड (पा. ५२), सईच्या (सतीच्या) दिव्या (पा. ६०), मनोराज्याची व राज्याची तुलना (पा. १२९-१३१) नायनाकाचा बळी (पा. १५५), इद्रायणीच्या वाळवंटात (पा. १७१ १७४) हे उतारे मराठी गद्य वाङ्मयात उत्कृष्ट नि प्रतिभासम्पन्न लेखणीनें प्रसविलेले, म्हणून चिरकाल समजले जतील. पुस्तक संपताना, ते संपत आलें म्हणून वाईट वाटतें, व हीच त्याच्या संपूर्ण यशस्वितेची खूण आहे.

ज्याना आपल्या मुलाबाळांना आपली संस्कृति द्यावयाची आहे, नि त्याना परकीयाना मराठी भाषेची थोरवी पटवून द्यावयाची आहे, त्यानीं वेळाशक हें पुस्तक त्याच्यापुढें टाकावें, व काय चमत्कार होतो तो पहावा. मात्र ती मुलें, 'उपेक्षिताचे अंतरंग" वाचू लागलीं कीं, श्री. बापूसाहेबानीं पुढलें पुस्तक लिहिण्यास हातीं घ्यावें. क्षणाचाहि विलंब करूं नये.

---

## प्रा. माटे यांची भाषा शैली : : १७

गोपीनाथ तळवलकर, बं. आनंद

'रत्नाकर' च्या ऐन उत्कर्षाच्या काळातली गोष्ट आहे. आम्ही कांहीं साहित्य-प्रेमी कुमार एका कलावंत व रसिक मित्राच्या घरीं जमलों होतों. 'रत्नाकर' च्या अंकातील कांहीं मजकूर वाचून तो मित्र इतका तल्लीन झाला होता कीं, आमच्यासारख्या समानधर्मी स्नेह्यांना तो मजकूर वाचून

दाखविल्याशिवाय त्यांच्या मनांतली कलात्मक तळमळ शांत होईलसें त्याला वाटेना. आणि प्रस्तावादाखल चार शब्द बोलून लगेच अस्खलित व भावपूर्ण वाणीनें तो वाचूं लागलाः—

"...इतक्यांत एकानें त्याचा (सीझरचा) झगा हिसकला, व ही खूण मिळतांच ते सर्व कटवाले आपल्या सुऱ्या घेऊन त्याच्यावर धावले. त्यांत पुत्रवत् मानलेला ब्रूटसहि होता. 'अरे ब्रूटस् तूंहि ! (उल्टल्यूस)' असें तो खेदानें गद्‌गदून म्हणाला आणि आपल्या झग्याच्या पदरानें त्यानें आपलें तोंड झांकून घेतलें. एवढ्यांत त्याला वीस-तीस जखमा झाल्या. खालीं रक्ताचें थारोळें झालें आणि हा उमदा नरमणि, हा रणांगणावरचा व्याघ्र, हा लोकांचा कैवारी, हा विद्येचा व्यासंगी, हा पंडितांचा परामर्शी, हा मानव जातीचा प्रगल्भ प्रतिनिधी, मान लटकी पडून, गतप्राण होऊन खालीं कोसळला. ही गोष्ट ख्रिस्तीं शकापूर्वी ४४ वे वर्षी घडली."

वाचन संपतांच आम्ही कांहीं वेळ स्तब्ध होतों ! कुणीच कुणाशीं बोलत नव्हतें ! इतका या ९—१० ओळींचा परिणाम आमच्यावर झाला होता. जणूं तें भीषण दृश्य आतांच आपणांपुढें होऊन गेलें असें आम्हांस वाटत होतें ! आणि नंतर शांततेचा भंग झाला तो लेखकांच्या स्तुतिपर एक प्रकारें वृंदगीतच सुरू झालें !

वरील अवतरणचिन्हांकित परिच्छेदांतील प्रो. श्रीपाद महादेव माटे, यांच्या लेखनशैलीचे जे जे गुणप्रकार झाले आहेत, त्याला मी लालित्यच म्हणतों; माझी प्रा. माटे यांच्याशीं पहिली वाङ्मयीन ओळख झाली, ती त्यांच्या ललितलेखनानेंच झाली आहे व वर वर्णिलेल्या प्रसंगापूर्वी शालेय जीवनाच्या मध्यावर.—

"ऊठ अहल्ये ! प्रभात झाली राम वनीं आला"

ही प्रो. माट्यांची भूपाळी माझ्या वाचनांत आली. ही ओळ तर अजूनहि मला एका निर्मळ व शांत वातावरणांत नेऊन सोडते. ही भूपाळी किंवा वरील सीझरच्या मृत्यूसारखें प्रसंगचित्र यांत प्रो. माटे यांचें ललितलेखनकौशल्यच प्रकट झालें आहे नाहीं तर काय ! आणि म्हणून 'अलीकडे' त्यांना ललितलेखनाचें तंत्र अवगत झालें आहे असें जेव्हां लोक म्हणतात, ( आणि खुद्द लेखकहि सौजन्यपूर्वक तसाच समज करून घेतात )

तेव्हा मी त्यांना कडाडून विरोध करतों. प्रो. माटे यांच्या लेखणींत ललित-गुण हे पहिल्यापासूनच आहेत. ललितवाङ्मयाचे जे स्थूल व लोकप्रिय प्रकार आहेत त्यांकडे त्यांनीं आपली लेखणी अलीकडे वळविली असें फार तर म्हणता येईल.

'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' या प्रो. माटे यांच्या पुस्तकांतील 'सीझर' हें प्रकरण रत्नाकरांत प्रथम वाचलें तेव्हां त्याच्यातील सामर्थ्याचा परिणाम कसा झाला हें वर दाखविलेंच आहे. संस्कारक्षम वयांत चिकित्सा बेताचीच होती. पण एक 'अपूर्व वस्तु' निर्माण झालेली पाहण्याचा आनंद आम्हांला त्या चरित्रांतील वरील परिच्छेदानें मिळवून दिला होता. त्या आनंदाचें रहस्य आता आम्हांला पूर्ण जाणिवेनें लक्षांत येतें. मूळ कथाविषय भव्य, वर्णनांत 'शब्द थोडे' 'अर्थ फार', एकंदर क्रूर दृश्याला ब्रूटसविषयीं सीझरला वाट-णाऱ्या ममत्वाची पार्श्वभूमि व त्यामुळें उत्पन्न झालेली उदात्तता, सीझरला दिलेल्या विशेषणांचा चढता क्रम व त्यांतली व्यवस्थितता, सर्व खळबळीच्या वर्णनाला परिणामकारक पूर्णविराम देणारें शेवटचें वाक्य ह्० या परिच्छेदा तल्या तंत्राचीं वैशिष्ट्यें आता कळून येतात. हीं वैशिष्ट्यें हीं प्रो. माटे यांच्या या लेखनकलेची गुणसंपदा आहे.

कित्येकदां लेखकांना लिखाणांत रंग भरायला फार वेळ लागतो. आजू-बाजूंचें आवार दाखवीत ते इतका पसारा मांडतात कीं, त्यांना मूळ रहस्या-पर्यंत यायला उशीर होतो आणि मग वाचकाची उत्सुकता कोमेजून जाते. कित्येक गवयांचा आवाज जसा जलशाच्या मध्यापर्यंत लागतच नाहीं तसें हें होतें. साहजिकच सामान्य वाचक अशा लेखकाच्या लिखाणाचें परतीर न गांठता तसेच परततात. प्रो. माटे यांच्या अगदीं उलट आहेत. उत्तम क्रिकेट-पटू क्रीडांगणावर येताच पहिला सफाईदार टोला मारतो, त्यांतच त्याच्या कलेचे सर्व हृदयंगम विशेष प्रकट होतात आणि त्यायोगें उत्सुक प्रेक्षकवृंद पुढचा क्रीडाविलास पाहायला मोठ्या उत्साहानें सावरून बसतो. प्रो. माटे यांच्या लिखाणांत अगदीं सलामीचे परिच्छेदच मुळीं चटकन् माणसाचें मन आकृष्ट करून घेतात. मग तें लिखाण "सावित्री मुक्यानेंच मेली" अशी एखादी करुण कथा असो किंवा ऐतिहासिक पोवाड्याच्या परीक्षणावरला गंभीर प्रबंध असो.

"केसरीनें दोन गोष्टी केल्या"

'केसरी'च्या अर्धशतकाच्या मदनीय कामगिरीचा परिचय महाराष्ट्राला करून देतांना हें पहिलें वाक्य टाकून प्रा माटे यांनी एकदम वाचकांना विषयाच्या मध्यधारेंतच आणून सोडलें आहे प्रवाह चांगला खोल असला म्हणजे काठावर थापटण्याची भीति नसते प्रो माटे हे वाचकाला मध्यावर सोडल्या विषय मध्य व खोल आहे हें पाहूनच सोडतात, पण ते काठाकाठानें नेवोत किंवा एकदम मध्यावर नेवोत रससिद्धीशीं वाचकाला हातकळत बसावें लागत नाहीं

मध्यतेकडे नैसर्गिक ओढ हें त्यांच्या शैलीचें एक हृदयंगम मर्म आहे "उत्कृष्ट आणि भव्य तेंचि घ्या" हा त्यांच्या प्रतिभेला ध्यास आहे

"तेजस सपदि राशिरुत्थित
प्रादुरास किल वाहिनीमुख"

अशा त्या जयद्विजयी परशुरामाच्या पराक्रम व दिव्य विभूतिमत्त्वानें मोहित होऊनच प्रा माटे हे परशुराम चरित्राचे धागदोरे शोधण्यास आणि तदनुषंगानें पूर्व मानव समाजाच्या संसाराचा विचार करण्यास प्रवृत्त झाले असावेत असें मला कित्येकदा वाटतें विमान जसें काहीं वेळ भूतलावर चालून झटकन् अंतराळीं झेप घेतें, तद्वत् प्रा माटे ह्यांच्या वाङ्मयात सामान्यावरून असामान्याकडे झपाट्यानें जाण्याची प्रवृत्ति नेहमी आढळून येते 'पहिला बळी' हा त्यांचा हृदयंगम लेख पहा किंवा मानवतेच्या चांगुलपणाची बेरीजच अशा त्या शब्दसृष्टीच्या ईश्वरावर (ज्ञानेश्वरावर) त्यांनी लिहिलेला 'अजानवृक्षाच्या छायेखालीं' हा अनन्यसाधारण लेख पहा शिवाय शब्दसंहतीचा आणि भव्य कल्पनांचा विलास पाहावयाचा असल्यास पुढील एकच उतारा पहा —

खुद्द विधात्यानेंसुद्धा ही कलात्मकता चालवून हें विश्व वाङ्मय कसें लिहिलें आहे पहा ! त्यानें किती अलंकार साधले आहेत आणि किती विविध प्रकारच्या रचना केल्या आहेत ! कोकिळा, शुकसारिका आणि कदाचित् अभिसारिका यांच्या ठिकाणीं मादकयुक्त शब्दयोजना केली आहे, मेघमंडलातून किंवा गिरिगव्हरांतून तो मोठे मंद्र ध्वनि उठवितो, मोर, चातकी आणि मदालस स्त्री यांच्या ठिकाणीं त्यानें पदलालित्य साधलें आहे, ग्रीष्म ऋतूंतील मेघांच्या

मुखानें त्यानें अतिशयोक्ति वदविली आहे; सूर्य व रात्र त्याची गाठ पडूं न देण्याच्या मिषानें असंगति केली आहे; स्वत:च्या अनेक कृति क्षणभंगुर ठरवून दृष्टान्ताची योजनाही त्यानें केली आहे; युगानुयुग आसनस्थ असलेल्या विंध्याकडून त्यानें समाधी लाविली आहे; हिमालयाच्या कमरेभोंवतीं त्यानें शुभ्र परिकर बांधला आहे; समुद्राच्या पृष्ठावर एका मागें एक गर्जत धांवणाऱ्या लाटांकडून त्यानें अनुप्रास केले आहेत; देवकोटी, मानवकोटी, पशुकोटी अशा अनेक कोट्या त्यानें केल्या आहेत; वारे, ढग याच्या मार्गावर विंध्य, सह्य यांच्यासारखे विस्तीर्ण प्रबंध त्यानें रचले आहेत; समुद्रांत जोरजोरानें घुसूं पाहाणाऱ्या भूमीला कन्याकुमारीसारखें अनेक अलम्-कार त्यानें घडविले आहेत. आकाश-मंदिरांत लक्षावधि दीपक त्यानें लावले आहेत, दऱ्या-खोऱ्यांत माजलेल्या वेलवेलींचे श्लेष करून टाकले आहेत; ध्वनीची अक्षर स्थापना केली आहे; सागराच्या पोटांत खोल अर्थ ठेविले आहेत, आकाशाच्या मनांत त्यानें नव-मद स्थिर केले आहेत आणि गंगा-यमुना पासून कावेरी-ताम्रपर्णीपर्यंत सहस्रावधि रसवाहिन्या वहात ठेविल्या आहेत.—

शब्दाच्या उपयोगाच्या बाबतींत समृद्धि आणि औचित्य या दोन गोष्टी प्रो. माटे यांनी फार मोठ्या प्रमाणात साध्य करून घेतल्या आहेत. 'खारासिरी', 'बदबद', 'तुरमुंडी' 'स्तवक', 'बावर', 'वैचारिक', 'टावकं' इ. म्हणजे प्रा. माटे यांचे समजले जाणारे शब्द एकेकटे भेटले किंवा कोठेंच एकाकी पडलेले आढळले म्हणजे फारसे परिणामकारक वाटत नाहींत. पण माटे त्यांना आपल्या लेखनांत अशा कांहीं जागीं ठेवतात कीं, त्यांना डौल व सामर्थ्य एकदमच प्राप्त होतें. "नक्रः स्वस्थानमासाद्य गजेंद्रमपि कर्षति" हा न्याय शब्दसिद्धीचे बाबतींत विशेष लागूं पडतो. साध्या श्रेष्ठांशाच्या तुकड्याभोंवतीं तारेच्या माध्यमातून विजेचा प्रवाह सोडला तर त्या लोखंडाचें लोहचुंबक होतें तसेंच शब्दांचें आहे. सामर्थ्यवान् कल्पनांच्या सान्निध्यांत शब्दहि चैतन्यमय व बलशाली बनतात. प्रा. माटे यांचें या बाबतींतले यश नामवंत भाषप्रभूंनी हेवा करण्यासारखें आहे.

गोचरवर्णन हें प्रा. माटे यांच्या भाषाशैलीचें एक फारच महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणून सांगितलें जाईल. उत्कृष्ट कलावंताचें हें वैशिष्ट्य असतेंच.

गूढ विषयातलें महान् रहस्य, आणि साध्या विषयातले गमतीदार वैशिष्ट्य आपल्या कला–माध्यमानें इंद्रियगोचर करणें हें कलावताचें काम असतें.

" अवकाशाच्या ओसाडीतिल
पडसाद मुके जे आजवरी
होतील ते वाचाल सत्वरी "

हे केशवसुतानी काढलेले उद्गार याच कलावंताच्या सामर्थ्यानें स्वरूप दाख निणारे आहेत. जें आपणाला कळतें, अनुभवाला येतें पण व्यक्त करता येत नाहीं तें स्पष्ट व इंद्रियगोचर (Graphic) असें शब्दरूप घेऊन आलेलें पाहिलें कीं वाचक संतोषपूर्वक उद्गारतो

What oft was thought but never so well expressed '

प्रा. माटे यांचें वाङ्मय वाचताना वाचक पदोपदीं असे उद्गार काढील. सामान्यपणें 'तेलाच्या खाणी' किंवा 'तेलाच्या विहिरी' हे शब्द लोक वापरतात पण प्रा. माटे 'तेलाचीं कुडें' म्हणतील! हा प्रयोग अर्थातच अधिक समर्पक व मूळ वस्तूचें चित्र डोळ्यासमोर उभें करणारा आहे. तो उन्हानें काळवंडला होता, असें न म्हणता प्रा. माटे 'तो उन्हानें, चांगलाच रापला होता' असें घसघशीत वर्णन देतील 'जीवनाची पडझड' 'अपमानाचा दंश' 'स्वयंभू बळ' हे व असे अगणित प्रयोग प्रा. माटे यांच्या वाङ्मयांत आढळतात. या साध्याच प्रयोगानीं अस्पष्ट कल्पनाना आकार येतो.

पण या साऱ्या कल्पनांना काव्यमयतेचें आलवाल असतें हें विसरता कामा नये. उदोवद्.काव्याचे प्रा माटे मोठे आग्रही कैपक्षी नसतील किंवा 'गद्य कवीना निकष वदान्ती" असें प्राजलपणें त्याना वाटत असेल, पण प्रयमत छंदाच्या मृत्तिकाकुभात भरून ठेवलेलें काव्य त्याच्या गद्यात पाझरून आलें आहे यांत शका नाहीं. 'अस्पृश्याचा प्रश्न' यासारख्या समाजशास्त्रीय प्रयातहि हें प्रत्ययाला येतें इतक्या रमणीय मापाशैलीनें नटलेला समाजशास्त्रीय ग्रंथ वाचायला मिळणें हें सामान्य मराठी वाचकाचें भाग्यच म्हटलें पाहिजे.

प्रा. माटे, याच्या मार्फत मन पूर्वकता आणि घरगुतीपणा याचा मनोज्ञ आढळ नेहमींच होतो. Personal essay [ गुजगोष्ट ] म्हणून लघु-निबंधाचा जो पाश्चात्य प्रकार आपणाकडे रूढ झाला आहे, त्यात या गुणाची

मातब्बरी फार असते. जीवनाविषयींचें निश्चित तत्त्वज्ञान व अनुभवसंपन्नता यांच्या अभावीं मराठींतल्या कित्येक लेखकांनीं या प्रकाराची फार कुतर-ओढ केली आहे! जीवनाच्या राजमार्गाचे जरा बाजूस पडलेलीं साधीं तत्त्वें व प्रमेयें अगदीं सहज रीतीनें शोधून वाचकाच्या हातीं देणें हें या वाङ्मय-प्रकाराचें खरें मर्म होय. कागदाचा चेंडू पाण्यांत टाकल्यावर जसा हळू हळू उलगडत जातो तसा मुख्य विषय हळू हळूं विशद होत जावा असें या वाङ्मय-प्रकाराचें स्वरूप आहे. ओसरीवर बसून शिळोप्याचे वेळीं घरगुती-पणानें एकादा प्रौढ माणूस जीवनाचे सिद्धांत अगदीं सोप्याव रजक भाषेंत कनिष्ठांना सांगतो तसें लघुनिबंधकाराचें काम असतें. या निवेदनांत जिव्हाळा असला म्हणजे झालें. मग त्यांत एकाद्या सर्वमान्य सत्याला बगल देऊन कांहीं नवेंच प्रमेय मांडलेलें असो, एकाद्या घटनेचे धागेदोरे उकललेले असोत, किंवा एकाद्या गोष्टीचें अगदीं वेगळ्या कोनांतें घेतलेलें छायाचित्र असो. व्यक्तिशः मला प्रा. माटे, यांचे निबंध या साऱ्या कसोटींना उतर-तील अशी खात्री वाटते. 'गुण्या गोविंद आणि जनता जनार्दन,' 'कसली रे मेल्या सहानुभूति!' 'लहान लहान वशीकरणें,' हे त्यांचे लेख हे गुजगोष्टींचीं उत्कृष्ट उदाहरणें म्हणून दाखविता येतील. गुजगोष्टीचा ऐवज घेऊन काव्यमय प्रबंधाच्या प्रांतात वढती मिळविणारेहि कित्येक लेख प्रा. माटे यांच्या विपुल वाङ्मयांत दाखविता येतील. 'अजान वृक्षाच्या छाये-खालीं' हा अलीकडे प्रसिद्ध झालेला त्याचा लेख असाच अग्रपद पावेल. या लेखाच्या अगदीं पहिल्या वाचनाचे वेळीं ज्या उंच पातळीवर मी गेलों तेथेंच पुन पुन वाचन केलें तरी तितक्या वेळा पोंचू शकतों असा माझा अनु भव आहे.

इतक्या सुढाळ, चैतन्यमय, मार्मिक, टोंकदार आणि वैशिष्ट्यपूर्ण भाषा शैलीचें तेज नेत्रांना आल्हाददायक वाटत असलें तरी तिचे सूक्ष्म पैलू हुडकून काढणें फार कठीण आहे. पण त्याहूनही इतकी हृदयंगम भाषाशैली प्राप्त करून घेण्यास प्रो. माटे यांनीं कोणती उग्र साधना केली ह्याचा अदाज घेणें फार अवघड आहे. कारण त्या साधनेंतलीं मतें अत्यंत सूक्ष्म व गहन असतात. पण वाङ्मयाच्या अभ्यासकांनीं तीं समजून घेणें अवश्यहि आहे. यांन इग्रजीच्या अध्ययनाचा मोठा घाटा घेतो त्याप्रमाणें 'ऱ्हा येळा नोबेल

प्राइस मिळविण्याची योग्यता आहे ‘त्या देहामध्ये वेड्याचा’ व ह्याच आशयाशी मतागतांच्या वाङ्मयाचा शब्द अभ्यासहि येतो. आणखी त्या प्रमाणांत पाहतां, त्या भूप्रदेशांत पावलोपावली लोकांची संस्कृति, आचार-आचारविचार, छंद, मतानुष्ठानें इ० ची वास्तविक माहिती ही देखील या रस-सिद्धीच्या साधनांतलें एक साधन आहे.

“ पुढां स्नेह पाझरे ।
मागां धांवती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे ।
कृपा आधीं ॥ ”

हें ज्ञानेश्वर महाराजांनी केलेलें वर्णन केवळ अलौकिक साधुपुरुषांनाच नव्हे तर कलावंतांनाहि लागू आहे. या अंगभूत सहृदयतेवांचून अशी भाषा-शैली केवळ अशक्य आहे. या सहृदयतेतूनच, मला जें जाणवलें तें मी जगाला सांगेन अशी तळमळ निर्माण होते आणि वाङ्मयाला लावण्य येतें. जीवनाच्या सेवेत भाष्यकार व सुधारक अशी जोड भूमिका तन्मयतेनें त्याला साधेल तोच अशी भाषा लिहूं शकेल. आपणांला वाटेल तें प्रांजलपणें सांगणारे पुष्कळ असतात, आपणांला वाटलें नाहीं तेंहि सुंदरपणें सांगण्याची नकली कलाहि कित्येकांना साध्य असते ! पण आपणाला जें प्रतीत झालें तें तितक्याच सुंदरतेनें शब्दांत मांडून आपल्या वाचकांबरोबर साक्षात्काराचा आनंद समाईकपणें लुटणारे जे साहित्यकार असतात त्यांनाच खरी रमणीय भाषाशैली साधते. प्रा. माटे हे अशा कृतार्थ शैलीकारांतल्या पहिल्या श्रेणीत सहज बसूं शकतील, यांत शंका नाहीं.

— —

# 'साहित्यधारा' : : : १८

प्रो. ग. भा. निरंतर, एम्. ए.

'उंच' 'उंची' हे श्री. बापूसाहेबांच्या आवडत्या शब्दांपैकीं दोन शब्द आहेत. 'माणस उंच झाली पाहिजेत' हे वाक्य ते उच्चारतात त्या वेळीं उंच शब्द उच्चारताना त्यांचे डोळे जरा विस्फारित होतात, आणि हात न कळत वर जातात. 'उंच' या शब्दानें त्यांना कोणती भावना व्यक्त करावयाची असते ते त्यांच्या तोंडून त्या शब्दाचा उच्चार ऐकल्याखेरीज कळावयाचें नाहीं. त्यांच्या तोंडून हा शब्द ऐकल्यापासून आणि वारंवार ऐकल्यापासून त्या शब्दानें माझ्या मनांत तरी काहीं निराळीच भावना जागृत होते. 'सगळं काहीं उंच असावयास पाहिजे !' त्यांच्या वतीनें त्यांचा म्हणून मजजवळ कोणी संदेश मागितला तर मी एवढेंच लिहीन ' आपली उंची वाढवा '

उंचीचें असें काहीं विलक्षण आकर्षण श्री. बापूसाहेबांना आहे. कोणत्याहि प्रकारच्या खुजेपणाचा त्यांना भयंकर तिरस्कार वाटतो. मग तो खुजेपणा मनाचा असो, वृत्तीचा असो, वस्तूचा असो वा एखाद्या प्रथाचा असो .

साहित्याविषयीं त्यांनीं जे विचार व्यक्त केले आहेत त्यांतहि मला ही उंचीचीच तळमळ दिसते. रामदासाविषयीं त्यांना विलक्षण आकर्षण आहे. कारण रामदास हा एक उंच माणूस होऊन गेला, त्यांच्या मनांत काहीं एक भव्य आकांक्षा होती. ती भव्य आकांक्षा लोकांच्या डोक्यावरून गेली आणि त्यामुळें, रामदासासारखा उंच माणूस अहोरात्र टाहो फोडीत असतां भोंवता-लचीं माणसें मात्र खुजींच राहिलीं ! 'आपण आपले पामर, कशाचा संसार नि कशाचे जीवित' असेंच ती कुरकुरत राहिलीं, या वृत्तीचा श्री. बापूसाहेबांनीं कडकडून निषेध केला आहे.

बापूसाहेबांच्या अर्थानें जीवित उंच करावयाचें म्हणजे जीविताविषयीं अतिशय आस्था बाळगून, तें मोठ्या हौशीनें जगत राहिलें पाहिजे. तें डौलदार करण्याची हाव बाळगली पाहिजे. त्याला थाट देण्यासाठीं पडतील तेवढे कष्ट केले पाहिजेत.

जीविताबद्दल अशी हौस वाटायची असेल तर आपली बैठकच बदलली पाहिजे. जीवितास गुजेपणा आणणाऱ्या गोष्टींच्या गुणागुणा बरोबर कळल्या पाहिजेत आणि आपल्याला दडपून टाकूं पाहणाऱ्या घटनांच्या अंगावर धांवून जाऊन त्यांना पिटाळलें पाहिजे. जीविताची कोणत्याहि कारणानें होणारी अवहेलना पाहिली कीं, बापूसाहेबांना विलक्षण संताप येतो. हा संताप त्यांच्या वाणींत जितक्या प्रभावानें व्यक्त होतो तितक्याच प्रभावानें लेखणींतहि व्यक्त होतो. शिक्षक म्हणून त्यांनीं बरींच वर्षे काम केलें आहे. आणि तेंहि बहुसंख्य शिक्षकाप्रमाणें ! मला वाटतें ते कधीं मुख्याध्यापक झाले नाहींत आणि तें अगदीं बरोबरच आहे. शिक्षकाच्या जीवनाबद्दलचे त्यांचे विचार वाचले कीं, अशा माणसाला मुख्याध्यापक करण्याचें धाडस कोण करील ? शिक्षकानें स्वार्थत्याग करून आपलें जीवित पावन करावें असें ते समारंभांतमुद्धा मांगूं शकणार नाहींत. उलट शिक्षकाला ते अगदीं हितगुज म्हणून सांगतील कीं, शिक्षणाचें काम सरकारनें लोकांवर सोपविण्याचा डाव रचला आहे. तेव्हां स्वार्थत्यागापासून सावध व्हा ! शिक्षकास स्वार्थत्यागाच्या व्यसनांत अडकवून बेसावधपणें त्याला राबविण्याचा आणि शेवटीं संसारासह नागविण्याचा भयंकर प्रकार महाराष्ट्रांत रूढ झाला आहे. त्या रूढीचें, त्या बुवाबाजीचें भयंकर स्वरूप या ग्रंथातील लेखांत जळजळीत भाषेत व्यक्त झालें आहे. शिक्षकांच्या व्यवसायांत चांगलीं चांगलीं तरणीताठीं माणसें खर्ची होत आहेत. परंतु हें सगळें डोळ्यांसमोर वर्षानुवर्षे चालू असूनहि त्याला आळा बसत नाहीं. याबद्दलचें तीव्र दुःखहि याच लेखांत व्यक्त झालें आहे. संस्थारूपी यंत्रापुढें मोठा घडाडीचा माणूसहि हतबल होतो. तेव्हां अशा माणसांना जगावें कसें हें सांगणें म्हणजे त्यांच्या दुःखावर डागण्या देण्यासारखेंच आहे ! बापूसाहेबांनीं त्याला ' मरावें केव्हां ' हें सांगितलें आहे ! " पंचवीस वर्षे पुरीं होतांच किंवा पंचावन वर्षे वय होतांच शिक्षकानें मरावें ! त्याला काहीं खास मेहेरबानगी म्हणून साहेबानें पुढें ठेवून घेतलेंच तर गोष्ट निराळी; मग त्यानें मरणाचा बेत थोडा तहकूब करावा. पण असें भाग्य फार थोड्याच्या नशीबीं असतें. म्हणून वर सांगितल्यापैकीं जो कालावधि जवळ येत असेल त्या सुमारास मरण्यासाठीं तयार व्हावें हें उचित आहे." याचें कारण त्यानंतर जगणें म्हणजे मरणापेक्षांहि भयंकर यातना देणारें जीवन जगणें ! नोकरी संपल्यावर

आपल्या डोळ्यासमोर बायकापोराची वाताहात होत असावी आणि तो तो आपल्या दुर्बलतेची टोचणी वाढत जावी यापेक्षा शिक्षकाच्या निवृत्तीनतरच्या जीवनात काय होणार ? जीवन जगण्याची सूत्रें ज्याच्या हातीं राहिलीं नाहींत त्यानीं निदान मरणाची योग्य वेळ साधण्यासाठीं तरी सावध रहावें असा हा अत्यत कडवट विचार अतिशय उत्कटतेनें बापूसाहेबानीं माडला आहे प्रत्यक्ष शिक्षकाचीं दु खें अनुभवणान्याच्या डोळयातून या लेखानें पाणी काढलें आहे हें मला हि माहीत आहे इतकेंच नव्हे तर व्यवसायाचें नाव बदललें तरी जीवनाची हीच तऱ्हा इतर व्यवसायक्षेत्रात असख्य लोकाना पत्करावी लागली आहे,

मरणाची वेळ साधण्याचें हृ सुख तरी मिळावयाचें असेल तर आधीं त्यानीं आपलें आपल्या व्यवसायाशीं असलेलें नातें बरोबर आळखलं पाहिजे. स्वार्थत्याग, समाजसेवा, ज्ञानदान इत्यादि मोठमोठीं नावें तेथें दिसतात नि ऐकू येतात त्यानीं आपण भाळावून जाऊ नये, आणि बनवले जाऊ नये !

सामाजिक जीवितातलें आपलें स्थान ओळखणें हें सर्वच ज्ञान क्षेत्रात फार महत्त्वाचें आहे व्यक्तीचें, एखाद्या व्यक्तिसमूहाचें, वा वर्गाचें भोंवतालच्या जीवनातील स्थान आहे काय आणि असावें काय हाच विचार बापूसाहेबाच्या लेखनात वा वाङ्मयात अनेक विषयाच्या रूपानें व्यक्त होत असतो आपापलें कर्तृत्व आाण काम बरोबर न कळल्यानें, जाणतपणीं व अजाणतेपणानें या बाबतींत गफलत झाल्यानें जीवन कोठें खुरटलें 'आहे, कोठें मृतप्राय झालें आहे कोठें भलतीकडच वहकलें आहे आणि एकदर समाजाची उची काहीं केल्या वाढत नाहीं !

आपल्या वाङमयाचें आणि वाङ्मयाचा आस्वाद, अपेक्षा, परिणाम इत्यादि गोष्टींचे काहींसें असेंच झालें आहे 'शृगार रसाचा राजा' हा लेख वाचा. त्या रसराजाच्या राज्यातहि एकागीपणा आणि खुजेपणा कसा माजला आहे तें नीट दाखविलें आहे जीवात्म्याला आतून शीतल छायेचा प्रसाद यावा अशी या रसराजाची दानत आहे पण आज झालें आहे काय ? या रसाच्या 'काम विभागातच सगळा काहीं थाटमाट चालला आहे आणि इतर विभागाकडे दुर्लक्ष झाल्यामुळें तेथें किळस आणि कुरटपणा आला आहे प्रेम ही कामाचीच पण धुळधुळीत छाया आहे आणि दोघाच्याहि मनोगताला बापूसाहेबानीं शृगाररस हें नाव दिलें आहे. जीवनाच्या धकाधकीनें माणूस अगदीं कावून

गेला असल्यानें 'प्रेमाचा एखादा दुसरा घुटका घेण्यापलीकडे त्याला कांहीं करताच येत नाहीं, भुकेनें व्याकूळलेला माणूस जसा खाकरा खाऊ लागतो तसें शृंगारातील 'कामा'च्या बाबतींत झालें आहे परंतु असें खाणें म्हणजे अन्नाचें रसग्रहण नव्हे व 'जेवणें' झालें प्रसन्न मनानें षड्रसयुक्त अन्नाचा आस्वाद घेण्याची गोष्ट कांहीं निराळी आहे रसराज शृंगाराच्याच राज्यात जीवनातील रसाची प्राप्ति होते त्या राज्याच्या विस्ताराचें आणि वैभवाचें रसभरित वर्णन करताकरता बापूसाहेबांनीं कामापासून निघून वात्सल्य, बंधुप्रीति आप्तस्वकीयांविषयीं ममत्व, येथपर्यंत आपल्या वाचकास पोहोंचविलें आहे एखाद्या रसविमर्शकाच्या शास्त्रीय दृष्टीनें राजाधिराज शृंगाराचें हें मर्यादातिक्रमणहि ठरेल कोणास ती शृंगाराची गुंडगिरी वाटेल वात्सल्याचा सुभाहि शृंगारात जमा होऊ लागला आणि बंधुप्रीति, ममत्व इत्यादिकांबरोबर त्याची दावण बांधण्यात आली हें पाहून रसव्यवस्थेंत कांहीं गडबड उडून गेल्यासारखें वाटतें हें खरें आहे परंतु ही शास्त्रीय घसघस मान्य करूनहि या लेखाचें आकर्षकत्व कमी ठरत नाहीं शृंगाररसाच्या सामाजिक आविष्कारात गैरव्यवस्था माजल्यामुळें, शृंगाराच्या कामरूपी प्रवेशद्वारापाशींच मज्जाव झाल्यामुळें अतृप्त माणसें समाजास निरनिराळ्या प्रकारें उपद्रवकारक कशीं होतात हाहि भाग यांत निवधान आहे कौटुंबिक जीवनास मुकलेले लोक समाजकंटक होऊन बसतात कोणी आततायी होतो, कोणी माथेफिरू होतो तर कोणी ठिकच्या ठिकाणींच घुटमळून बसतो परंतु कांहीं वेळा ही अतृप्ति कांहीं तरी असामान्य सामर्थ्याच्या रूपानेंहि प्रकट होते कांहीं जीवनास वैतागून विवागी उदार होतात तर कांहीं जीवनाच्या आपुलकीनें जीवनाच्या संरक्षणासाठीं आत्मार्पणास सिद्ध होतात दोघेहि बरोबर पाहिल्यास सारखेच पराक्रमी वाटतात परंतु त्यांच्या पराक्रमाची जात निराळी आहे बापूसाहेबांनीं तें फारच कौशल्यानें दाखविलें आहे

शृंगाररसानुभवाची सामाजिक जीवनात नीट व्यवस्था लावणें हें किती आवश्यक आहे हा विचार या लेखांत सहज एक फेरफटका मारून गेला आहे परंतु त्याच्या ओझरत्या दर्शनानेंहि त्या विचाराची केन्द्रें तरी ऐसपैस गाठ घ्यावी अशी उत्कंठा लागून रहते

हीशी वाङ्मय सेवकानाहि बापूसाहेबांनीं कांहीं सामाजिक विचार या साहित्य-धंरतून सांगितले आहेत. या संदर्भीच्या दोन लेखात एकाच सूत्राचे सोगे इकडे तिकडे सुटलेले दिसतात. तो विचार असा कीं, वाङ्मयसेवकाचें सामाजिक जीवनात स्थान काय ? वाङ्मय-सेवक या ऐसपैस दाल्नात आता बरीच गर्दी झाली आहे. साधुसंताच्या आसपास आता जगदीं सेचाऱ्यांचेच झाली आहे. ज्ञानेश्वर, तुकाराम ही मंडळी या गर्दीत गडप झाल्यानें थोडासा का, चांगलाच गोंधळ माजतो !

आचार आणि विचार यांच्यात संगति असावी ही अपेक्षा आपण सर्वत्रच बाळगतों. परंतु जे आपल्यासमोर कांहीं विशेषत्वानें वावरतात त्यांच्याविषयीं ही अपेक्षा आपण जास्तच बाळगतों. जो दुसऱ्याला कांहीं सांगण्याच्या आवेशानें उभा राहिला त्याचें (बहुदीं आपल्या कल्याणाचें असेंहि) ऐकताना, ऐकणारा मनातल्या मनात विचारू लागतो,हा सांगणारा स्वत काय करतो? या चिकित्सेच समाधानकारक उत्तर सर्वत्र मिळेलच असें नाहीं. एखाद्या तत्त्वानें प्रेरित झालेला 'प्रेषित' आपला आचारविचाराच्या संगतीच्या बाबतींत पूर्ण समाधान करील.मी तर याहि पुढें थोडा जातों. त्याचा सगळा भार विचारप्रवर्तनापेक्षा आचारावर, स्वत. आचरण्यावरच असतो. 'आधीं केलें' आणि जाता जाता जे जे कोणी भेटले त्याना 'मग सांगितलें' असा त्याचा प्रकार असतो. व या प्रकारात आपली संतमंडळी आणि ज्ञानाच्या विविध क्षेत्रातील महोदयहि येतात, पण कलावंत त्याच्यापेक्षा सारा निराळे, कलावंताच्या आणि वरील मंडळींच्या ( ग. म. जोशी यांनीं अशा लोकाना कृतिकवि म्हटले आहे. ) त्या कृतिकवींच्या कृतींचा तोंडावळा दिसावयास सारखा दिसतो. परंतु त्यांच्या जाती निराळ्या. कलावंतहि पहिल्या सदरातल्या लोकांसारखेच बोलतात पण ते त्याचें बोलणं बापूसाहेबांच्या मतें अनुवादासारखें असतें. कलावंताचं कसब 'कसें' सांगण्यावर आहे, मग तो मूळ मजकूर कांहींहि असो, कोणाचाहि असो. तोच सांगण्याचा त्याचा अट्टाहासहि नसेल. व तो हरिदासासारखा आहे. त्याची ' पुराणातली वांगी ' ' पुराणातच ' राहणार ती त्याची कमाई नव्हे. तेव्हा अशा कलावंताच्या कलाकृति वाचताना आपण त्याच्या वैयक्तिक जीवनात पाठपुरावा करूं नये.

असें का घडूं नये? दोन कारणें आहेत. दोन फायदे आहेत. एक असें कीं, तशी हमी कलावंतानें दिलेली नसते. ते हा आपला अपेक्षाभंग झाला आणि आपण तोंडघशीं पडलों तर त्याची जबाबदारी आपल्यावरच पडणार. पुन्हा अशा अपेक्षाभंगाचाच संभव आजकाल फार. दुसरें असें कीं, त्या अपेक्षाभंगानें कलाकृतीच्या आस्वादाचा आनंदहि आपण गमावून बसू. तेव्हां कलावंतावर मेहेरबानगी किंवा दया म्हणून नव्हे तर रसिकांनीं स्वत त्याच सुखासाठीं, 'केवळ कलावत' असेहि कांहीं असतात, हा विवेक करावा. अशा केवळ कलावंताविषयीं बापूसाहेबांना खरोखर काय वाटतें? त्यांच्या मनांत यासंबंधींचें 'गुज' काय असेल? अशा जिज्ञासेनें मी हा लेख पुन्हा एकदा वाचला. अशा केवळ कलावंतांचें स्वरूप आणि अधिकार–मर्यादा सांगताना त्यांनीं कोणतीं उदाहरणें घेतलीं आहेत पहा. वर्तनानें ढिला असलेला हरदास, शुद्ध लफंग्या पण अतिशय सुरेखपणें कांहीं गमती सांगणारा शेकोटीजवळचा शेजारी, पुण्य वस्तूला अगदीं नम्रपणें नमस्कार करणारा पातकी, हे दाखले १–१॥ पानातच येऊन गेले आहेत. (पृ ४४ व ४५) यावरून दोन अनुमानें निघू शकतील. पहिलें असें कीं, कलावंत व्यक्तिश अगदीं लफंग्या, अनाचारी वा पातकी असला तरी त्याची कलाकृति केवळ तेवढ्यानें उपेक्षणीय वा अधिक्षेपणीय ठरत नाहीं. दुसरें असें कीं, प्रेषित अशा दर्जाच्या माणसाच्या दृष्टीनें तुलना केल्यास त्या प्रेषिताच्या विचाराचा कळत वा न कळत अनुवाद करणारे प्रवर्तक यांच्यातलें अंतर तर वरील उदाहरणात व्यक्त झालें नाहीं का?

मोठ्या लोकांचीं खाजगी चरित्रें हा निबंध आता पहा. मोठ्या माणसाच्या मोठेपणाच्या कृतींनीं आपल्या मनावर मोठेपणाचा कांहीं दाब निर्माण झाल्यावर त्यांचीं खाजगी चरित्रें पाहू लागलों तर कित्येक वेळीं पश्चात्तापाचे प्रसंग येतात. या आणि पूर्वीच्या निबंधात ज्या मोठ्या माणसांचे उल्लेख आले आहेत तेवढे वाचूनहि असें होतें. कारण कित्येक वाचक असे असतील कीं, कोलंबस, नेपोलियन हीं मोठीं नावें त्यांनीं ऐकलीं असतील. त्यांच्या मोठेपणाविषयीं त्यांची ठाम समजूत झाली असेल. पण या निबंधात त्यांच्या संबंधींच्या दिलेल्या 'खाजगी बाबी' त्यांना पहिल्यानेंच कळतील आणि मग त्यांच्या मनात कांहीं नसलेल्या रुखरुखी निर्माण होतील! त्या बाबींचा उल्लेख करून

माझा लेख केवळ तेवढ्यानेंहि सुसरुशीत करण किती सोपें आहे ! पण मी तें करीत नाहीं कारण माझा हेतु वाचकाना येथेंच रमविण्याचा नाहीं. त्याना साहित्यधारेकडे नेणें आणि जे पूर्वी जाऊन आले असतील त्याच्याशीं काहीं गुजगोष्टी करणें हा माझा हेतु आहे !

असे पश्चात्तापाचे प्रसग झाल नाहींत, आपण मोठी म्हणून मानलेलीं माणसें सदासर्वकाळ मोठींच राहावींत हें फारच चागलें असल तरी या जगात मानवी जीवनात तसें फारसें घडत नाहीं म्हणून आपण आपल्या आकाक्षा रेतानातानाच्याच ठेवाव्यात ! असा 'प्रापचिक' विचार बापूसाहेबानीं साग‍ितला आहे शेक्सपीअरच्या मर्चंट ऑफ व्हेनिस या नाटकात शायलॉकच्या पात्रान ज्यू जमातीचा जो उपहास झाला आहे तो वाचूनहि बापूसाहेबाना असेंच दु ख झालेलें दिसतें शेक्सपीअरसारखा श्रेष्ठ कलावतहि लोकाच्या हौशीसाठीं विनोदाकरिता त्या थराला जावा याचें बापूसाहेबाना दु खच वाटते शेक्सपीअरच्या बाबतींत 'तो केवळ कलावत आहे' असें म्हणून समाधान कसें होईल ? शायलॉक सबधीचा इतिहास वाचला तर मान शॉंत लॉक पुरतें तरी असेंच म्हणावे लागतें या नाटकाची घडण होत होती त्याच वेळीं ( इ०स०१५९४च्या फेब्रुवारी महिन्यात ) डॉ० लोपेझ नावा च्या ज्यू माणसास राणीवर विषप्रयोग करण्याचा प्रयत्न केल्यावर फाशीं देण्यात आलें फाशीचा सोहळा भर रस्त्यावर ऐन गर्दीत साजरा झाला लोका च्या त्या प्रसगींच्या भावना शेक्सपीअरनें टिपून त्याचें प्रतिबिंब नाटकात वठविलें, असा एक वृत्तात माझ्या वाचनात आला तो वाचल्यावर आणि या ग्रथातील लेख वाचल्यावर मग वाटलें शेक्सपीअरकडून येशू खिस्ताच्या दर्जाच्या कार्याची अपेक्षा न केलेली बरी ! पण बापूसाहेबाची सर्वसामान्य बनारहि खरीच नाहीं का ! नाटककार लोकाच्या आहारीं गेला कीं, असा अध पात होतोच !

विनोदासाठींमुद्धा कलाकृतीची उची कमी होऊ नये हा त्याचा आग्रह आहे पण काहीं वेळा असें होतें, समाजातील काहीं व्यक्तींची वा कृतींची उची लोकांना पेलत नाहीं आणि लोक त्या व्यक्तीलाच 'आपणासारिखें' करू लागतात उदाहरणार्थ रामदासांचा प्रापचिकानीं केलेला पराभव पहा ! रामदासाबद्दल बापूसाहेबाना वाटणारा आदर या लेखात

अगदीं उफाळून बाहेर आला आहे आणि तितकाच प्रापंचिकाच्या खुरटे पणाबद्दल, यावळटपणाबद्दल संतापहि व्यक्त झाला आहे प्रपंचाबद्दलची त्याची रसिकता, आस्था, माझ्या रानेश्वरा या लेखांत व्यक्त झालीच आहे तो लेख वाचल्याखेरीज रामदासाबद्दलचा त्याचा भाव नीट कळणार नाहीं आपण प्रापंचिक आहोंत हें अगदीं परमेश्वरासमोर त्यांनीं धिटाईनें सांगितलें आहे प्रपंचासाठींच इतकें विविध आणि सुंदर जग निर्माण झालें नाहीं का? मग त्याचाच निषेध कां करावा? परमेश्वराला तरी हें पसंत पडेल का? ऐहिका वर इतक्या रसिकपणें प्रेम करणारा आपापल्या वाटेनें सुद्धां परमेश्वरापर्यंत पोहोंचावयास कांहीं हरकत नाहीं परंतु परमेश्वराच्या नांवचे म्हणविणार वाटाडे हे भलभलतें सांगतात प्रपंच सोडला नाहीं तर परमेश्वर भेटणार नाहीं असा दमहि देतात म्हणून या भक्तानें थेट राजेश्वराकडेच आपली तक्रार नेली आहे त्याला स्वच्छ सांगतलें आहे कीं, कोणी कांहीं सांगो आम्ही प्रपंचच करणार नीटनेटका करणार आणि तो करीत असतां तुझीं जीं अनेक दर्शनें 'याच देहीं याच डोळां' होतील त्याचा मनमुराद आस्वाद घेणार! या विचाराला टनोरा देणारा एकटा काय तो रामदासच असें बापूसाहेबांना वाटतें

रामदासाच्या कार्याविषयीं ऐतिहासिक संशोधनात जरीपहि कांहीं 'गोल वाली' एकू येते परंतु तें कांहींहि असलें तरी बापूसाहेबांनीं आपल्या मनात रामदासाची जी मूर्ति स्थापिली आहे ती अत्यंत प्रभावी, तेजस्वी आणि भव्य आहे, यांत शंका नाहीं

अशा दैवताच्या उपासकानें जीवनांत सतत सर्व प्रकाराच्या उंचीचाच आग्रह धरावा यांत काय आश्चर्य! त्याच्या लिहिण्यांत आणि भाषणात व्यक्त होणारी ही उंची आणि भव्यता वारंवार दिसावी अशी जबरदस्त उत्सुकता अशा साहित्यधारा निर्माण करीत असतात, हेंच अशा प्रयाचें सामर्थ्य आहे

---

# एका उपेक्षित ग्रंथाचें अंतरंग : : १६

रामचंद्र नारायण नातू, एम्. ए.

प्रा. माटे यांच्या ग्रंथसंपदेंतील एका अतिशय महत्त्वाच्या, अत्युत्तम परंतु अत्यंत उपेक्षित अशा ग्रंथहीरकाचा प्रस्तुत लेखात परिचय करून देण्याचें योजिलें आहे. प्रा. माटे यांच्या लेखणींतून हा ग्रंथ उतरला आहे असें म्हणण्यापेक्षा या ग्रंथात विवेचिलेल्या विचारांनीं आणि उमटलेल्या आचारांनीं प्रा. माटे यांची लेखणी किंबहुना त्यांचें सर्व व्यक्तिमत्व रचविलें आहे असें म्हणणें अधिक यथार्थ ठरेल. प्रत्येक प्रश्नाची अगदीं गर्भगाही, सडेतोड व साग्रोपांग चिकित्सा करण्याची व त्यातही तो प्रश्न सामाजिक दृष्टिकोनातून बघण्याची प्रा माटे यांची संवय या ग्रंथात वर्णन केलेल्या आचारातून व तो आचार शक्य तेवढा निर्दोष व्हावा म्हणून केलेल्या सखोल वाचनातून उद्भवली आहे याची साक्ष आपणास येथें पानोपानीं पटते. ज्या भाषाशैलीबद्दल प्रा. माटे यांचा मुक्तकंठानें गौरव होतो ती भाषाशैलीही या ग्रंथात वर्णन केलेल्या जीवितक्रमाचें समरसतेनें अवलोकन करताना त्यांनीं कमावलेली असावी याची जाणीव हा ग्रंथ बारकाईनें बघितला तर होते. फार काय, प्रा. माटे यांची बुद्धिमत्ता याच ग्रंथात परोपरीनें मांडलेल्या प्रश्नाचा विचार करताकरता परिपक्व झाली असावी आणि सत्याच्या अधिष्ठानामुळें व अकृत्रिमपणामुळं मराठी वाङ्मयात अद्वितीय ठरलेल्या त्यांच्या उपेक्षिताच्या अंतरंगाला इथूनच ते मंजुळ धुमारे फुटले असावे अशी आपली खात्री पटते. ‘अस्पृश्यांचा प्रश्न’ हें त्या ग्रंथाचें नाव।

या परिचयात्मक लेखांचा मथळा सूचक आहे व म्हणूनच तो हेतुपुरस्सर योजिलेला आहे. लेखक या नात्यानें प्रा. माटे यांची ओळख महाराष्ट्रीय विचारवंतांना आज बरींच वर्षे असली तरी सर्व शिक्षित वाचकवर्गापर्यंत त्यांच्या या पदवीचें लोण पोंचविण्याचें कार्य ‘उपेक्षिताच अंतरंग’ या ग्रंथा-

नेंच केलें आहे साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद प्रा. माटे याना मिळवून देण्याला बव्हंशी त्याचा हाच ग्रंथ कारणीभूत झाला आहे असें म्हटल तर त्यात फारशी अतिशयोक्ति होईल असें मला वाटत नाहीं उपेक्षिताचे अतरगाला लाभलेली ही लोकप्रियता यथायोग्यच आहे वाईट येवढेंच वाटतें कीं, हा ग्रंथ इतका सरस उतरावयास कारणीभूत झालेली तपश्चर्या प्रा माटे यानी त्या 'अस्पृष्टाच्या प्रश्ना'त सागितलेली आहे तो ग्रंथ मात्र स्वत च उपेक्षित राहिला आहे तिकड लोकाचें जावें तेवढें लक्ष गेलेलें नाहीं उपेक्षिताच्या अतरगाच्या चहात्याची रसज्ञता खरोखरच अभिनदनीय आह लालित्याच्या किमयागारीनें या उपेक्षित लोकाच्या अतरगाची ओळख करून घेण्याची वाट रसिकाच्या मनात उत्पन्न झाली असेल तर तें ठीकच आहे आता या किमयेनें जागृत झालेली चोकसबुद्धि व सहानुभूति त्यानीं 'अस्पृष्टाचा प्रश्न' वाचताना दाखवावी यतढेंच म्हणतों प्रा माटे याच्या गौरवार्थ निघत अस लेल्या या ग्रथाला लेखानें तें कार्य अल्पस्वल्प प्रमाणात झाल तरी हा लेख लिहिल्याच सार्थक होईल

मात्र लेखाच्या प्रारंभींच एक गोष्ट अगदीं प्राजलपणें सागून टाकणें भाग आहे आणि ती अशी कीं, प्रस्तुत लेखकाला देण्यात आलेल्या स्थलमर्यादेंत या ग्रंथाचा सागोपाग परिचय करून देणें सर्वथैव अशक्य आहे म्हणूनच ग्रंथातील सर्व प्रमेयाचा व सौंदर्याचा परामर्श घेत बसण्यापेक्षा या सर्वांना आधार भूत असलेल्या अशा समाजसुधारणेविषयींच्या प्रा माटे याच्या वैशिष्ट्यपूर्ण विचारसरणीसंबंधींची मुख्यत या ग्रथावरून कळणारी बैठक उकलून दाखविणें येवढेंच या लेखात शक्य आहे अस्पृष्टाच्या प्रश्नावरून कळणाऱ्या प्रा माटे यांच्या या विचारसरणीची ओळख आपणास बरोबर पटली नाहीं तर अस्पृष्टाच्या प्रश्नातील अनेक बारीकसारीक प्रमेयाचा अन्वयार्थ आपणास नीट पणें लागणार नाहीं, इतकेंच नाहीं तर ती कांहींशी परस्परविरोधीही वाटतील, नव्हे या विचारसरणीचें नीटसें आकलन न झाल्यानें सनातनी व सुधारक अशा दोनही पक्षानीं अनुक्रमें 'नाटगा' व 'बुरसटलेला' अशी परस्परविरोधी विशेषणें प्रा माटे याना वेळोवेळीं लावलेंली आहेत म्हणूनच या विचार सरणीची कांहींशा विस्तारानें छाननी करणें येवढेंच ध्येय हा लेख लिहिताना मुख्यत डोळ्यापुढें ठेवलें आहे अस्पृश्यतानिवारणासबंधीं नुसतें काय करावें

येवढेंच प्रा. माटे यांनीं अस्पृश्यांच्या प्रश्नात सांगितलेलें नाहीं तर त्या प्रश्नाच्या मुळाशीं जाऊन व त्यासाठीं कराव्या लागलेल्या अभ्यासानें बनलेलें आपलें मत आजच्या परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्या निकषा वर घासून घेऊन अस्पृश्यता–निवारण का करावें व तें कसें करावं हहीं सांगितलेलें आहे या निन्दी प्रश्नाचीं उत्तरें त्यांनीं समाजसुधारणेविषयीच्या आपल्या या विशिष्ट दृष्टिकोनातूनच दिलीं असल्यानें तीं वाचताना व समजावून घेताना त्या उत्तराच्या मागच्या या दृष्टिकोनाचा विसर न पडणं अत्यावश्यक आहे स्वाभाविकपणच या लेखात 'अस्पृश्यांचा प्रश्न' या ग्रथातील सर्व प्रमेयांनी ओळख सुलासेवार पणानें करून देणें शक्य झालें नाहीं पण हा ग्रंथ कोणती दृष्टि ठेवून वाचावा येवढें सांगता आलें तरी पुरेसं आहे ही विचारसरणी म्हणजे सनातनी व सुधारक या दोन्ही प्रवृत्तींच्या लोकामधील अचिकित्सक व उतावळया व्यक्तीं नीं अपप्रसिद्ध केलेली प्रा माटे यांची सनातनी सुधारकपणाविषयींची कल्पना होय अस्पृश्यांच्या प्रश्नात तर ही विचारसरणी परेच वेळा विस्कळितपणें व विविध नामरूपानीं वावरत असल्यानें तिच्या एकात्मतची जाणीव होणें अधिकच दुरापास्त आहे

परपरेवर अधश्रद्धा ठेवणारे सनातनी व तिच्या सरसकट विनाशाची हुलड उठविणारे नवमतवादी एकच चूक करीत असतात व ती म्हणजे चिकित्सेचा अभाव ही होय संस्कृति संचयातील सर्वच भाग सरसकटपणे त्याज्य नसतो, व नव विचारांतील प्रत्येक विचार सरसकटपणें ग्राह्य नसता कालच्या परिस्थितींतील एका प्रश्नावरचा न्याय हा, ती परिस्थिति बदलल्यानें आज अन्याय ठरतो तर आजच्या परिस्थितींत न्याय्य वाटणारे काहीं सामाजिक संकेत परिस्थिति बदलल्यानें उद्यां अन्याय्य वाटण्याचाहि संभव असतो. म्हणून सर्व जुनें तें सोनें म्हणून उराशीं धरणारे सनातनी व सर्व नवें तें हवें म्हणणारे नवमतवादी हे दोघेही दान टोकांचे आघळे म्हटले पाहिजेत सामाजिक संकेतांतील चूक वाटणारा नगचसा भाग चूक नगन गैरलागू असतो हें सामाजिक कार्यकर्त्यानें सापपत्तिकपणें पण विषय–मिश्रण होऊन देता, प्रचाराची सतत धार धरून मत परिवर्तनपद्धतीनें समाजाच्या गळीं उतरविलें पाहिजे यासाठीं समाजात आज रूढ असलेल्या आचारावर उता वळेपणानें 'बरोबर' किंवा 'चूक' यापैकीं कोठला तरी शिका मारण्यापेक्षां

थान अनिष्ट वाटणारे हे आचार मुळात का प्रचारांत आले असावे याची मीमांसा करणें, त्यांतून निघणाऱ्या कारणांच्या मागील परिस्थितीचें सूक्ष्म व चौफेर अवलोकन करणें, त्यातील कोणता भाग आजही ग्राह्य वाटतो व तो तसा का वाटतो तें पडताळणें आणि क्रमाक्रमानें पूर्ण अवलोकनानें विचारानें व अनुभवानें आपणास प्रतीत झालेलें हें सत्य, त्या सत्याला विपर्यास होऊं न देतां समाजशरीरात कसें भिनेल तेंही, पूर्ण अवलोकनानें, विचारानें व अनुभवानेंच ठरविणें इतकें सत्यारसरूप सामाजिक कार्यकर्त्यानें केलें पाहिजे

अस्पृश्यता-निवारणाचा असा सूक्ष्म व सर्वेक्ष्य विचार 'अस्पृश्यांचा प्रश्न' हेंच ग्रंथ यानें वरवर पाहणाऱ्याना त्यातील अनेक प्रमेयें विसंवादी वाटणे किंबहुना त्यानें मर्म चटकन् न कळणें स्वाभाविक आहे म्हणूनच 'अस्पृश्यतेची उपपत्ति' या प्रकरणात आर्य रक्ताचा अभिमान बाळगणारे व वर्ण-जपणुकीची कल्पना न्याय्य ठरविणारे प्रा माटे 'वर्णकर्म-चिकित्सा' या प्रकरणात त्रैवर्णिक आर्यांचा स्पष्टपणें निषेध करण्यास कसे प्रवृत्त होतात याचें अशा लोकाना नवल वाटेल, तर आपल्या पोराना आवोळी घालणारे व त्याना लिहायला वाचायला शिकवणारे मास्तरजी आपल्या 'बुकांत' खाणाहाराची तरफदारी कसे करतात किंवा 'पर्वती-सत्याग्रह 'च कार्मी आपल्याला ग्रोपवून का घरतात हेंहि काहीं अर्ध शिक्षित अस्पृश्यांना कोडे पडेल परंतु ज्याविषयीं अभिमान बाळगला व ज्याचा निषेध केला ते आर्य लोक एकच असले तरी ज्या कारणास्तव त्याचा अभिमान बाळगला व ज्या कारणानें त्याचा निषेध केला तीं मात्र भिन्न-भिन्न आहेत हें विसरता कामा नये उदा-हरणादाखल कार्मीं विरोधाभासात्मक प्रमेयें पाहिजीं असता वरील विधा-नाचें मर्म तात्काळ ध्यानीं येईल

ज्या वर्ण-जपणुकीविषयीं हिंदु लोकाना इतरांनीं व त्यांच्यांतीलच काहीं मावळ्या सुधारकांनीं 'कोंडी' 'कोंडी' म्हणून हिणविलें आहे, तीच गोष्ट हे इतर लोक कशी तत्परतेने करीत असतात तें प्रा माटे यानीं 'अस्पृश्यतेची उपपत्ति' या प्रकरणात अगदीं सोदाहरण दाखविलें आहे नेटिव लिस्त्या पासून आपण अलग आहों हें दाखविण्याची ॲंग्लो इंडियनाची चाललेली खटपट व यूरोपियनातही दिसून येणारी तीच वांशिक पृथक्त्वाची जाणीव, ज्युविषयन लमावारतचा पारशी धर्मज्ञाचा निर्णय व मुसलमानांतील

अनेक बेटीमद जाती आणि तसेंच महानुभाव, लिंगायत, बौद्ध, जैन, इत्यादि पथानीं जातिभेद नष्ट करण्यासाठीं काढलेल्या मोहिमाचें स्वरूप व परिणाम इत्यादि उदाहरणानीं वश जपणुकीची भावना ही कशी सार्वत्रिक आहे तें दाखवून दिल्यावर ती कशी हितकरही आहे तें प्रा माटे यानीं अमेरिकेच्या उदाहरणानें सिद्ध केल आहे अमेरिकेंत गेलेल्या स्पॅनिश पोर्तुगीज व फ्रेंच दर्यावर्दी लोकानीं तत्रस्थ स्त्रियाशीं संबध केल्यानें निर्माण झालेली त्याची संकरन प्रजा आपली सहचारिणीहि अमेरिकेंत नेणाऱ्या इग्रजाच्या पुढ कशी फिकी पडली हें प्रा. माटे यानीं याच प्रकरणात दाखविल आहे. प्रा माटे लिहितात, ' हें जें या थोर वशीयाच्या भारतींत अजून चालू आहे तेंच निवर्ण हिंदूनीं फार वर्षांपासून चालू ठेविल आहे आपल्या रक्ताला जपण्याची जी तरतूद व दक्षता इग्रजानें अमेरिकेंत ठेवली, तीच हे निवर्ण हिंदुस्थानात ठेवीत आले आहेत पारसी ज्या भयानें इतरापासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करीत आहेत त्याच भयानें निवर्ण हिंदूही कित्येक शतकें शान्त यत्न करीत आले आहेत मग त्यानाच येवढा दोष देण्याच कारण काय ? ज सर्व जग वास लागू तें यानीं आचरिलें म्हणून याना दोषी ठरवावयाचा हा डाव प्रथम युरोपियन पाद्री लोकानीं व मग इग्रज अमलदारानीं सुरू केला व त्याचें ऐकून व त्याचें बुद्धिवैभव पाहून आमच्या सुधारकानीं निनचनक्मपणे गळयात घेतला !

पण वश जपणुकीच्या कल्पनेस याप्रमाणें प्रा माटे यानीं सार्वत्रिक व न्याय्यही ठरविलें असलें तरी सनातन वर्ण कर्म चिकित्सा मात्र प्रा माटे याना बिलकूल मान्य नाहीं. बुद्धिवादाच्या निष्पावर त्या तत्त्वज्ञानाची कशी परफट निघते तें प्रा माटे यानी 'वर्ण कर्म चिकित्सा' या प्रकरणात मोठ्या भेदक रीतीनें दाखविलें आहे आणि त्या तत्त्वज्ञानानें हजारो वर्षे अस्पृश्य समाजावर सार्वनिक विपत्तीचें कसे आभाळ कोसळत आलें आहे, अस्पृश्य समाजाचे हे हाल इग्रजी अमदानींत कसे तीव्रतर झाले आहेत आणि त्यामुळें हिंदु समाजा पासून अस्पृश्य समाज कसा दुरावत चालला आह याचें अगदीं तपशीलवार व स्वानुभवसिद्ध असें वर्णन प्रा. माटे यानीं हिंदूच्या बुद्धीला एका बाजूनें भयाचा धसका उत्पन्न करील तर दुसऱ्या बाजूत त्याच्या भावनेला अनुकंपेची आच लावील इतक्या परिणामकारक रीतीनें केलेलें आहे

नीरांतून क्षीराचा अंश वेगळा काढणाऱ्या हंसाच्या विवेचक चोखंदळपणानें प्रा. माटे यांनीं जातिसंस्थेंतील ग्राह्याग्राह्य भाग निवडला आहे. ते म्हणतात, ‘उच्चनीच भावाची कल्पना व वंश विषयक भिन्नत्वाची जाणीव या दोन स्वतंत्र भावना आहेत.’ पहिल्याच्या बुडाशीं लोभ आहे तर दुसऱ्याच्या बुडाशीं अपृणुक आहे. वंश–कल्पना त्रिवर्णांना प्रबल वाटली म्हणून त्यांनीं संकर न होऊं देण्याची व्यवस्था केली, यांतही कांहीं, विशेष वाटण्यासारखें नाहीं, पण आम्ही जे त्रिवर्ण तेच सर्व भोगृस्थळें भोगूं, तुम्ही आमचे दास बनून आम्ही जीं हलकीं सलकीं कामें तुम्हांस लावून देऊं तींच तुम्ही करावीं, श्रेष्ठ कामाचा हव्यास धरता उपयोगाचा नाहीं, धरल्यास त्यानें नरकास जाल, येथवर जेव्हां हें प्रकरण आलें तेव्हां मात्र दोन सूत्रांचा विलक्षण संकर झाला असें म्हटलें पाहिजे. अपृणुक व लोभ हीं तीं दोन सूत्रें होत—मूळ कल्पना वंश श्रेष्ठतेची होती यात शंका नाहीं. पण जें कांहीं भोग्य म्हणून असेल तें सर्व आमचेंच हा आग्रह मात्र जागतिक वंश कल्पना व्यापाराच्या पद्धतीवरच गेला. तुम्ही निराळे असाल पण जर, आपण गुणांनीं श्रेष्ठ अशी जी तुमची खात्री तीप्रमाणें तुम्ही खरोखरच श्रेष्ठ असाल तर सर्व लोकांची शर्यत लावूनही त्यांत तुम्ही आपलें श्रेष्ठपण टिकवूं शकाल हेंहि खरें आहे मग त्यांना शर्यतींत दाखल कां होऊं देत नाहीं! म्हणजे हिंदूंच्या वंश अपृणुकीच्या न्यायास प्रा. माटे यांनीं गौरविलें असलें तरी अस्पृश्यतेच्या अन्यायाचें समर्थनही त्याच पायावर करण्यास ते मुळींच तयार नाहींत. अन्याय सार्वत्रिक आहे म्हणून हिंदुसमाजानेंही तो तसाच ठेवला तर त्यांत काय बिघडलें असा हा दावा नाहीं. कारण वंश अपृणुकीची भावना ही जशी सार्वत्रिक तशी न्याय्यही आहे हें प्रा. माटे यांनीं दाखवून दिलें आहे. मात्र हिंदूंच्या वंश-अपृणुकीला इतरे उदाहरण नाहीं एवढें भाय धरतात या गोष्टींची मोठ्या जोरदारपणें प्रा. माटे यांनीं त्यांना जाणीव करून दिली आहे व त्यानिमित्त केलेल्या वैचारिक समुद्रमंथनांतून निघालेलें जातिसंस्थेंतील अमृत कोणतें व विष कोणतें हेंहि सांगितलें आहे.

जातिसंस्थेच्या व अस्पृश्यतेच्या उपपत्तीसंबंधानें प्रा. माटे यांनीं दाखविलेल्या विवेचकपणांतून त्यां वर मिळेल विरोधाभास निर्माण झाला आहे, तसाच त्यांनीं स्वीकारलेल्या सामाजिक सुधारणेच्या कार्यपद्धतीसंबंधीं आणखी एक विरोधा

भास निर्माण होतो व या बाबतींत तर प्रा. माटे यांना अनेक सुजाण व अजाण विरोधकांनीं दूषणें दिलीं आहेत. ही पद्धति म्हणजे प्रा. माटे प्रतिपादीत असलेली मत परिवर्तन पद्धति होय.

'सुधारकाची जबाबदारी' या प्रकरणात प्रा. माटे यांनीं सुधारकाचे पाच वर्ग केले आहेत आणि त्यापैकीं कोणता वर्ग समाजाचा खरा उपकारकर्ता बनतो हें सांगून अशा सुधारकानें कोणकोणतीं ज्ञानें संपादन केलीं पाहिजेत व तीं समाजाच्या मनावर कोणत्या उपायानें बिंबवलीं पाहिजेत तें अगदीं सुलसेवार सांगितलें आहे.

न्यायमूर्ति रानड्यानीं सांगितलेल्या सुधारकाच्या चार वर्गांत आपण कल्पिलेला आणखी एक वर्ग मिळवून प्रा. माटे यांनीं हें वर्गीकरण अधिक पूर्ण केलें आहे.

न्यायमूर्ती रानड्यानीं सुधारकाचे चार वर्ग केलेले आहेत. पहिला म्हणजे शास्त्रांतून आपल्याला अनुकूल असे अर्थ, हर हुन्नर करून काढणारे सुधारक, दुसरे म्हणजे शास्त्राविषयीं अनादरबुद्धि न ठेवूनही बुद्धीला प्रमाण मानणारे सुधारक, तिसरे म्हणजे आपणास इष्ट वाटणारी सुधारणा, कायदा करून समाजावर लादणारे सुधारक आणि चौथे म्हणजे समाज नालायक म्हणून त्याच्यापासून पंथरूपानें तुटून पडणारे व आपला सवता सुभा बनविणारे सुधारक. या चारही प्रकारच्या सुधारकांपैकीं तिसऱ्या व चौथ्या प्रकारचे सुधारक कोणती चूक करतात तें प्रा. माटे यांनीं अतिशय सुंदर रीतीनें दाखवून दिलें आहे. प्रा. माटे म्हणतात,

वरील वर्गांपैकीं चौथ्या वर्गांतील लोक इतर पद्धतींना कंटाळलेले असतात. ह्याच देहीं आणि ह्याच 'डोळा त्यांना बुद्धीनें पटलेल्या सुधारणा हातात पाहाव्या असतात. लोक तर महा मुर्दाड व नेभळट. स्वत ची सुधारणा की समाजाची सुधारणा या दोहोंत ते स्वत च्या सुधारणेला जास्त मान देतात ..असला सुधारक समाजाचा उपकारकर्ता न राहतां समाजाच्या अनेक विरोधकांत तो दाखल होतो. मनांत नसतांनासुद्धा आधींच बुजबुजलेल्या पंथांच्या संख्येंत तो भर मात्र घालतो. मागें एकदां असें ऐकण्यात आलें होतें कीं आर्यसमाजाचे पंजाबांतील आधारस्तंभ जे लाला लजपतराय त्यांनीं आर्यसमाजाच्या पटावरून आपलें नांव काढावयास सांगितलें व तेंही या

सुधारक की आपण असे कोणी म्हणते त्यामुळे आपल्या सदुपदेशाचा सुद्धा समाजावर व्हावा तितका सुपरिणाम होत नाही

तिसऱ्या वर्गाचे सुधारक सुद्धा समाजाला अप्रियच होतात, आणि देशावर परकीय संस्कृतीचा सत्ता असेल तर ते फारच अप्रिय होतात कायद्याचा सुधारक हट्टवादी त्या वर्गात असतो, ह मतलबी समाजाला स्पष्ट कळते, हिंदू समाजातील असवर्ण पोटजातींनी विवाह करावेत की नाही, याचा कायदा होऊ घातला असता त्यावर होय किंवा नाही असे मत देणारे हे ख्रिस्ती किंवा मुसलमान कोण? उद्या मुसलमान समाजातील एखाद्या नाजूक गोष्टीसंबंधानें कौन्सिलात बिल येऊ द्या म्हणजे काय तमाशा होतो तो दिसेल असल्या गुणांनी सुधारणा मूळ धरीत नाहीच नाही पण सुधारक शुद्ध बुद्धीचा असूनसुद्धा केवळ साधनभ्रंशामुळे या समाजाच्या रोषास पात्र होतो

साधनभेदानें सुधारकांचा आणखी एक वर्ग पडू शकतो, असें प्रा. माटे यांचे म्हणणें आहे तो म्हणजे पडून घर घेणाऱ्या सुधारकांचा 'हे शास्त्रास उघड नाहीत शास्त्रास अवमानीत नाहीत, बुद्धीची संमति घेत राहतील, बऱ्या वाईटाची निवड करतील, आपलें बोलणें समाजाला पटविण्याची शिकस्त करतात, समाजाची प्रवृत्ति योग्यशी झाली आहे असें दिसल म्हणजे कदाचित् राजसत्तेचीही मदत घेतील, पण समाजास वश करून घेणें तें बुद्धानें, आग्रहानें व सारासार विवेकानें करतील म्हणून पहिल्या प्रकारच्या सुधारकांशी म्हणजे शास्त्रासच मानणाऱ्यांशी दुसऱ्या व पाचव्या प्रकारचे सुधारक हाता होईतों संगनमत करितात व अशा रीतीनें हे तीनही जातीचे लोक म्हणजे शास्त्रास मानणारे बुद्धि व विवेक यास मानणारे आणि दोघांनी जें ठरविलें तें साधनांच्या कौशल्यानें समाजाच्या पचनीं पाडणारे समाजास अत्यंत उपकारक होतात

या पाचही वर्गांच्या सुधारकांचे प्रा. माटे यांनी मोठें भावनाभरित वर्णन केलें आहे प्रा. माटे म्हणतात

'अर्थात् फन्दूक निघालेले व शेणमार होऊन कदाचित् प्राणास मुकलेले जे आत्मत्यागी त्यांची किंमत कशानेही कमी होत नाही सुधारणेची वरात सुखानें पुढें सरावी म्हणून प्रत्येक वळणावर फुटणारे हे नारळ होत पण अभिप्रेत सुधारणा समाजाच्या पचनीं पाडणाराचे कष्टसुद्धा कमी नाहींत आत्मत्यागी एकदा मरतो आणि हा चिकट सुधारक रोज तसुतसूनीं मरत असतो "

सर्वसामान्य मनुष्य परंपरागत आचारास का चिकटून असतो व त्या आचारामध्यें सुधारकाच्या म्हणण्याप्रमाणें इष्ट ते फेरबदल करण्यांत आरंभी तरी तो का नाखूष असतो याचें मोठें सुंदर विवेचन प्रा. माटे यांनीं 'सुधारकाची जबाबदारी' या प्रकरणांत केलें आहे. प्रा. माटे म्हणतात

खांद्यावर फरशी टाकून दोन चार कुत्रीं बरोबर घेऊन रानोमाळ भटकणाऱ्या स्वातंत्र्यप्रिय एकाकी रानटी मनुष्यापेक्षा सामाजिक मनुष्य दसपट स्वातंत्र्य अनुभवितो. ज्या ज्या आचारपद्धतीनें त्याला हें सुख प्राप्त करून दिलें त्या पद्धतीस अर्थात् तो बळकट धरून बसतो. तिचें उपकारकत्व पिढ्यानपिढ्या त्याच्या प्रत्ययास येत असतें व मग कोणत्या कारणानीं आणि कोणत्या परिस्थितींत त्या त्या पद्धती रूढ झाल्या तें विसरून ते आचार मात्र तो केवळ न कळतच चालू ठेवीत असतो. रोजच्या व्यवहारांत त्याचें मन नेहमीं गढून गेलेलें असल्यामुळें आपल्या आचाराची पाहणी करण्याचें त्याच्या मनांतही येत नाहीं. इतकेंच काय पण जर त्या आचारांत कोणी बदल करावा असें म्हटलें तर त्याला त्याचा विस्मय वाटतो व रागही येतो. आचार ज्या तत्त्वज्ञानावर रचला होता तें तत्त्वज्ञानच साफ ढासळलें आहे या गोष्टीची जाणीव त्याला एकाएकीं होणें व ती पटणें केवळ अशक्य असतें. आणि म्हणून सुधारक ओळखतो कीं, ज्याला दुराग्रह म्हणून सबोध प्यात येत आहे त्या रूपाच्या समष्टिरूपाकडे पाहिजे तर उपकारक तत्त्वज्ञानाला टिकाऊपणा प्राप्त करून देणारा सामाजिक मनाचा तो सहजधर्म होय. त्याला दुराग्रह म्हणून सामान्यतः संबोधितात तो पूर्वी कधीतरी सभामित असा सर्वमान्य विचार असतो अर्थात् नांव ठेवून दूर सरकणारा आपलें कर्तव्य बरोबर जाणत नाहीं. कारण आरोपानें प्रत्यारोप मात्र होतो. समाज जर 'दुबळा' तर सुधारक फटिंग ठरतो. समाज जर 'दुराग्रही' तर सुधारक 'बहकल्ला' असें होतें.

मत-परिवर्तन हा शब्द कित्येकांस रुचत नाहीं. कारण कीं, त्यांत काम पुढें ढकलण्याची बुद्धि सुचविली जाते असें त्यास वाटतें. दुसरे कित्येक तर त्याची टर उडविण्यासच प्रवृत्त होतात. कारण त्या शब्दानें सुचविलेल्या चळवळींत कांहीं धकाधकी किंवा झगझग नाहीं. परंतु आपण करीत असलेली सुधारणा ही 'सामाजिक' सुधारणा असल्यानें समाजाच्या पोटीं राहूनच

आपणास त्यार इष्ट तो फेरबदल घडवून आणला पाहिजे. समाजावर रागा-वून त्याच्यापासून फुटून निघण्याने आपले ध्येय जवळ ये यापेक्षां आपण अधिकच दुरावत जातो. समाज उरार्शी धरीत असलेल्या संस्कृति-संच-यानें त्रण मान्य करूनही त्यातील काही भाग मुळात चूक नसला तरी आज गैरलागू कसा आहे तें विवरून सांगितलें पाहिजे.

पर्वति सत्याग्रह किंवा नाशिकच्या काळ्या रामासमोर अस्पृश्यांनी केलेला सत्याग्रह याचे दाखले प्रा. माटे यांनी आपण प्रतिपादीत असलेल्या परिवर्तन पद्धतीच्या पुष्ट्यर्थ दिले आहेत. ते वाचले असता व महात्मा गांधी यांच्याशी झालेल्या त्यांच्या मुलाखती व पत्रव्यवहार वाचीत असता ते प्रतिपादीत असलेली मतपरिवर्तनपद्धती ही नासाची, कंटाळवाणी व पटखाऊ वाटत असली तरी ती सत्याला हरताळ फासणारी मात्र नाहीं, उलट ती आपलें ध्येय टप्याटप्यांनी गाठत जाणारी व तें ध्येय अगदीं यथार्थपणें समाजाच्या मन कोंपात भिनविणारी एकमेव पद्धति आहे अशी आपली खात्री पटते. शंकडों वर्षे मंदिरप्रवेशाला मुकलेल्या अस्पृश्यांना आज एकदम मूर्ती-च्या पायाला हात लावून स्पर्श करता आला पाहिजे असें म्हणणाऱ्या व या बाबतींत प्रचाराची सततधार धरूनच हें सर्व साधलें पाहिजे या प्रा. माटे यांच्या आग्रहाचा उपहास करणाऱ्या महात्मा गांधींची कॉंग्रेस अखेर अस्पृ-श्यांचा विश्राम कसा घालून बसली आहे- आणि अस्पृश्यांना आज निदान जरी सभा-मंडपात जाता आलें तरी तेवढेच पदरांत पाडून घेऊन मूळ ध्येय पूर्णांशानें साधण्यासाठीं परिवर्तन प्रचाराचे तन अधिकच चालू ठेवावें या त्यांच्या कल्पनेचा पचरा वर्षापूर्वी उपहास झाला असला तरी रस्त्याच्या राम-मंदिरात देव दर्शनार्थ आज जाणारे कॉंग्रेसचे हरिजनमंत्री रा. तपासे यांनींही केवळ सभा मंडपातूनच देव दर्शन घेऊन या कल्पनेलाच कसा दुजोरा दिला आहे तें पाहिलें म्हणजे प्रा. माटे यांची या बाबतींतली विचारसरणीच बरोबर आहे असें म्हणावें लागतें.

अस्पृश्यांच मूळ दुखणें प्रा. माटे यांनीं 'अस्पृश्यांच्या प्रश्नां'त सूत्ररूपानें अगदीं अचूकपणें सांगितलें आहे. व तें म्हणजे आपल्या मनबुद्धीच्या साम-र्थ्याच्या विकसनास व विकसित झालेल्या सामर्थ्यांच्या वावरास अस्पृश्यांना संधि मिळत नाहीं, हें होय. मंदिर प्रवेश हें आमचें साध्य नसून आमची गुद-

मारलेली माणुसकी परत व खुली करण्याचें तें एक साधन आहे असेंच रा. तपासे यांनींहि म्हटले आहे व डॉ आंबेडकरही तेंच म्हणत आहेत

सूक्ष्म व चौफेर असे अवलोकन, वाचन व मनन याच्या बरोबरच 'अस्पृश्यांच्या प्रश्नांचें मोल अगदीं गतगुणित करणारी अशी आणखी एक संपदा अस्पृश्यांच्या प्रश्नात ठायीं ठायीं विखुरली आहे व ती म्हणजे जिवापाड मेहनत करून व जिवंत सहानुभूतीनें सतत वीस वर्षें प्रा माटे यांनीं अस्पृश्य समाजाची केलेली सेवा ही होय 'अस्पृश्यतानिवारणाचे अनुभव' वाचणाराला कळेल कीं सकाळीं उठेपासून रात्रीं ११ वाजपर्यंत पोटाच्या उद्योगाचा वेळ सोडून बाकीचा सर्व वेळ प्रा माटे यांनीं याच कामात घालवला आहे व समाजाच्या पोटींच राहून अस्पृश्यांच्या वस्त्या झाडणें, त्यांच्या मुलांना आंघोळी घालणें, त्यांना शिकवणें, त्यांच्यातील भुकेल्यांना शिदोरी अन्नदान करणें येथपासून त्यांच्या धर्मशिक्षणासाठीं पोथी वाचणें, त्यांच्या पाण्याच्या व इतर हरतऱ्हेच्या गैरसोयींतून त्यांची सोय पाहणें आणि त्यांच्यावर परधर्मीयांकडून होणाऱ्या आक्रमणाचें परिमार्जन करणें येथपर्यंत हरतऱ्हेची खटपट प्रा माटे यांनीं जातीनें व प्रचारक तयार करून व त्यांच्यावर देखरेख ठेवून केली आहे

'अस्पृश्यांचा प्रश्न' वाचित असतांना त्यातील बारीकसारीक तपशिलानें व विरोधाभासात्मक प्रमेयांनीं वाचकाची बुद्धि प्रथम गोंधळून गेली तरी अस्पृश्यांचा प्रश्न सरळ व सूक्ष्म रीतीनें समजल्यावर मागाहून होणाऱ्या जाणिवेनें ती प्रमुदित होते व काटें तर्कनिष्ठुर बुद्धिवादाचा आश्रय घेणारी व काटें चित्तातले सर्व सत्यभाव डोळ्यावाटे वहायला लावणारी त्यातील जिवंत सहानुभूति वाचकाच्या भावनेचें पारणें फेडते

अशा या अमोलिक ग्रंथाचें पुनःसंस्करण व पुनर्मुद्रण व्हावें, त्यातील विचारमौक्तिकें त्यांची प्रतवारी लावून व कोठें कोणचें मोती शोभेल तें पाहून सुसूत्रतेच्या लाल दोऱ्यातून तीं ओंवून घ्यावीं आणि आकर्षक बहिरंगाची जरतार त्याभोंवतीं गुंडाळावी म्हणजे सरस्वतीला मराठ्याकडून आलेल्या नजराण्यांत हा ग्रंथ म्हणजे एक दैदिप्यमान अलंकार होईल यांत मला तरी कसलीच शंका नाहीं.

---

## 'अनामिका' : : : २०

मोरेश्वर रामचंद्र ढमढेरे, एस् ए, एल्एल् बी.

महाराष्ट्रात जीं काहीं थोडी विद्वान्, विचारवान् आणि प्रतिभावान् माणसें आहेत त्यांत प्रा. माट्यांचें नाव निश्चितपणे घेण्यास हरकत नाहीं. विचार, उच्चार आणि आचार ह्या तीनही गोष्टींचा समन्वय प्रा माटे हे घालू शकतात आणि त्यांच्या गेल्या ३० वर्षांच्या आयुष्याकडे नजर फेकल्यास प्रा. माटे ह्यांनीं अस्पृष्ट आणि उपेक्षित अशा समाजाकरिता किती खस्ता खाल्ल्या, स्वतः शारीरिक, मानसिक आणि आर्थिक त्रास किती सोसला हें साधारण शिक्षित मनुष्यही सांगू शकेल

प्रा. माट्यांच्या लिखाणांत मराठी भाषा वैभवपूर्ण आणि विलासवती अशी दिसते हें सांगणें म्हणजे सूर्याला नीरांजन दाखविण्याइतकें हास्यास्पद होईल एक प्रकारची विशिष्ट ओढ त्यांच्या लिखाणांत दृग्गोचर होते आणि मनातील सूक्ष्म विचाराचे धागेदोरे ते फारच हळुवार हातानें उकलून दाखवितात त्यांची भाषा समृद्ध आहे, उपमा अलंकारादींनीं नटलेली आहे, वैचारिक प्रखरतेबरोबरच कल्पनाशक्तीच्या गरुडावर आरोहण करून भरारी मारून अंतरिक्षांत अवगाहन करणारी आहे, वास्तवदर्शी आहे, एक प्रकारच्या आत्मविश्वासामुळें क्वचित् रंगेलहि आहे, ग्रामीण जीवनाशीं समरस होऊन टोसर आणि अर्थवाहि शब्द योग्य ठिकाणीं वापरणारी आहे हें जरी खरें असलें तरी 'अनामिका' ह्या त्यांच्या लेख–आणि–गोष्टींच्या संग्रहाचें स्वागत आम्ही त्याकरिता करीत नसून दुसऱ्याच एका, सध्याच्या दिवसांत दुर्मिळ पण अत्यंत जरूरीच्या अशा ध्येयवादाकरिता करीत आहोंत प्रा. माटे हे ज्या वेळीं काहीं गोष्टी किंवा लेख एक विशिष्ट हेतु मनात धरून लिहितात त्या वेळीं त्यांचें लिखाण, सहजस्फूर्त, रसोत्कर्षक आणि वाचकाच्या हृदयाचा ठाव घेऊन त्याला आपल्या पूर्ण पकडींत ठेवणारें असें असतें.

त्याच्या लिखाणाचा हा विशेष 'अनामिका' या पुस्तकात जागोजाग आढळून येतो

ह्या भारतवर्षांत हिंदुसमाजाची आणि महाराष्ट्रातील हिंदुसमाजाची अवनति का झाली, ह्याचें विवेचन इतिहासाचार्य राजवाडे आणि ज्ञानकोशकार केतकर ह्यांनीं वेळोवेळीं सडेतोडपणानें केलेलेंच आहे, परंतु समाजाला शिक्षण द्यावयाचे जे अनेक मार्ग आहेत त्यांत समाजाला आंजारून गोंजारून, गोड शब्दांत, गोष्टीच्या रूपानें, वाचकाला न कळत पण त्याच्या काळजाला जाऊन भिडणारा असा मार्ग या पुस्तकानें निश्चितपणें चोखाळला आहे. प्रा. माटे यांना ज्या काहीं गोष्टी समाजानें करावयास हव्या आहेत त्या आज ना उद्या समाज निश्चित करील इतकी विचारक्रांति मान्यांनीं आजवर लिहिलेल्या लिखाणानें आणि ह्या पुस्तकातील तीनचार गोष्टींनीं खासच केलेली आहे. त्याकरिता प्रा. माटे ह्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे

देशातील बहुजन समाज अज्ञ राहिला म्हणजे साहजिकच देशाची अवनति प्राप्त होते केवळ अल्पसंख्य बुद्धिवादी वर्ग सूज्ञ होऊन भागत नाहीं. निरक्षरतेचें प्रमाण आपल्या देशाइतकें भयानक दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं पोहोणाऱ्याच्या गळ्यांत धोंडा अडकविला तर कितीहि चांगला पोहणारा असला तरी तो पैलतीर कसें गांठणार ? हा अज्ञानरूप धोंडा आपल्या समाजाच्या गळ्यांत येवढा मोठा बांधला आहे कीं अल्पसंख्य पुढारलेला वर्ग स्वराज्य कसें मिळविणार ? म्हणून बहुजन समाज साक्षर, सुशिक्षित, आपला कोण, दुसऱ्याचा कोण, आपलें हित अहित जाणण्याइतपत तरी शिक्षित व्हावयास पाहिजे ह्या गोष्टी व्याख्यानानें होणार नाहींत त्याला जीवन व आतडें पिळवटून लिहिणारे लेखक पाहिजेत प्रा माट्यांच्या इतक्या कळकळीनें ह्या विषयावर मराठींत कोणी लिहिल्याचें सुशिक्षितास माहीत नाहीं.

गरीब आणि अज्ञ जनतेला ज्ञान मिळवून दिलें पाहिजे हें एकच ध्येय प्रा. माट्यांच्या लिखाणांत प्रामुख्यानें आढळतें जी गोष्ट शंभर व्याख्यानानीं होणार नाहीं ती गोष्ट 'रगाजीबोवा 'सारख्या किंवा 'सायेबाला काळीजच न्हाई !' ह्या गोष्टीनें निश्चित सिद्ध होईल ह्या पुस्तकातील सर्वोत्कृष्ट गोष्ट 'सायेबाला काळीजच न्हाई' ही होय. ह्या गोष्टींत वर्णन केलेला प्रसंग फलटी पुण्यासारख्या मोठ्या शहरात घडत असतो परंतु एखादाच प्रा माट्या-

सारखा सहृदय व ममत्वपूर्ण लेखकच ती गोष्ट मन ला चटका लावून सम णाऱ्या मार्मेत आणि विचारमतांना निवार करण्यास भाग पाडील अशा रीतीनें लिहू शकतो.

आपल्यापाशी माळ—याच्यापुढें मागें एखादें अर्ध डॉलर वाई अथवा तुवा—तीहि बिल्कुल निस्तेज, जगास लागणाऱ्यांसें आपणाजवळ काय आहे अशी भावना तोंडावर उमटलेली, मळकट कपडे, मळकट शरीरें, अन्न नाहीं वस्त्र नाहीं अशी स्थिति, पण माणूस माणसाला दुरावतो इतका दूर करतो, की ती आपळयाची माळ निमडोळ्याच्या नेतृत्वासाठीं शिंप्याच्या दुकानाच्या फुटपाथवरून देखील जाण्यास कचरते ! आपण ह्या लोकाना किती दूर लोटलें आहे ! त्याना आपली केवढी भीति वाटते ! आपल्याबद्दल त्याना किती अविश्वास वाटत असावा ! खिडकींत ठेवलेली लाकडाचा 'सायेबा' शोरूममध्यें लाकडाचा 'साहेब' करून त्याच्यावर शिपी आपलें कौशल्य दाखवितो एवढें देखील माहीत नाहीं ! ती बिचारीं भीत भीत, आपणास कोणी पै पैसा 'भीक' घालील का ह्या उदासवाण्या आणि दीनमुद्रेनें, ह नोव्यार्चे नाव घेऊन दुकानाच्या समोरच्या बाजूच्या कडेनें जात असतात. त्याना वाटतें हा 'सायेब' आपल्याला भीक घालील! सायेब पडला लाकडाचा—ना त्याला काळीज—पण ती बिचारीं माणसासारखीं माणसें भिऊन जवळ जवळ मृतप्राय झालेली दुकानाच्या काचेच्या खिडकीजवळ नुसतें पाहण्याची देखील त्याना भिति वाटावी

'सायेबा'ची ऐट अशी की कपडे काढायला देखील गडी लागतो असे त्या अज्ञ व भीतिग्रस्त लोकाना वाटतें वास्तविक सध्याकाळीं कपडे काढून ठेवून दुसऱ्या दिवशीं पुन त्याच 'सायेबा'ला ते कपडे चढविण्याचें काम रोजच चालतें बिचाऱ्याना काय माहीत की हा 'सायेब' जीवंत नसून लाकडाचा आहे. ह्या गोष्टींत आपळे आणि डॉलस याचे जे संवाद आहेत ते तर इतके योग्य व समर्पक आहेत कीं त्याचें वर्णनच करणें अशक्य प्रा. माट्याची ही गोष्ट मनाला चटका लावते आणि मनापुढें प्रश्न असा उत्पन्न होतो कीं ह्या सर्व वस्तुस्थितीला जबाबदार कोण ? Tennyson कवीची 'It grieves my heart to think what man has made of man' ही ओळ साहजिकच आठवते.

दुसरी नितान सुंदर गोष्ट 'सगाजी बोवा.' माल्यानीं हा मनुष्य अस्पृश्य असा रंगविला आहे तें एक माल्याचें Fad आहे, तें आपण सोडून देऊं कारण अशीं माणसें स्पृश्य समाजात लाखोंनीं मोजता येतील. ह्याला ज्ञानाचा गंध नाहीं, जगात काय चाललें आहे ह्याचें भान नाहीं, आपण किती क्षुद्रावस्थेला पोंचलों आहोंत ह्याची जाणीव नाहीं, आपण माणसासारखें माणूस आहोंत आणि कर्तृत्व करण्याची धमक आपल्यात आहे हें त्याला कधींही कोणीही सांगितलेलें नाहीं, ज्ञानदीपाची आणि त्याची चुकूनसुद्धा गाठ पडलेली नाहीं, हें कशामुळें? 'ग्रे'च्या 'Elegy'तील 'But Knowledge touches eyes its ample page, Rich with the spoils of time did never write' हेंच खरें. ह्यात सगाजी बोवाची काय चूक? त्याला 'शहाणा करून सोडण्याचें' काम ज्याचें होतें त्यानीं तें का केलें नाहीं? समर्थांचें 'जें जें आपणास ठावें। तें तें दुसऱ्यासी शिकवावें। शहाणे करून सोडावे। सकळजन॥' हें आम्हीं का विसरलों?

त्याच्यावर ही जबाबदारी होती त्यानीं ती योग्य रीतीनें पार पाडली नाहीं. ह्यापुढें तरी अशा गोष्टी होऊं देता कामा नये आणि माल्याच्या भाषेनेंच सांगावयाचें झाल्यास आपणास असें म्हणता येईल कीं, 'सगाजी असतानाही नसल्यासारखाच होता, आता नसल्यावर तो नसणारच!'

पण ज्या लहान मुलाच्याकडे तो उदासपणानें बघत असे तीं मात्र भावी काळात असल्या मरणानें कधींहि मरणार नाहींत. हेंच माल्याच्या लिखाणातील वैशिष्ट्य!!

बाकीच्या गोष्टींबद्दल लिहिण्यासारखें पुष्कळच आहे. परंतु परीक्षण म्हणून आवरतें घेणें भाग आहे. त्यात काहीं ठिकाणीं त्याचा व वाचकाचा मतभेद होणें स्वाभाविक आहे. मला हे पुनर्जन्म न मानणारे, आत्म्यावर विश्वास न ठेवणारे, आधिभौतिकवादी असावेत असें वाटतें. म्हातारपणाची भीति वाटणारे असावेत, मृत्यूविषयक त्यांच्या काहीं विशिष्ट कल्पना असाव्यात असें वाटतें. परंतु काहींहि झालें तरी या माल्याचें व्यक्तिमत्व हें श्रेष्ठच आहे ही गोष्ट कोणीहि कबूल करील. आणि त्याच्या या पुस्तकाचें महाराष्ट्र मोकळ्या अंतःकरणानें आणि मुक्तहस्तानें स्वागत करील असा विश्वास वाटतो.

शेवटी एकाच गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो आणि तो असा की माट्यांनी पुस्तकाला नाव ठेविलें तें खरोखरच सार्थ आहे. पूर्वी भोजराजाच्या पदरीं असलेल्या कविश्रेष्ठांचीं बोटें मोजून गणना करतांना कविश्रेष्ठ कालिदास झाला 'अनामिका' आली आणि नंतर त्याच्या तोडीचा कोणी कवीच सापडेना म्हणून मोजणारा कवि म्हणतो, 'अद्यापितत्तुल्यकवेरभावात्। अनामिका सार्थवती बभूव'। त्याचप्रमाणें प्रो. माट्यांच्या या पुस्तकाचें यश सुप्रतिष्ठित राहील असा विश्वास वाटतो, कारण त्यांच्या इतक्या सहृदयतेनें समाजाच्या निकृष्ट वर्गाकडे अद्याप कोणी पाहिलें नाहीं आणि पाहिलें असल्यास इतक्या सहृदयतेनें कोणी 'काय पाहिलें' तें रंगविलें नाहीं.

## अर्थाचा अधिराज आला : : : २१

कवि · मनमोहन

पर्वतीच्या पायथ्याशीं ....जरासे पुढें. ...बाजूच्या वळणावरती
एक झाड आहे वडाचें. फार पुरातन.. .. इतिहासपुरुषाचारखें
किंवा काळपुरुषाच्या असतील त्या तपकिरी जटा .. त्या पारब्या
त्याचे मूळ शोधणाऱ्याला चाचपावी लागेल टाळू शेषाची.

* * *

परशुरामभाऊ कॉलेजच्या पिछाडीला......जरासें.. ...बाजूला·
एका इवल्याशा वास्तुत वाढला आहे एक ज्ञानवृक्ष.
ज्याच्या शाखा उंच उंच भविष्य कालातिल थेऊ बघणाऱ्या
—अगाध मेघखंडाच्या पखान्याशीं करतात कान-कुजेल्पणा.

* * *

ज्याचें व्यक्तित्व पहाता आठवतें षडाननाचें स्वरुप,
ज्याच्या लेखणीच्या टोकातुन लाख्हा दस्ता—दस्तावर लवडे
ज्यानें समाजातुन·उठनलेल्या·ठाकरता महान मन्गटानें
जमिनिला अस्मान भिडविलें, मिशुड फुटता फुटताना.

* * *

ज्यानें अ पुल्या मज्जातंतूच्या मायाजालात पकडलें पळालेलें
जीवनातिल सुप्त समस्याचे मासे कुशल धीवरासारखे,

ज्यानें ब्रह्मांडातिल सारे गोलाकार–काव्य चाचपीत हातानें
नेळले खेळ शंकराचार्यांसारखे, तो सभापणातही चतुर

* * *

चंद्राचा गोलाकार भिरभिरतो भवऱ्यासरसा निळ्या पाण्यात
तसे याच्या विचारी जीवनातही स्वचरते काव्यामृता
पर्जन्यानें सवाल करिता वरऱ्या, नसे मदिनियरच्या
घराच्या पत्र्यावे–तारी तडतडारे कर्णकर्कश

* * *

तसे याच्या उदात्त जीवनातिल महान प्रश्नांना कुणी
दिलें बत्तिसदाताच्या विचकणींत मावणारे मामुली जबाब,
कुणी मच्छरानें रान उठविलें या सिंहाची साधाया शिकार
परंतु शब्दीं याऱ्या पंजानें केलें त्या सर्वांचे 'तीन वार'

* * *

वसंत ऋतू गुलाबी फुला–फुल तून चिमुकल्याच्या
गालातून ओसडणारा स्वप्नाळू तसेच याचें 'काव्य–प्रस्ताव'
याच्या बलवान दोन हातावर यानें पेलिले चढविले सामान्य,
ज्ञानाच्या महाराष्ट्राच्या सारस्वतातिल हा एक भगवान्

* * *

पुलाखालील सात कमानींतून शिरतात रविकिरणाचे भाले
तस याचे तर्कशर उलगडाया शिरती रियासतींची 'गुंत'
पारदर्शक बनतात याच्या मजकुरानें भरलेले रीम रीम कागद
आणि पारदर्शक करतात वाचणाऱ्याचे डोळे चित्त पंचेंद्रिये

* * *

हरिभजनाच्या घरात यानें फार पूर्वी नेली परकरातील सरस्वती
अज्ञानाच्या अंधकाराला गाडणारा हा जळणारा एक मशाल
हा अनेकांसाठीं झिजला आणि अखेर केलं कोट कल्याण
याचा दिमाख शिवालयावरील सोन्याच्या कळसासारखा.

*    *    *

उद्याची पिढी याच्या ग्रंथातून काढील नवनीत ज्ञानाचे
आजच्या पिढीच्या विश्वासात याच्या रुंद छातिचें देणें
माझ्या बुद्धीवर अनेक वलयें यानें फुंकलेल्या तुतारीचीं.
निराशा जेव्हा कारुण्यात गुंतवी मला.. तेव्हा मी जातो याच्याकडे

*    *    *

यानीं दिलेल्या आश्वासनानें धीर खचलेलें माझें ओलें घर
पुन्हा मजबुतीनें टेहळूं लागलें वरचें   वरचें . अज्ञेय.
जाताना फुटलेला   फाटलेला   हा पतंग . हा मनमोहन
ऱ्या घरातून बाहेर पडताना . गरम छातीनें पडे बाहेर

*    *    *

याच्या रक्ताच्या गोलकात अनुभवाचे कथ्यक थयथयतात.
याच्या व्यासपिठावरील वक्तव्यात घात—आघात पानपतावरचे.
हा रस्त्यानें चालतो. येणाऱ्या जाणाऱ्या आढ्यतांच्या पोलादी-
—कावा, स्मिताच्या लालीनें थाकवीत.. असा हा श्रीपाद.

*    *    *

गोकुळच्या गौळणी तशा याच्या लिखितशब्दांतील अक्षरांना
चेरटया मालती पदरासारख्या, घागर अर्थाची त्यावरती

जाणीव जुन्या आणि नव्या जगाच्या भयानक परिवर्तनाची
—समरसण्याची...विश्वाची ..परंतु हा विश्वासयुक्त अधीर.

* * *

उघड्या मुठींत मध्यंतरीं काळावर्ते आणावर्ते यौवनाचें यौवन
परंतु हें क्षणाचें . विजेच्या लखलखण्यासारखें पळाचें.
मिटल्या मुठीनें आलेली जन्माला रहदारी जाते उघड्या मिठीनें
परंतु शाश्वत असें जें...तें.. त्याना जग पहातें मिटलेल्याही नयनें.

* * *

माझ्या जीवनात मान वाकवावी ज्यांच्या समोर—
असे इसम एका हाताच्या . एका बोटाच्या तीन पेरावर
मोजता येतील असे.,   असेन मी मूढ...आढ्यताखोर...
कदाचित अवताल...भवताल ..असेल...अपुले ..खाटेलेटे.

* * *

असो   असें.. असो . तसें...कसेंही असो...परंतु
याच्या घराच्या परिसरात प्रवेशिता मान लवते माझी.
अनेकांची थोबाडें फोडलेले हे हाताचे दोन.. पंजे हे
नमस्कारासाठीं अंजली बांधतात, ..असा हा...वेगळा.

* * *

वसंतसेनेसारखी भिजते रसिकता ' साहित्य–धारे ' खालीं
'उपेक्षितांच्या अंतरंगा'त शिरताना ती होते बोहल्यावरील नवरी
याच्या आठवणी गोड...भव्य...क्या मायातील हाडाच्या सापळ्यात.
शिष्याच्या हृदयातिल कौतुकाचे पिरॅमिड...तें.. तें...होतिल
स्मृतिचिन्हें.

* * *

आजची 'मराठी'...माझी आजची...मायबोली मराठी म्हणजे-
-बन्दशी निर्हेतुकतेच्या शिवल्यात अनुभूतीविण रहाणारा मोनी.
किंवा खिडक्या-दारें...नसणारें...एक-श्वास कोंडणारें घरकूल.
आजची मराठी म्हणजे...' साबुती ' चघळताना रचलेलें रामायण.

* * *

परंत हा...भाग्य अमुचें म्हणून हा...मित्र. हा...लिहितो.
तेव्हा याच्या बर्फीडीसाखरें रसेवरें अवघें विसरलेलें असतें.
डोळ्यात; रसाचा अविष्कार असेल ज्या ज्या त्या अनुपगानें
लाल...जांभळे...निळे.. पिवळे...हिरवे समुद्र गदगदतात.

* * *

'मधुला यानें सांगितल्या गोष्टी'...केलें 'आपापलें हितगुज'.. यानें।
'विशानंबोधा'च्या डोंगरातून याच्या प्रस्तावनेचा मतगज निघाला.
हा आयुल्या श्वास...निश्वासाच्या दोन दोऱ्याच्या गोफणींतून
कधीं ' गुंडे ' फेंकवो ' अमृता 'चे कुंभ फोडणारें शिगशिग भरलें.

* * *

आज मी आलों.. स्वागताला.. अशाच्या...कालावले हृदयभाव.
या महाराष्ट्राचा परिपाठ जन्माचे कौतुक.. मृत्यूनें सांगावें
परतु या घडीला 'अंजली' हि जिवत आणि मतीही जिवत;
हा क्षण परम भाग्याचा, आम्हा दोघांच्याही जीवनामधिल

* * *

मी हयातभर सुतारी बनुन राहिलों आहें......लाबोडी.
हातभर रुंद...साडेतीन हात लांब...हा देह...हीच तुतारी.

साहित्याच्या दरबारात कधा चोर शिरला तर ती वाजवतो
अनेक वेळा आजवर ती तशीच वाजवावी वाटली मला,

* * *

परंतु आज परंतु भय्या आला हा हा आला शब्दाचा शहाशिवाजी
हा आला अर्थाचा अधिराजा, रसरंगाचा राजराजेश्वर
अनुभूतीत जीवनाला दोन घडविली आपुल्या अभंग अनेक.
असा हा आला विचार म्हणून मी माझी फुंकली तुतारी

---

## आपापले हितगुज : : : २२

प्रा वि म कुलकर्णी, एम् ए , लिंगराज कॉलेज, बेळगाव

प्राध्यापक बापूसाहेब माटे हे त्यांच्या विशिष्ट स्वतंत्र विचारप्रणालीबद्दल प्रसिद्ध आहेत सामाजिक, राजकीय किंवा वाङ्मयीन कोणताही विषय असो त्याकडे पाहण्याची प्रा माटे यांची एक वेगळीच वैयक्तिक दृष्टि असते त्यांच्या स्वतःच्या मननामधून जे विचारसुवर्ण हाती येईल तेंच ते जनतेपुढें मांडीत असतात असें दिसतें प्रा माटे यांच्या कोणत्याही लेखनाची किंवा व्याख्यानाची सहिरुप पाहिली तर तिच्यामध्यें 'माटेपणा' असा दिसल्याशिवाय राहात नाहीं आणि याच कारणामुळें, त्यांचें लेखन विस्तारानें प्रचंड नसलें तरी विचारानें सखोल असल्यामुळें महाराष्ट्रसारस्वतात विशिष्ट स्थान

पत्करून घडलेलें आहे प्रा माटे यांचें स्वतंत्र मौलिक असें लेखन ललित व ललितेतर अशा दोनही स्वरूपांत प्रगट झालेलें आहे या त्यांच्या लेखनाच्या जोडीस त्यांनीं संपादित केलेल्या 'आपापलें हितगुज' सारख्या वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकाची भर असल्यानें त्यांच्या लेखनप्रपंचाची विविधता वाढली आहे प्रस्तुत पुस्तक प्रा माटे यांच्या स्वप्रतिभानिर्मित लेखनाचे मानानें दुय्यम महत्त्वाचें असलें तरी त्यांतही उपरोक्त 'माटेपणा' दिसून आल्याशिवाय राहात नाहीं

प्रस्तुत पुस्तकाची कल्पना, त्यांतील व्यक्तींची निवड, उताऱ्यांचीं भाषांतरें करून निवड आणि प्रत्येक उताऱ्याचे प्रारंभीं दिलेला पान दोनपानी परिचय या सर्वांमध्येंच प्रा माटे यांचें स्वतंत्रपण थोडेंफार दृग्गोचर होतें, यांत संशय नाहीं

प्रा माटे हे वाङ्मयाचे अभ्यासी व अध्यापक असले तरीदेखील काल्पनिक नायकनायिकांच्या कादंबरीनाटकांपेक्षा खऱ्याखुऱ्या माणसांच्या घडामोडींची इतिहासांत व चरित्रवाङ्मयांत आलेली हकीकतच त्यांना अधिक प्रिय वाटते असें दिसतें चरित्र–आत्मचरित्रवाचन हा त्यांच्या आवडीचा एक विषय त्या आवडींतूनच 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' या सर्वश्रुत पुस्तकाचा जन्म झाला प्रस्तुतचें पुस्तकही वरील विशेष प्रकारच्या ग्रंथवाचनाच्या आवडींतूनच निर्माण झालेलें आहे अर्थात् याचें स्वरूप व पुरुषश्रेष्ठांचें स्वरूप भिन्न आहे तेथें स्वतंत्रपणें साहित्य गोळा करून चरित्राचे मिनार उभे केले आहेत येथें अस्तित्वांत असलेल्या उत्कृष्ट पुस्तकांचें किंचित्दर्शन घडविलेलें आहे परंतु परभाषेंतील ग्रंथाचा परिचय व थोर पुरुषांची जवळून ओळख आणि प्रा माटे यांची रसमय भाषाशैली यामुळें हें पुस्तक संकलनात्मक असूनही महत्त्वपूर्ण आहे हें कबूल केलें पाहिजे

या पुस्तकांत एकंदर अठरा थोर थोर व्यक्ती आपापलें हितगुज आपणाला सांगत आहेत सामान्यांचीं हितगुजें ऐकावयास देखील आपण उत्सुक असतों, मग ज्यांनीं जीविताच्या या ना त्या शाखेंत कांहीं तरी क्रांतिकारक कामगिरी केली किंवा कांहीं सुष्टदुष्ट वैशिष्ट्य दाखविलें, त्यांचीं हृद्गतें आपणास अधिकच मोद पाडतील यांत नवल तें कसलें ? या पुस्तकांतील अठरा जगविख्यात व्यक्तींशीं प्रा माटे यांनीं आपल्या पांच दहा मिनिटें दिलखुलास–

घुकतें. आणि मग प्रश्न असा उरतो कीं, खरा बर्बर कोण—प्रचंड बर्बर कर्में करणारा मनुष्य कीं, तो करविणारा त्याचा धर्मग्रंथ ? फेरोजनें आत्मचरित्रात अशी कबुली दिली आहे कीं, "दैवी इच्छा प्रमाणे घरून परधर्मी मूर्तिपूजकांचीं देवळें मी पाडलीं" केवळ परधर्मछळानंतर तो धर्मांधता मानीत होता असेंहि नाहीं, तर इस्लामच्या शास्त्राच्या विरुद्ध म्हणून त्यानें स्वतःच्या राजवाड्यातून सोन्यारुप्याचीं भांडीं काढून फेंकून दिलीं व रत्नखचितांऐवजी हत्यारांचीं म्यानें हाडाचीं केलीं !! राजवाड्यातील भिंतीवर शोभेसाठीं काढलेलीं सुंदर सुंदर चित्रेंहि या इसमानें पुसून टाकण्यास फर्माविलें, तेव्हा हा खरा मानव हितकर म्हणावा कीं एकनिष्ठ स्वधर्मपालक म्हणावा ?

आत्मचरित्रलेखकाच्या 'स्वभावाचे कंगोरे पाहून त्या अनुरोधानेंच माटे यांनीं दोन्ही भाग निवडले आहेत हें पुढील उदाहरणावरूनहि दिसून येतें. ज्ञानप्रसार व ज्ञातृता यासाठीं 'ज्ञानाचीं सदावर्तें' सर्वत्र उघडणारा व याकामीं कोट्यावधी रुपये खर्च करणारा स्कॉटलंडमधील प्रतिकुबेर अँड्र्यू कार्नेजी हा होय. या कार्नेजीचें मन केवळ एका कवितेच्या वाचनानेंच शांतिकाळातील वीरांकडे वळलें. त्यानें देशोदेशीं या वीरांच्याकरितां लक्षावधि रुपयांचे निधि उभे केले. एका हातानें कोटिकोटी रुपये मिळविणारा व दुसऱ्या हातानें तें मानवजातीच्या कल्याणाच्या हेतूनें खर्च करणारा हा पुरुष अलौकिकच म्हणावा. प्रा. माटे यांनीं ज्या कवितेमुळें यांचें मनात क्रांति घडून ती कविता व त्या कवितावाचनाच्या प्रसंगाचाच उतारा अचूक आपणास दिला आहे ( कवितेचें भाषांतर मात्र थोडें बोजड वाटलें ! ) तसेंच, बुकर टी वॉशिंग्टनच्या उताऱ्याबाबत, गुलामगिरीचे दारुण चटके त्याच्या मनाला ज्या प्रसंगीं बसल्याचें त्यानें लिहिलें आहे तेच प्रसंग निवडले गेले आहेत

उताऱ्याच्या निवडी विशिष्ट दृष्टिकोणानें केल्यानें प्रस्तुत पुस्तकांत विविधताही खूपच आली आहे लोकमान्य टिळक मंडालेच्या तुरुंगांतून सुटून आले, पण ते पुण्यास अपरात्रीं पोलिससमवेत स्वतःच्या गायकवाड वाड्यासमोर आले आणि प्रत्यक्ष या आपल्या मालकासही रखवालदार भय्या कसा दार उघडीना, पांगारकरांना मोरोपंतांची कविता मिळवितांना एका तऱ्हेवाईक वैद्य राजाकडून (खरे मोठे वैद्यराज नेहमींच तऱ्हेवाईक असतात कीं काय नकळे)

कशी मजेदार वागणूक मिळाली; आगरकराची डोंगराच्या कारागृहात मुल्याच्या पाल्यानें कशी पाठ पुरविली; किंवा नाना फडणीस पानिपतातून पळताना त्यांस दरोडेखोरांनी कसें गाठलें, गवतात लपून बसून त्यानें आपले प्राण कसे वचावले किंवा मॅक्समुल्लर या जर्मन पंडितास हिंदुस्थानबद्दल प्रेम का व कसें वाटू लागलें इत्यादि विविध गोष्टी वाचताना त्या त्या व्यक्तींची विशिष्ट विचार विकारांनी युक्त अशीं चित्रें तर डोळ्यापुढें उभीं राहतातच पण विश्ववैचित्र्याचाही प्रत्यय येऊन मनरंजन चांगलें होतें.

प्रा. माटे यांनी ज्यांचीं ज्यांचीं हितगुजें या पुस्तकात ऐकविलीं आहेत ते बहुतेक परभाषिक आहेत. टिळक आगरकर इ०चे उतारे सोडले तर बाकीचे त्यांना भाषांतरित करावे लागले आहेत. "भाषांतर करताना मी तें शब्दशः करण्याचा हट्ट धरलेला नाहीं; पण मूळ मजकुरातील अर्थ, समर्पकता व माधुर्य हीं टिकवून धरण्याची खटपट साधली तितकी केली आहे" असें ते प्रस्तावनेंत सांगतात. प्रस्तुत पुस्तक वाचून झाल्यावर प्रा. माटे यांची ही 'खटपट' उत्तमच साधली आहे—फक्त ती कविता वगळून!— असें निःशंक म्हणावेंसें वाटतें. कोणताही उतारा वाचताना त्या त्या स्थळींचा विशिष्ट भाव मनात बरोबर उमटतो. माट्यांना "मराठीचे शैलीकार लेखक" असें यथार्थतेनें म्हटलें जातें त्याचा प्रत्यय या भाषांतरातही आल्यावाचून राहत नाहीं. ठेल्के देशी मराठी वळणाचे शब्द व शब्दसहति यांचा संचय आणि या संचयाचा उचित उपयोग करण्याची कला माटे याजजवळ आहे. भावभावनांच्या सूक्ष्म शलाकाही सुस्पष्टपणें सांगण्याची त्यांची धाटणी एक वेगळाच डौल दाखविते. उताऱ्यांना मराठी पेहेराव चढविताना शब्दप्रामाण्य (शब्दाला शब्द ठेवण्याचें) न पाळल्यामुळें व वरील शैलीच्या सामर्थ्यामुळें आपण भाषांतरें वाचीत आहोंत असें वाटतही नाहीं हें विशेष होय.

'उच्च दर्जाची करमणूक' म्हणून हें पुस्तक रसिकवरांना मान्य व्हावें अशी माटे यांची अपेक्षा आहे. ती अपेक्षा बरोबर आहे हें सांगताना उच्च दर्जाची उद्बोधक करमणूक" असें म्हणून 'उद्बोधक' हा एक शब्द अधिक घालावासा वाटतो. कारण येथें भेटलेल्या थोर व्यक्तींच्या बोलामुळें करमणुकीसंगें मनाचें उद्बोधन लाचिवच होतें.

## अनामिका : : : २३

वि. द. साठे, बी. ए., बी. टी.

जवळ जवळ वयाच्या सुमारें पंचावन वर्षांपर्यंत प्रा. श्री. म. माटे यांनीं ललित वाङ्मय बुद्धिपुरस्सरच लिहिण्याचें टाळलें. तोंपर्यंत ते जीवन सहानुभूतीनें, डोळसपणानें व रसिकतेनें पहात होते. हा सहानुभव व अवलोकन भरपूर झाल्यावरच मग त्यानीं आपली लेखणी ललित वाङ्मयाकडे वळविली. १९४१ सालीं त्यांचें 'उपेक्षितांचें अंतरंग' प्रसिद्ध झालें. त्यानंतर स्वतंत्र ललित कृतींत मोडणारें असें त्यांचें दुसरें पुस्तक 'अनामिका' यात संग्रहित झालेल्या गोष्टींचेंहि मनोगत, 'उपेक्षितांच्या अंतरंगा'प्रमाणेंच सामाजिकाकडे वळलेलें आहे. स्वतः प्रा. माटे यांनीं आपल्या आयुष्याच्या ऐन उमेदीच्या व कर्तृत्वाच्या काळातील उणींपुरीं तीस वर्षे दलित वर्गाच्या खस्ता खाण्यांत घालवलेलीं आहेत. कांहीं विशिष्ट हेतूनें, सामाजिक जागरूकतेनें व ध्येयानें श्री. माटे यांनीं आतापर्यंतचें आपलें आयुष्य घालविलें असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयात आपोआपच सहेतुकता व ध्येयवाद आलेला आहे; परंतु त्यांच्या सर्व वाङ्मयाला वास्तवाची म्हणजे सत्याची भूमिका आहे व त्याच्या जोडीला पदरीं भरपूर रसिकता असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयांत ध्येयवाद, वास्तवता, कला हीं एकमेकांशीं फटकून न राहता परस्परांची उंची वाढविण्याचा प्रयत्न करतात. ध्येयाकरतां कला कीं कलेकरितां कला ही गेलीं कित्येक पिढ्या लढत राहिलेली वाङ्मयीन कुस्ती येथें बरोबरीनें सुटली आहे.

"What then must we do" या आपल्या प्रसिद्ध पुस्तकाची टॉलस्टॉयनें जी अवलोकनाची पद्धति अवलंबिली आहे, तिची आठवण करून देणारीं अशीं हीं दोन्हीं पुस्तकें झालीं आहेत. टॉलस्टॉय हा स्वतः रशियांतील मोठमोठ्या शहराच्या गल्ली-बोळांतून वेळीं अवेळीं हिंडला व त्यानें समाजांतल्या खालच्या थरांतील लोकांच्या जीवनांचीं सांस्कृतिक, नैतिक व

आर्थिक दृष्ट्या पाहाणी केली व नंतर आपले अनुभव व मतें त्यांनीं जशीं अत्यंत निःसंकोचपणें व निःपक्षपाती बुद्धीनें लिहिलीं तशीच माटे यांनी महाराष्ट्रांतील दलित व उपेक्षित वर्गांची पाहाणी करून त्याच पद्धतीनें प्रस्तुत पुस्तकें लिहिलीं आहेत.

प्रथम अनामिकेंतील कथाची, लघु निबंधाची व व्यक्तिरेखांची थोडक्यांत ओळख करून घेणें अवश्य आहे.

'त्याचं धन हरपलें' यांत भिवा-भिमाबाईचें दोतरूपी धन टोळधाडी मुळें कसें हरपलें याचें वर्णन आलें आहे. दोन परस्परविरुद्ध अशा परिस्थितीच्या दर्शनावर आधारलेली अशी ही कथा आहे. परंतु या दोन चित्रांतल्या जड व मानवी रेखा इतक्या ठसठशीत, आकर्षक व भावदर्शी झाल्या आहेत कीं त्यामुळें कथेचा अभाव (Lack of story interest) यात बिलकूल जाणवत नाहीं.

'तातूकाका', 'डाळे, मुरमुरे, पोहे!' व 'सगाजीबोवा' हीं तीन केवळ स्वभावचित्रें आहेत. तातूकाका म्हणजे एक अबोल व सामान्य असा गांजेकस कारकून आहे. परंतु त्याच्या नीरस जीवनातले काहीं कप्पे प्रा. माटे यांनीं इतक्या रसिकतेनें दाखविले आहेत कीं या तातूकाकाबद्दल वाचकाच्या मनात औत्सुक्य व सहानुभूति निर्माण होते.

गंगाराम हा अेक 'डाळे मुरमुरे' विकणारा असा फेरीवाला आहे. समाजातल्या उपेक्षित थरांतलाच तो आहे, परंतु माटे यांना सुस्वर गळ्यावर हाक मारणा-या या एके काळच्या पट्टेवाल्याच्या जीवनात संगीत काव्य आढळू शकलें. या रेखाचित्राची सजावट अत्यंत मनोवेधक आहे. आधुनिक तीन अंकी नाटकांत ज्याप्रमाणें अगदीं वेचक पण अत्यंत उत्कट अशा घटना असतात त्याप्रमाणें श्री. माटे यांनीं गंगारामाच्या जीवनांतील नाट्यपूर्ण भाग-घरांत, मैदानावर व रस्त्यांत अशा तीन प्रवेशांत अत्यंत मार्मिकपणें व कलात्मकतेनें वाचकांपुढें मांडला आहे. गंगारामाच्या शाळेंतील 'तालेवारीचा' भरभराटीचा काळ, संसारिक जीवितांतील अपयश व शेवटीं अेक म्हसरू पुढें चालून जाणारें त्यांचें ध्यान-हीं तिन्ही दृश्यें खरोखरीच आधुनिक तीन अंकी नाटकाइतका आकर्षक, उत्कट व जीवंत अशीं झालेलीं आहेत.

सगाजी बुवा म्हणजे अेका मांगवाड्यांतील 'अेक अपूर्वाचें माणूस

होतें' असें कथन करावें अशा स्वरूपाचा कोणताच वृत्तांत त्याच्या जीवनांत वास्तविक रीत्या नाहीं; परंतु हीच गोष्ट प्रा. माटे यांच्या प्रस्तुत कथेचा विषय आहे. सगाजी मांगाच्या जीवनांत मानवी आशा-आकांक्षांचा, विकारांचा अंकुरच कधी फुटलेला दिसत नाहीं. याचें कारण काय असावें याची माटे यांनी येथें मोठ्या आस्थेनें व बारकाईनें चर्चा केली आहे व शेवटीं एका मोठ्या सामाजिक अन्यायाची आपल्याला जाणीव करून दिली आहे. ते लिहितात, "त्याला ( सगाजीला ) मन होतें; त्याला बुद्धि होती; त्याला भावना होती; त्याला आकांक्षा होती; परंतु त्याला मानवकोटीच्या पहिल्या रस्त्यावर पाऊल टाकायला सुद्धां संधि नव्हती. तो अस्पृश्य होता. एक उमा मानवप्राणी शंभर वर्षे जगला आणि जगाकडे लांबून पहात शेवटीं आपल्या थिजलेल्या डोळ्यांचे विरलेले जीर्ण पडदे त्यानें कायमचे लावून घेतले."

'पहिला वसंत' माट्यांच्या कल्पनाशक्तीचा भव्यपणा, अफाटपणा व उत्कटपणा ह्याची कल्पना आणून देतो.

याच्या अगदीं उलट स्वरूप 'देवाचे खरे लाडके कोण!' या लघुनिबंधाचें आहे. यांतहि केवळ कल्पनाविलास आहे, परंतु त्याला पहिल्या वसंताचा कस बिलकुल आलेला नाहीं. हा निबंध वाचीत असताना काळकर्ते शि. म. परांजपे यांच्या कित्येक लकबींची व शैलींची आठवण अतिशय होते. परंतु रूपकात्मकता, अन्योक्ति, उपहास वगैरेंच्या सहाय्यानें ते ज्याप्रमाणें प्रतिपाद्य वस्तु कितीहि माफक महत्वाची असली तरी तिच्यांत रस, रूप, रंग निर्माण करीत तसें करण्याचें प्रा. माटे यांच्या लेखणीच्या टिकाणीं सामर्थ्य असतांनाहि त्यांनीं प्रस्तुत निबंधात न केल्यामुळें वाचकांचा अपेक्षाभंग होतो.

'सगळीं माणसें जख्ख होऊन मेलीं असतीं तर!' व 'एका वृद्धाश्रमाची बाताहात!' हे दोन्ही निबंध वृद्धाच्या जीवनासंबंधानें आहेत. परंतु पहिल्यांत माटे यांचा दृष्टिकोन अत्यंत गंभीर अशा तत्वशोधकाचा असल्यानें त्यांनीं त्यांत आत्म्याच्या तत्त्वज्ञानाचा उगम कसा झाला असेल याची विचक्षणा केलेली आहे; तर दुसऱ्यांत अगदीं अवखळ स्वैर अशा वृत्तीनें त्यांनीं एका वृद्धाश्रमाच्या बाताहतीचें अत्यंत विनोदी असें वर्णन केलें आहे.

'मी आले म्हणून तू सुटलास!' ही एक वेडी धरमाल्कीण जिजाई व १९०९ च्या सुमाराची राजकीय परिस्थिति यावर आधारलेली अशी केवल विनोदी लघुकथा आहे. गोष्ट अतिशय रंगदारीने लिहिल्यामुळे शेवट पर्यंत वाचणाऱ्या मनावरची तिची पकड यत्किंचितहि ढिली पडत नाही, परंतु डोळस रसिकाला मात्र प्रस्तुत कथा जिजाईचें वेड व तत्कालीन राजकीय परिस्थिति या दोन अत्यंत विसंगत अशा धाग्या दोऱ्यानीं विणण्या तील हेतु न कळल्यामुळें एक प्रकारचें असमाधान व अपेक्षाभंग झाल्या सारखें वाटतें!

'देवकाईची देवकी झाली!' ही कथा म्हणजे उपेक्षिताचे अंतरगा-तील 'नायनाक आणि देवकाशी याची काळक्षेप' या कथेचा पुढचा भाग आहे प्रस्तुत कथेत रंग भरण्याचा माटे यानीं अटोकाट प्रयत्न केला आहे, परंतु प्रस्तुत गोष्टीला एका ध्येयवादी भाविक माणसाच्या स्वप्नापलि कडे विशेष किंमत आलेली नाही.

'अनामिके' ला उपेक्षिताच्या अंतरगाप्रमाणें वास्तवाची म्हणजे सत्याची भूमिका आहे, परंतु प्रस्तुत पुस्तकातील प्रस्तावनेंत त्याचा खुलासा प्रा माटे यानीं केलेला नाहीं तो अवश्य करावयास हवा होता 'अनामिकेंत' प्रामुख्यानें काहीं व्यक्तिचित्रें, लघुकथा व निबंध आहेत मराठी वाङ्मयात उल्लेख करण्यासारखीं अशीं व्यक्तिचित्रें, रेखाटणारीं तीन पुस्तकें आहेत. 'प्रकाशातील काही व्यक्ति' (पाध्ये), 'स्वभावचित्रें' (दिवेकर), 'काही म्हातारे व एक म्हातारी' (घाटे) परंतु माटेयाच्या व्यक्तिचित्रात जो बारकावा, रेखीवपणा व ठसठशीतपणा आहे त्यामुळें त्याचीं उंची व दिमाख हीं विशेष डोळ्यात भरतात भिवा, भिमाबाई, तातुकाका, सगा नी बोवा, गंगाराम, दौलती, जानू, रख्मा हीं सर्व स्वभावचित्रें नवोदित लेखकानीं व विद्यार्थ्यांनीं नित्यासारखीं डोळ्यापुढें ठेवावींत अशीं झालीं आहेत

प्रा माटे याची कथा-कथनाची शैली ही 'कँटबरी टेल्स' सागणाऱ्या प्रसिद्ध आँग्ल कवि चॉसर याच्यासारखी अत्यंत साधी पण आकर्षक अशी आहे. अत्यंत बारकाशीनें पण मार्मिकपणें तपशीलवार हकीकत देणें, अत्यंत साधे भोळेपणानें काहीं आडपडदा न ठेवता कथा सागत असल्याचा आव आणून

मध्येच अगत छद्मी असे वाक्य व उद्गार मिस्किलपणे काढणें, अत्यंत रसाळपणें कथेचा ओघ चालू असताना मध्येच उगाच काही अनावश्यक व माफक महत्त्वाची माहिती किंवा काही रुक्ष असे विचार येणें या सर्व खास चौसरच्या लकबी त्या माटे याच्या लिखाणात वैपुल्यानें आढळतात

प्रस्तुत पुस्तकाच्या भाषाशैलीतहि श्री माटे यानीं 'उपेक्षिताचे अतरग' प्रमाणेंच 'नागर व ग्रामीण अशा दोनहि भाषाचा सकर' बुद्धिपुर सर केला आहे आणि त्यामुळेंच अनामिकेला लोकवाङ्मयाचा साधेपणा, सोपे पणा, ठसका जसा आला आहे तसाच उच्च वर्गाच्या ललित वाङ्मयाचें लालित्य, सौष्ठव, व बारकावाहि आलेला आहे.

माटे याची भाषालकाराची दौलत विलोभनीय आहे या दौलतीच्या थाटाची कल्पना येण्यापुरती काही उदाहरणें देण्याचा माझा विचार होता. परतु स्थलाभावीं तो मला आखडता घ्यावा लागत आहे.

माटयाच्या विनोदाचें आणखी अेक वैशिष्ट्य 'अनामिकेंत' वैशिष्ट्यानें लक्षात येतें एकदा मनुष्य बुद्धिपुर सर अतिशय उघडपणें (Matter of fact) पण भावनाशून्यतेनें बोलू लागला कीं त्याची ती रुक्ष वृत्ति हाच अेक विनोदविषय होतो माटयाच्या लिखाणात ही तऱ्हा वैपुल्यानें आढळते. उदाहरणार्थ—

"आपण म्हणतों कीं मुलें चागलीं, देवाचीं लाडकीं, निरुपद्रवी आणि गोड असतात पण तें खरें नाहीं! त्याना काहीं शहाणपण नसतें दुसऱ्याच्या भावनाची त्याना कल्पनाहि नसते आणि अवगुणास किंवा शारीरिक व्यगास फिदी फिदी हसण्यात त्याना कसलाहि सकोच किंवा लाज वाटत नाहीं .. काय वाटेल तें म्हणा, पण लहानपणीं आपल्याला अक्कल कमीच असते" (पृ ५) "मरताना त्याचें (सगाजी) वय शभरचे वर असावें माणूस शभर वर्षे जगतें हें वेदवाक्य त्यानें वर्षानुवर्षे ऐकलें नव्हतें, पण त्याप्रमाणें तो सहजगत्याच वागला होता" (पृ १३२)

'अनामिके'च्या स्वरूपाची थोडक्यात कल्पना देऊन तिचें तत्त्वदृष्टया— (कथा व भाषाशैली, स्वभावप्रदर्शन, विनोद, अलकार) विवेचन केलेलें आहे व त्यावरून तिला मराठी ललितवाङ्मयात किती वैभवाचें व उच्च असें स्थान मिळू शकेल याची कल्पना वाचकाना येऊ शकेल.

---

# प्रा. श्रीपाद महादेव माटे : : २४

(ले. प्रो. : विष्णु बापूजी आवेकर, एम् ए)

प्रा श्री. म. माटे यांच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाली आहेत. या साठ वर्षांपैकी सुमारें पसतीस वर्षांचा काळ त्यांनीं आपली व्यक्तिमत्ता लोकांपुढें अनेक मार्गांनीं प्रकट करण्यात घालविला. निरनिराळ्या सामाजिक, राजकीय आणि शैक्षणिक पद्धतीबद्दलची व पद्धतींबद्दलची आपली निष्ठा त्यांनीं आपल्या ऐन पचविशीच्या काळात पक्की करून घेतली. त्यांचे मनोधर्म या बाबतींत काहीं काहीं विचारपद्धतींशीं इतके एकजीव झालेले आहेत कीं, त्यानंतरच्या तीन तपातील पुढल्या सर्व उद्योगात या मनोधर्मांचा मोठा मनोहर–विलास हरेक प्रसगीं लोकांना पाहावयास सापडला. प्रा माटे यांच्या कर्तबगारीचा बराचसा भाग प्रत्यक्षात उतरला तो गेल्या पचवीस वर्षांत विशेषत लेखनभाषणद्वारा आपल्या आवडत्या विषयावरील मतांचा पुरस्कार करण्यात त्यांनीं जें वैशिष्ट्यपूर्ण यश मिळविलें आहे तें आजच्या पिढीसमोरच होय. पण म्हणून त्यांच्या काहीं आवडीनिवडी आणि तत्त्वश्रद्धा यांची निपज चालू पिढींतल्या विचारमंथनातूनच केवळ झाली आहे असे नाहीं. एकाद्या गवयानें आपल्या पूर्ववयात विशिष्ट घराण्याची गायकी विशेष मेहनतीनें आत्मसात् केलेली असावी आणि नंतरच्या काळात कुठेंहि ऐकलेल्या एकाद्या नवीन गाण्यांची सुरावट आपल्या गळ्यात खेळवून दाखवावी तसें प्रो. माटे यांचें आहे प्रो माटे यांनीं गेल्या तीस वर्षांतील अनेक शास्त्रीय सार्वजनिक कार्यक्रमात उत्साहानें, आवेशानें, आणि पुढारीपणानें ठसठशीत कामगिरी करून दाखवली आहे. पण या सामर्थ्यवान् कामगिरीची त्यांनीं जी बौद्धिक शक्ति दाखविली तिची पैदास मागल्या पिढींतल्या संस्कारातून त्यांनीं करून घेतलेली होती हें विसरून चालणार नाहीं त्यांच्या विचार धनाची जोपासना मागल्या पिढींतल्या प्रत्यक्ष जीवनक्रमातील अनेक

व्यक्तींच्या आणि संस्थांच्या योगक्षेमानें कळत न कळत झालेली होती त्याचें अंतःकरण विवेकपुष्ट बनलें तें त्यांच्या तारुण्य काळांतील महनीय सार्वजनिक प्रसंगांच्या प्रत्यक्ष दर्शनानें आणि चिंतनानें त्यांच्या हृदयाचा जिव्हाळा घडविला गेला तो त्या काळातील सार्वजनिक सुखदुःखांच्या साक्षात अनुभवानें त्यांच्या मनोभूमींत रुजलेल्या अनेक ध्येयांची परिस्फुटता होत गेली ती त्या काळातील विविध उज्ज्वल व्यक्तींच्या चरित्रक्रमावरून आणि त्यांच्या आयुष्यक्रमातील चालचर्येला जी तात्त्विक बैठक लाभली तीहि त्या ओनदवी काल खंडातील निरनिराळ्या घडामोडींच्या प्रत्यक्ष प्रचीतीनें कौटुंबिक, भौगोलिक आणि ऐतिहासिक परिणामांच्या सामदायिक संस्थांतून प्रो. माटे यांची मूस ओतली गेली आहे त्यांचा स्वाभाविक तरतरी आणि बुद्धीची कुशाग्रता यांनीं त्यांना एकसारखा हात दिला हें तर खरेंच, पण पाण्याच्या प्रवाहाला जीवत राहाण्यासाठीं सखल जमिनीचें लेंग एकसारखें मिळावें लागत त्याप्रमाणें अगच्या उपनत हुशारीला आणि स्पूर्तीला एकसारखें वळण मिळत राहावें असें वातावरण त्यांना त्यांच्या ऐन विद्यार्थिदशेच्या काळात लाभलें असें म्हणण्यास हरकत नाहीं त्यांचा विद्यार्थिदशेचा काळ उत्पत्ति घटनांच्या प्रत्यक्ष अवतरांचा, आणि इतिहासातील तसल्याच घटनांच्यापासून एकसारखी स्फूर्ति मिळविण्याचा होता

ज्या भूमींत मनुष्य जन्म पावलेला असतो तिचा परिणाम जसा त्याच्या शरीरप्रकृतीवर होतो, तसा तो त्याच्या मनोवृत्तीवरहि होतो असें म्हणतात या बाबतींत केवळ एकाद्या प्रदेशाच्या अभिमानानें काहीतरी अवास्तव परिणाम त्या प्रदेशांतील माणसावर झाल्याचें अतिरिक्त वर्णन कित्येकजण करतात तें अयोग्य असलें तरी असला परिणाम कसकसा होत असतो हें शोधून काढणें गैर असतें असें मात्र म्हणता येणार नाहीं श्री. माटे हे सातारा जिल्ह्यातील या जिल्ह्याला ब्रिटिश अमलापूर्वी महाराष्ट्राच्या मध्यवर्ती केंद्राचें महत्त्व तत्कालीन राजकीय जीवनात आलें होतें त्या जिल्ह्याच्या परिघाभोंवतीं अनेक सरदारांच्या, व सरंजामदारांच्या इनामी उपजांच्या वतनवाड्या होत्या छत्रपतींची राजधानी शिवाजीच्या वेळेपासून जरी निरनिराळ्या ठिकाणीं क्वचित् हालली असली तरी सातारकर छत्रपति हा प्रयोग ऐतिहासिक कागदपत्रात आजार रूढ होऊन बसलेला आहे रामदासस्वामींच्या परि-

गाराचें मुख्य वास्तव्यस्थान परळीपासून चाफळपर्यंत पसरलें आहे तें याच भागात. या जिल्ह्यातील बहुतेक गावांची रचना निसर्गत च सह्याद्रीच्या कडेकपारीतुन झाली आहे म्हणून आजहि आधुनिक नागरी जीवनाचे सोपस्कार या गावापर्यंत जाऊन पोहोंचले तरी ते त्या गावांची रचना आमूलाग्र बदलू शकत नाहींत जिल्ह्याचें मुख्य ठिकाण प्रत्यक्ष सातारा देखील डोंगरउतरणीवरच्या उचसखल भागात वसलें आहे ती त्याची स्वाभाविक घडण नवीन नगररचनेच्या प्रयोगानीं फारशी बदलली जाणें शक्य नाहीं. डोंगरानीं पाठराखणी केली नाहीं किंवा गावाला नैसर्गिक तटबंदी केली नाहीं असें गावें त्या भागात एकदरीनें कमीच. जुना बारा बलुत्यांची संस्कृति आपोआप जपत राहाणारी खेडीं त्या जिल्ह्यात अद्यापहि बरींच सापडतील म्हणून मी माटे याच्या पुढच्या समाजशास्त्रविषयक अभ्यासात आणि कथाविषयक मांडणींत जी अस्सल मराठमोळा संस्कृतीची छाया विशेष प्रमाणात पडली आहे त्याचे कारण बाल्यातलि वास्तव्यभूमीचा गुण हें काहीं—अशीं—असलेंच पाहिजे

समाजाच्या निरनिराळ्या थरातील कारागीर म्हणजे सुतार, गवंडी, सोनार इत्यादि जातींतील लोक जर वाङ्मय लिहू लागतील तर त्याच्या लिहिण्यात त्याच्या त्याच्या व्यवसायक्षेत्रातील उपमानें आणि रूपकें आपोआप येतील हें दाखविण्याकरिता त्यानीं 'मापाभिवृद्धीची सामाजिक दृष्टि' म्हणून जो एक लेख उदाहरणें देऊन लिहिला आहे, त्यातील उल्लेख त्याना मुद्दाम शोधावे लागले नसतील, असें वाटत पावसाचें पाणी ओहोळात जसें अनायासें पडतें, तस हे उल्लेख त्याच्या अनुभवाच्या कक्षेत स्वाभाविकपणें समरस होण्याला त्याचा जन्मगुण काहीं अशीं तरी कारण झाला असलाच पाहिजे शिवाय शिक्षण घेण्याच्या निमित्तानें मी माटे याना कोणत्याही शहरात राहावें लागलें असलें तरी त्या वेळच्या प्लेग, पटका इत्यादि साथी, दुष्काळ आणि अवर्षणें यासारख्या अस्मानी आपत्ति, जातीय दंगे व दहशतवादी क्रांतिकारकानीं सरकारच्या प्रतिकारार्थ केलेल्या चळवळी यासारख्या उत्पाती घटना यामुळें शहरात शिक्षणासाठीं राहिलल्या कित्येक विद्यार्थ्यांना खेड्याचा आश्रय घेऊन थारे पालट करावा लागला म्हणून मी माटे यांच्यासारख्याना त्या काळीं सातारा

जिल्ह्यातील खेड्यातून अनेक वेळा वास्तव्य करण्याचे प्रसंग आले असतील. याचे परिणाम अर्थातच दुहेरी झाले असावेत मोठमोठ्या शहरातून समाज धुरीण व राजकीय पुढारी अज्ञान आणि अन्याय यांच्या निवारणासाठी जें जें काय लिहीत किंवा बोलत होते तें एकांतात राहून आपल्या मनाशीं एकजीव करण्यास त्यांना अवसर आणि निवांतपणा लाभला पण हा निवांतपणा ज्या ठिकाणीं लाभला त्या ठिकाणीं प्रत्यक्ष स्थिति काय आहे आणि उद्धाराचे प्रयत्न तेथपर्यंत कसे पोंचतील याचीहि चिंतनिका त्यांना अशा स्थितीत आपातत करावी लागली निरनिराळ्या मार्गांनीं राष्ट्राचा उद्धार करण्यासाठीं स्वाभिमानी पुढाऱ्यांनीं उभारलेलीं ध्येयें व चालविलेले उद्योग आणि ठिकठिकाणीं पसरलेला उदासीन आणि हतप्रभ समाज यांतील अनन्तर अंतर प्रो माटे यांच्यासारख्या अनेक बुद्धिमान तरुणांना त्या वेळीं भावनाप्रधान बनविण्यास कारण झालें, म्हणूनच म्हणावयाचें कीं, प्रो माटे यांच्या तारुण्यदशेची जोपासना महाराष्ट्रीय समाजाच्या एका विशिष्ट अवस्थेंत झाली आहे.

त्यांच्या विद्यार्थीजीवनक्रमांत त्यांच्यासमोर महाराष्ट्रांतील प्रभावी कार्यकर्ते तेजस्वीपणें तळपत होते टिळकांचा केसरी, शिवरामपंत परांजप्यांचा काळ, हरिभाऊ आपट्यांची करमणूक, अच्युतराव कोल्हटकरांचा श्रुतिबोध आणि संदेश, पागारकरांचा मुमुक्षु, आठल्यांचा केरळकोकिळ आणि राजवाड्यांचें ऐतिहासिक साड प्रकाशन असे अनेक प्रकार चे प्रभावी व्यवसाय त्या काळीं आपल्या कार्याची शीग रचीत होते हे सारे प्रयत्न त्या वेळच्या तरुण अंतःकरणाचीं स्फूर्तिस्थानें होत त्या वेळच्या तरुण विद्यार्थ्यांना या साऱ्या विविध कार्यप्रणालींच्या देखाव्यानें आपापल्या मगदुराप्रमाणें कांहींतरी सामाजिक कार्य करण्याची स्फूर्ति होणें सर्वस्वी अपरिहार्य होतें करमणुकींचीं साधनेंहि जागृतीसाठीं वापरावींत अशी त्या काळची एक अलिखित शिस्त बनली. या शिस्तीचा उगम गेलेल्या स्वराज्याचा दुरंत अभिमान आणि प्रचलित उदासीनतेचा कडवा निषेध यांतूनच झाला होता. आपण टाकाऊ नाहीं, दुसऱ्याकडून उद्धार करून घ्याव्याइतके निष्क्रिय व लाचार नाहीं, हा त्या काळच्या जागृतीचा प्रमुख परवल होता घेऊन उठावें आणि कांहींतरी सामाजिक कार्य करावें. हा त्या काळचा सामाजिक मनोधर्म बनला होता. वाणी व लेखणी यांचा उपयोग रंजविण्यापेक्षा रजस्यागाजेस्यांच्या उद्धाराचे

मार्ग शोधून काढण्यासाठी व्हावा हा त्या काळचा एक आवश्यक आचारयोग बनला होता जुन्या संस्कृतीचे प्रभावी पुनरुज्जीवन आणि नवीन संस्कृतीशी समन्वयबुद्धीने विकासवादाच्या अनुषंगाने तिची सांगड घालण्याचा प्रयत्न हे त्या काळच्या सामाजिक जागृतीचे विशेष होते

प्रो माटे यांनी ज मभर शिक्षकाचा पेशा पतकरला होता त्या पेशाला आनुषंगिक असा लेखनव्यवसाय त्यांनी केला पण ते मन पिंडानेच शिक्षक आहेत शाळेच्या बाहेरच्या जगातहि ते शिक्षकच आहेत त्यांनी एन तारु ण्यात विशेष मोठी सार्वजनिक कामगिरी केली ती अस्पृश्यता-निवारणाची. आगरकराचे अग्रेसर अनुयायी कै देवधर हे प्रो माटे यांचे विद्यार्थीदशेतील गुरु होते आपल्या शिष्यांच्या ठिकाणी सामाजिक अ यायाची चीड उत्पन्न करण्याचे देवधरांचे सामर्थ्य फार मोठे होते असे म्हणतात त्याचा परिणाम प्रो माटे यांजवर झाला असल्याचा बराचसा संभव आहे तरी पण त्यांच्या विद्यार्थिदशेतील केसरी व काळ या वर्तमानपत्रातील निर निराळ्या विषयांवरील लेख पाहिले तर त्यापासूनहि प्रो म टे यांच्या अस्पृ श्यता निवारणाच्या कार्याचे बीज कशात आहे याचा काहीसा बोध होतो खिस्ती धर्मप्रसारकांचे त्या वेळी जे प्रय न चालू होते त्यावर केसरीत व काळात अनेक लेख आले होते १८९७ सालच्या दुष्काळानंतर उठलेल्या धर्मांतरा या वावटळीचा त्या वेळी या लेखांनी प्र तिकार केला मुंबईचे लॉर्ड बिशप र डॉ मॅकूमॉर्थर यांनी १९०१ साली लंडन येथे व्याख्यान देऊन असे मत प्रतिपादन केले होते की, हिंदुस्थानातील लोकांनी आपापले धर्म सोडून खिस्ती धर्माची दीक्षा घ्यावी, म्हणजे त्यांचे एकराष्ट्र तयार होईल ! त्यावर खिस्ती धर्माची वाढ आणि खिस्ताची आज्ञा हे लेख काळ मध्ये आले होते केसरी कर्त्यांनीहि त्या वेळी ' ज न्हा नाही तर मरा " हा लेख लिहून धर्मांतराच्या प्रचाराला उत्तर दिले होते ' ईश्वर विभु आणि नित्य आहे ' या मथळ्याखाली ' काळ ' मध्ये तीन लेख आले होते. अशा प्रकारची धर्मांतराची प्रवृत्ति समाजात फैलावण्याचा संभव होता ता समाजातल्या खालच्या थरांतील म्हणजे अस्पृश्य लोकातच होय चांगली साडी नेसावयास मिळण्याच्या आशेने खिस्ती झालेल्या मुलीच्या मातंग मावाचे दु ख कुणी कधी वाङ्मयातून वर्णिले आहे काय अशा आशयाचा प्रश्न प्रो माटे यांनी

जो एकदा एका भाषणात विचारला आहे, त्यावरून तत्कालीन धर्मोतराच्या व्यवहाराबद्दल तरुण शिक्षितांना काय वाटत होते त्याचा बोध होतो

महार, मांग, चांभार इत्यादि जमातींतील मुलांना शिकविण्यासाठी त्यांनी शाळा घातल्या. प्रौढांना आपल्या भवितव्य बद्दल विश्वास उत्पन्न व्हावा म्हणून त्यांच्यात मिसळून त्यांनी पुष्कळ भाषणे केली. वरवली तितक्या प्रमाणात पदरमोडहि केली पण माटे यांचे प्रयत्न योग्य ज्ञानदान करून सर्वांना चांगली समजूत आल्यावर त्यांची बौद्धिक, नैतिक, सांस्कृतिक आणि मानसिक उंची वाढावी, व त्यानंतर आपोआपच त्यांचा अस्पृश्यपणा झडत जाईल अशा स्वरूपाचे होते ते त्यांच्या सुखदुःखाशीं समरस होऊन त्यांच्याबद्दल सहानुभूति बाळगीत होते, त्यांचे पुढारीपण करीत होते हेतु हा कीं, सहानुभूति, मार्गदर्शन आणि ज्ञानार्जन या मार्गांनी हे लोक सबुद्ध व्हावेत पण हिंदुस्थानातील राजकीय लोकशाहीनें मताधिकार सार्वत्रिक करताना अज्ञानी लोकांनाहि मताचे अधिकारी बनविले. आमच्या स्थानिक स्वराज्याच्या कारभारात लोकशाहीच्या मूलभूत हक्काचा देखावा कायदेशीर रीतीनें चांगला झाला पण व्यवहारानें मात्र हा देखावा सर्वस्वी हानिकारक ठरला राजकीय हक्काच्या प्राप्तीनें आणि स्वार्थानें अनायासें व सोप्या मार्गानें उद्धार होण्याची जी हौस समाजातल्या सर्वच थरांना एकदम हावभरीपणानें उत्पन्न झाली ती माटे यांच्या प्रयत्नाचा उत्साह भंगून टाकणारी ठरली. मतदान कशासाठी करावयाचें याबद्दलची लोकांची नीट तयारी झाली नसताना त्यांच्या हातीं अधिकार स्वीकार आणि हक्क-विस्तार यांच्या सनदा देणें सहानुभूतीच्या दृष्टीनें योग्य ठरलें तरी खऱ्या लोकशाहीच्या दृष्टीनें गोंधळाचें ठरल्याशिवाय राहाणार नाही. असें ज्या विवेकी लोकांना वाटतें त्यांपैकी प्रो. माटे हे एक आहेत आमच्या राजकीय प्रचाराच्या धुमश्चक्रींत हें म्हणणें फारसें लोकप्रिय ठरणारें नसलें तरी तें सर्वस्वी गैरवाजवी आहे असें म्हणणें सयुक्तिक ठरेल असें वाटत नाहीं बंदिस्त प्राण्यांना नुसतें मोकळ्या रानात सोडून देऊन त्यांना स्वातंत्र्य लाभलें असें होत नाहीं त्यांच्या चारा पाण्याची काहीं तरी निश्चित योजना हवी. त्याचप्रमाणें अज्ञानात खितपणाऱ्या वर नुसती शिंगें रेखावयास लावून आणि तसें प्रत्यक्ष करावयास लावून काहीं फलदेय होईल असेंहि नाहीं हक्काची जाणीव होणें वेगळें

आणि मनोरचना सुसस्कृत बनणें वेगळें! मात्र यांच्या कार्यपद्धतीचा भर अस्पृश्यांची व स्पृश्यांची अशा दोघांच्याहि मनोरचना एका विशिष्ट पातळीवर एकमेकींशी जुळत्या करण्यावर होता. हें अंतर न तुटता हीं निरनिराळ्या थरांतील माणसें एकत्र आलीं तरी त्यांतून काहींहि निर्णायक घटना निर्माण होणार नाहीं हा विचार आजहि अगदींच दृष्टीआड करण्यासारखा आहे असें नाहीं.

आपल्या 'अस्पृश्यांचा प्रश्न' या ग्रंथांत त्यांनीं या विषयाचें तात्त्विक आणि व्यावहारिक विवेचन केलें आहे. आपल्या वीस वर्षांच्या अनुभवाचें वर्णन त्यांनीं आपल्या 'अनामिका' या पुस्तकांतील 'सगाजी' या व्यक्तिचित्रांत फार मार्मिक आणि विदारक पद्धतीनें केलें आहे. "सगाजीनें मागवाड्यांतील एकूण चार पिढ्या पाहिल्या. पण सगाजीच्या जीवितांत कशलाहि फरक पडला नाहीं. ऐंशीं-पंचायशीं वर्षें एक वेळापत्रक चालू होतें. न बोलावता नवा दिवस येई आणि जुना होऊन तो निरोप घेऊन निघून जाई. एक सबंध मानवप्राणी शंभर वर्षें या पृथ्वीवर राहिला अन् कशाचीहि दाद न लागता निघून गेला." संधि मिळाली असती तर सगाजीनें काय काय केलें असतें त्याचें वर्णन करून प्रो. माटे म्हणतात, 'पण सगाजीची अडचण यांच्याहि पुढची होती. त्याला मानवकोटीच्या पहिल्या रस्त्यावर पाऊल टाकायलासुद्धा कधी नव्हती तो अस्पृश्य होता.' प्रो. माटे यांनीं वर्णन केलेल्या सगाजीबुवाला मतदानाचा हक्क मिळाला तरी त्यांत काय फरक होणार होता? हरताचा पाऊस पहाडावर आपटला तर काय पीक थोडेंच येणार आहे! या अस्पृश्यजातींच्या सुखसमृद्धीचें सर्वांगीण पीक यावयास हवें असेल तर त्यांच्या करकृतींची मशागत करावयास हवी हा आपल्या वीस वर्षांच्या कार्यपद्धतीचा अनुभव त्यांनीं सांगितला आहे.

"अस्पृश्यांच्या डायरींतील पानें" हा लेखहि असाच अस्पृश्यांच्या आजच्या जीवनांतील हीनदीन स्थितीचें चित्रण करणारा आहे. सगाजीच्या घरीं झालेल्या एका संवादाच्या मिषानें तर प्रो. माटे यांनीं आपल्या कार्यपद्धतीचा शेवट काय झाला त्याचें विलक्षण विषण्णता उत्पन्न करणारें वर्णन केलें आहे. सगाजी लेकीला म्हणतो, "कोन् हाइ ग?"

लेक—अव, त्ये आपल मास्तरजी नव्हत का!

सगाजी—मास्तरजी ? कोन मास्तरजी !

मी—सगाजीबाबा ! अहो, आपला तो पार नव्हता कां ?

सगाजी—हां, हां.

मी—त्याच्यावर आपली शाळा नव्हती का ?

सगाजी—हां, हां.

मी—अन् मी रोज येत नव्हतों कां ?

सगाजी गप्प बसला अन् खजील झाला. लेकीकडे वळून म्हणतो, " कोन बोलतया काय नूं ! "

थोडक्यांत पण किती स्पष्टपणानें आणि रेखीवपणानें अस्पृश्याच्या जीवनाची एकच झिजलेली आणि सर्वांनीं त्याज्य मानलेली चाकोरी प्रो. माटे यांनीं वर्णन केली आहे !

हें अवधान सुटल्यावर त्यांचें लक्ष साहजिकच आपण शिकवून तयार केलेल्या पांढरपेशा समाजातील सुबुद्ध थराकडे वळलें. सर्वसामान्य दृष्टीलाहि जे दिसत होतें, तें प्रो. माटे यांनाहि दिसलें. लोक परतंत्र आहेत, भाषा मृतकल्प आहे, आणि विचारसाधन करणारे वरिष्ठ वर्गीय लोक राज्यकर्त्यांच्या भाषेच्या आश्रयानें विचारप्रदर्शन करीत आहेत, बुद्धीच्या पोषणासाठीं कोणत्या विचाराची मागणी करावी यासंबंधानें. असंख्य अशिक्षित वायचळलेले आहेत, मूठभर शिक्षित लोक आत्मकेंद्रित होत आहेत, वरवरच्या उत्तान विचारांच्या प्रसाराची भर करण्यांत वाङ्मय लेखक चूर होत आहेत, आजच्या काळांतील ज्ञानाचे दरवाजे बहुसंख्यांना अद्याप दुरूनहि दिसेनासे आहेत इत्यादि कल्पना मनाला पटल्यात अशीच त्यांची मनोरचना या काळापर्यंत घडत आली होती. कारण त्यांच्या विचारपद्धतीचें एक टोक गेल्या पिढींतील जाज्वल्य प्रचारकांच्या ध्येयनिष्ठेशीं चिकटलेलें होतें. समाजसंस्था म्हणून जगावा आणि सामर्थ्यसंपन्न व्हावा तर तो विवेकपुष्ट बनला पाहिजे. विवेकपुष्टता ही ज्ञानप्रसार व ज्ञानसंपन्नता यांवर अवलंबून असणार हें ओळखून त्यांनीं या कार्याला हात घातला. महाराष्ट्र सांवत्सरिक, विज्ञानबोध, आणि केसरी प्रबोध या ग्रंथांचें त्यांनीं केलेलें संपादन या विचार पद्धतींतून निर्माण झालें आहे. विज्ञानबोधाच्या सविस्तर प्रस्तावनेंत त्यांनीं आपली भूमिका स्पष्ट मांडली आहे.

प्रो. माटे याची दृष्टि पुष्कळ अशी समाजविकासाच्या अभ्यासकाची आहे परंतु, परिपाठी, इतिहास इत्यादि शब्दाचे सारे संकेत ध्यानात घेऊन स्वकीयाची ज्ञानवृद्धि होत राहिली पाहिजे ही त्याची निष्ठा आहे. पाश्चात्य विचार आपल्या पौरस्त्य परंपरेशी साधून घेताना ते लोकाना अगवळणी पडण्याइतका आपल्या वृत्तीतला वाटला पाहिजे. या महाराष्ट्रात निरनिराळ्या राजवटी नादल्या व निरनिराळ्या कालखडात अनेक समाजव्यवस्था यादीस लागल्या. गणसंस्थेच्या बाबतीत राजशाहीपर्यंत मातृसत्तेपासून पितृसत्तेपर्यंत कुटुम्बव्यवस्थेत, आणि बारा बलुत्यापासून शंकराचार्यापर्यंत समाजव्यवस्थेत अनेक उलाढाली होऊन गेल्या आहेत. या साऱ्याच्या समवायातून आज महाराष्ट्र आपल्या अगोपागातील निरनिराळ्या नसातील सारे जीवनरस खेळवीत आहे येथे तत्त्वज्ञानाच्या वाङ्मयापासून लावण्यापोवाड्यापर्यंत सारे प्रवाह एकत्र मिसळून वाहिले आहेत. त्यामुळे विशिष्ट प्रकारचे एक हिंदी व मराठी मन तयार झाले आहे त्या मनाची आजची अवनत स्थिति नाहीशी होण्यासाठी समाजात अनेक ज्ञानशाखा एकसारख्या समृद्ध होत गेल्या पाहिजेत, लोकाची परंपराबुद्धि, भोळी श्रद्धा, आणि प्रवाहपतितप्रमाणे वागण्याची लाचार वृत्ति ही धार पालटून गेली पाहिजेत, पण भाषा, व्यवहार, पोशाख, ज्ञान, समाजव्यवस्था, धर्मव्यवस्था, सघटना, राजकीय हक्क, विद्यादान आणि विज्ञानोपासना इत्यादि अनेक सास्कृतिक जीवनरसासबंधी विचार करताना किंवा त्यात फरक करताना विकासाच्या कोणत्याहि टप्प्यावर यातील प्रत्येक गोष्टीच्या मूळ खऱ्या सत्त्वाला थोडा देखील धक्का लागता कामा नये, असे त्याचे मत आहे. आणि त्यानी ज्या काळापासून स्फूर्ति घेतली त्या काळातील लोकप्रिय समाजसुधारणाच्या आवडत्या धोरणाचाच हा विस्तार आहे हे चटकन ध्यानात आल्याशिवाय राहात नाही.

आज प्रो. माटे यांच्या मताप्रमाणे विपण्ण आणि व्याकुळ स्थितीतला हा समाज साक्षर, शहाणा, ज्ञानलोलुप आणि सघटित बनला पाहिजे. बौद्धिक व मानसिक दृष्ट्या हा समाज प्रपचातील हरेक सुख दुःखाशी झुंज घेण्याइतका सकस, नि:स्पृह, तेजस्वी आणि कार्यक्षम व्हावा म्हणून संघटित वाङ्मयविषयक प्रयत्नाचे महत्त्व मोठे आहे. कोशरचना ही आपल्या व समाजाच्या जीवतपणाची आणि सामर्थ्याची द्योतक असते.

मापा, समाज आणि त्याची परंपरा टिकवून ठेवण्याचें आणि पुढल्या पिढ्यांच्या हातीं देण्याचें काम कोशरचनेनें होतें काव्य आणि इतर ललित वाङ्मय यांनीं समाजाचा भावना जाज्वल्य असल्याची कमीअधिक प्रतीति येते तर कोशरचना कार्यानें समाजाच्या बौद्धिक पातळीचा आणि तज्ज्ञतेचा अदाज करता येता या साऱ्या गोष्टींचा नीट विचार करून त्यांनीं या तीन प्रयांचें संपादन केलें आहे या कामीं त्यांच्या बुद्धीची आक्रमशीलता फार सुंदर रीतानें व्यक्त झाला आहे शिक्षक या नात्यानें त्यांनीं आपल्या कार्य क्षमतेचा परीघ किती व्यापक करता येतो, हें इतराना उदाहरणानें दाखवून दिलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं

यावरोवरच प्रचलित वाङ्मयनिर्मितीकडे आणि करमणुकीच्या प्रकाराकडे त्यांचें एका ठराविक पद्धतीचें लक्ष आहे पावित्र्य-विडंबनाचा वाद निर्माण करून किंवा अश्लीलतेविरुद्ध निषेधबुद्धि प्रकट करून त्यांनीं श्री कृ कोल्हटकर, अत्रे आणि माधवराव जोशी याजवर आपलें शस्त्र उपसलें दृष्टिकोनाच्या फरकामुळें, या वादांना त्या त्या वेळीं विलक्षण तीव्रता आली आणि प्रा माटे याजकडून स्पष्टोल्लेखार भाषणें झालीं त्या वेळीं काहीं शब्दसमूह आणि कल्पना बोलल्या गेल्या नसत्या तर त्या वादानें गांभीर्य माटे याना अनुकूल अशा स्वरूपात टिकून राहिलें असत यात शंका नाहीं या सर्व वादांच्या वार्तेत माटे यांनीं बरवर पाहता सनातनी बाजू उचलून धरल्याचा भास होतो हें खरें पण या वार्तेत माटे यांची दृष्टि अशी दिसते का समाजाचा बुद्धिभेद आणि श्रद्धाभ्रंश करण्यासाठीं असल्या वाङ्मयाचा नकळत उपयोग होतो त्यांनीं पावित्र्य विडंबन केलें त्याची विवेक निपुणता आणि जीवन विषयक विनोदबुद्धि या गोष्टींना तात्कालिक महत्त्व देण्याइतपत प्रगल्भ आणि प्रौढ असतील, पण या असल्या वर्णनांतील सार किंवा मर्म टिपून घेण्याऐवजी विवेक बळा सर्वसामान्य माणूस त्या लिखाणावर भर देऊन भलत्याच मार्गाला महत्त्व देतात आणि स्वत च्या विकृत भावनाचा उपशम करून घेतात म्हातारी मेल्याचें दु ख नाहीं पण काळ सोकावतो या म्हणीतल्याप्रमाणें गत हाल्याचा फार धमक असतो त्यामुळें, विरामपत परानंदे यांच्या कार्यपद्धतींतून स्फूर्ति घेतलेल्या टीकाकारांना वाङ्मयातील विनोद निर्माण करण्याचें हें कारण मलवत गोष्टी

वर अकारण जोर देऊन मुख्य रहस्यावरून लोकांचें मन उडविण्याहारखें आहे, असें प्रामाणिकपणें वाटतें असें दिसतें. किंबहुना राष्ट्राच्या आजच्या परतंत्र आणि अवनत स्थितींत अमल्या प्रकारचा हास्यरस उत्पन्न करीत बसणें हाच एक अनौचित्यकारक हास्यास्पद विनोदाचा मसला आहे असें या परंपरेंतील माणसांना समाजहिताच्या प्रामाणिक कळकळीमुळें वाटतें हेंच खरें आहे. नाटकें लिहिल्याबद्दल टिळक आपल्या अंतेवाशी अनुयायांना शब्द लावून ज्या कारणाकरिता बोलले, त्याच कारणाकरिता प्रो. माटे यानाहि पावित्र्यविडंबन आणि अश्लीलताप्रसार याचा निषेध करण्याची स्फूर्ति झाली हें ध्यानात घेतलें म्हणजे हा दृष्टिकोनाचा फरक आहे असें म्हणण्यावाचून गत्यंतर उरत नाहीं.

या सार्‍या सार्वजनिक मोठ्या उद्योगाबरोबर त्याचें इतर वाङ्मयलेखनहि चालू होतें. पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ, पंचमानव हिंदुसमाज, अस्पृश्यांचा प्रश्न, विज्ञानबोधाची प्रस्तावना, मधूस सांगितलेल्या गोष्टी, रसवंतीची जन्मकथा, साहित्यधारा, आपपलें हितगुज, उपेक्षितांचें अंतरंग आणि अनामिका इतकीं पुस्तकें त्यांनीं प्रकाशित केलीं आहेत. कोणत्याहि बाबतींत सर्वसामान्य लोकांपुढें नमुनेदार आदर्श उभे करावेत या प्रेरणेनेंच त्यांनीं यातील बरेंचसें लेखन केलें आहे. "आम्ही वर्तमानपत्र लिहितों असें मुळींच नाहीं. आम्ही काय करतों, तर देशांतील तीस कोटी प्रसिद्ध न होणारी वर्तमानपत्रें प्रत्येक आठवड्याला अत्यंत काळजीपूर्वक रीतीनें आम्ही फक्त वाचून पाहातों, लोकांचे खरे विचार आम्ही खर्‍या शब्दांनीं लिहितों !" या धिप्रामपत पराजप्यांच्या उद्गाराशीं शक्यतों खर्‍याखुर्‍या आचरणानें समरस व्हावें असा प्रो. माटे याचा आग्रह दिसतो. विशेषत: ललित वाङ्मयाची निपज होतांना पांडित्यपणानें व पुस्तकी मार्गानें भावनासुलभतेचें संपादणी करण्यापेक्षा ती आपल्या भोंवतालच्या खर्‍याखुर्‍या जीवनातूनच केलेली अधिक चांगली हें त्याचें मत त्यांनीं व्यासपीठावरून अनेक प्रसंगीं बोलून दाखविलें आहे.

सांगली संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत प्रो. माटे म्हणतात, "आपला समाज अज्ञ आहे, विभिस्त आहे क्वचित् ओंगळ आहे. पण एवढ्यानें त्याला दूर लोटतां कामा नये. त्याचें मनोगत ममत्वानें ओळखण्यास शिकलें पाहिजे. शेतकर्‍याचा मोटवाडा आहे, त्याचें खोपट आहे, त्याच्या मुलींचें

लग्नीन निघालें आहे, त्याच्या मौर्तीला माणसें निघाली आहेत, आणि त्याच्या त्याला पदरानें पाल्वीत चालल्या आहेत, त्याचा मुलगा त्यानें मोकाशाच्या घरीं गुरें राखण्यासाठीं ठेवला आहे आणि तेथें त्याच्या वखवखलेल्या पोटाला पळसाच्या पानाशारख्या दोनच भाकरी मिळत आहेत, सावकाराचें तोंड चुकविण्यासाठीं तो पुण्याला छकडवाला बनला आहे, लिस्ती डागदारच्या पादाला हात लावून तो पाया पडत आहे, पाहता पाहता टोळानीं त्याच्या शेतांचें सौभाग्य नष्ट करून टाकलें आहे ! तर्री हीं दृश्यें बघा व आपलींहीं उद्गगा म्हणजे वाङ्मयाला जीवतपणा येईल जुन्या रंगाच्या पद्धती रमावून बसलेल्या पण नवान माहिता न झालेल्या रंगायाचा प्रपचात भावावलेली वृत्ति आपल्या वाङ्मयात कोठें चित्रित झाली आहे काय ? आपल्या जातीचे जातीचे म्हणतात पण ते सैन्यामाणकाच्या गादीवर बसतात आणि आपण अजून मेढ्याच्या मागें काठी घेऊन तरवडा तून अन् कुसळातून हिंडत आहों, यातील विरोध न समजणाऱ्या तरुण घन गराची मन स्थिति आपल्याला कुठें वाचावयास सापडते का ? केवळ नव्या साडीचें आमिष पडून आपला वहीण खिरस्ती पाद्र्याच्या भलाउणींत साप डला याचें मातमाल झालेलें दु ख कोणीं वर्णिलें आहे काय ? नवी विद्या शिकल्यावर धोतरी गवून दिला आणि सर्कल इन्स्पेक्टर झाले व गेरमाहित गार लोक ' सावत सावत ' म्हणत राहिल्यानें मराठ्यात मंडलें, तरी मुलाच्या लग्नाच्या वेळीं माझ्या बापाच्या घराला घरदान मराठ त्रिचकतात, याचें वाटत असलेलें रामा न्हाल्याचें नवल कोणीं वर्णिलें आहे काय ? याच्या लघुकथा, कादंबऱ्या, कविता व्हावयाच्या नाहींत काय ? "

त्यांच्या या म्हणण्याप्रमाणें त्यांनीं उपेक्षितांचें अतरग आणि अनामिका या कथासग्रहातील आपल्या कथा सजविल्या आहेत त्यांं कथातील निवत भावनाच्या सरळपणाचें आकर्षण वाचकाला एवढें वाटतें कीं, त्यात आधु निक तन्त्रज्ञानीची कलाकुसर कसकशी मावणें आहे ह अनुभवण्याचें त्याला भान राहू नये आणि कलाकुसर साधण्याच कोणतेहि कृत्रिम उपाय अम लात आणण्याचें प्रो माटे याना हि एहसा अगत्य वाटत नाहीं निवेदनाच्या ओघात रसभरित निवेदाळा एकमारका ओघात जाणें हेंच याच्या लेखनाचें सर्वस्व आहे ते रसत आपल्या निवेदन विषयाशीं मोठ्या वृत्तीनें समरस होतात

आणि तशा समरस होण्यानें कथाकथनात जें काय माधुर्य आणि लालित्य येईल तें त्याना अगदीं भरपूर झालेलें वाटतें त्यांची वृत्ति भजन करणाऱ्या भक्ताची आहे, मैफल सजविणाऱ्या गायकाची नाहीं आपण स्वत नादावून तल्लीन झालों कीं लोकहि तल्लीन होतील अशी त्यांची कथालेखनाबद्दलची श्रद्धा आहे त्या श्रद्धेमुळें त्यांच्या लिहिण्यात कुठेंहि अकारण संकोच उत्पन्न होत नाहीं त्याना स्वत ला कथेच्या माजृगागच्या आजच्या इष्टानिष्ट म्हणून ठरलेल्या पद्धतीबद्दल फारसा धसका नाहीं, त्यामुळें त्यांच्या लिहिण्यात भावनांचा आवेश आपोआप उत्पन्न होतो वास्तववाद वा आदर्शवाद या वादांच्या मागें लागून कुठल्या तरी एका प्रकारची कथा कल्पनेच्या कुंचल्यानें रंगवीत बसण्याचा चाळा ते सहसा कधीं करणार नाहीत, आणि केला तरी तो त्याना मानवणारहि नाहीं त्यांच्या कथात अगदी निभळ वस्तुस्थिति आहे त्यामध्यें निर्माणकौशल्य आहे तें कल्पकतेचें नाहीं तर आपल्या स्वतंत्र आणि स्वार्जित अनुभवाशीं कथावस्तूचा एकजीव करणाऱ्या दक्षतेचें आहे त्यात नटव्या साजशृंगारापेक्षा श्रद्धाळु भाविकतेचा भर रसरसून भरलेला आहे त्यांच्या भाषेत सरळतेचें अकारण नवट नाहीं आणि इंग्रजीच्या अन्वेषणाचा नसती पडछाया नाहीं या बाबतीत मराठी भाषेची आणि

होतो. त्यांची वृत्ति कणखर आहे आणि त्यांच्या वाणीत व लेखणीत एक प्रकारची रग आहे. या सान्याचा उगम एका उज्ज्वल परंपरेच्या डोळस भक्तींत आहे. महाराष्ट्रातील या सर्व दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण ठरलेल्या असल्या लेखकाची साठ वर्षे इतिहासात 'अंतरंगाचा एक नमुना म्हणून भूषणभूत होऊन राहतील

---

## गुरुजी—नव्हे पिताजी : , : : २५

सौ इंदुमतीबाई फाटक, बी. ए.

प्राध्यापक माटे म्हटल्याबरोबर त्यांची ती हरिजनसेवा एकदम मनांत येते. "जे का रंजले गांजले त्यासी म्हणे जो आपुले" रंजलेल्या गांजलेल्या लोकाना त्यांनी नुसतेच आपले म्हटले नाही, तर त्यांची दु:खे आपलीच दु:खें समजून त्यांच्यासाठी अविश्रांत श्रम करणारे, अतिदुःखानें व पिढ्यान्‌पिढ्या गांजल्यामुळें जे लोक बधिर झाले होते त्याना त्यांच्या मनुष्यत्वाची जाणीव करून देणारे, त्याना प्रगतीचा मार्ग दाखवणारे, व त्यांच्यासाठी तनमनधन खर्च करणारे माटे स्त्रियांच्या कल्याणाकरितां झटणाऱ्या आगरकरांची पीठिका चालवीत आहेत हा त्यांच्या कर्तृत्वाचा एकच पैलू मला कॉलेज मध्ये जाण्यापूर्वी माहीत होता.

वर्गात आल्याबरोबर त्यांच्या गांभिर्याची, विद्वत्ताप्रचुर भारदस्त भाषेची व वाग्गुणांची माझ्या मनावर एकदम छाप पडली.

*शिवाय त्यांच्या सर्व वृत्तींत एक प्रकारची आपुलकी विद्यार्थ्यांच्या तावडे* तेच प्रत्ययाला येते. त्यांना आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करावयाचें नसतें, वाऱ्याच्या पैरनिर पैरी घेडून आपल्या ज्ञानानें विद्यार्थ्यांना गार करावयाचें

नसते. तर सावकाश प्रत्येक शब्दावर जोर देत विद्यार्थ्यांना कळण्याकरितां विद्यार्थ्यांच्या मार्फत ते शिकवीत असतात. एखाद्या विशाल व शांत नदीच्या प्रवाहाप्रमाणें त्यांची भाषा ओघवती असून त्यात सहज अवगाहन करता येईल इतकी ती निर्मळ असते व तिची चव विसरणार नाहीं अशी मधुर व हृदयस्पर्शी असते.

त्यांच्याजवळ कोणताही अन् कसलाही विषय द्या; तो विषय शुद्ध व सात्त्विकतेचा मुलामा घेतल्याशिवाय बाहेरच पडायचा नाही. काशीकडे प्रेतांना शास्त्रापुरता अग्नि देऊन मग तीं प्रेतें गंगानदीच्या प्रवाहांत टाकून देण्याचा प्रघात आहे व ती गंगामाईही असल्या घाणींना आपल्या पावित्र्यानें आणि शुद्धतेनें पावन करून टाकते तद्वतच त्यांच्या भाषाशैलीचें आहे. मग तें उपेक्षितांचें अंतरंग असो, नायनाक आणि देवकाईचें बलिदान असो अगर वर्गांतील सर्वसामान्य विषय असोत.

एकदा महाभारतातील उद्योगपर्व आम्हांला ते शिकवीत होते. कर्ण व कुंती यांचा कर्णाच्या जन्माबद्दलचा संवाद होता. विद्यार्थी-विद्यार्थिनींचा मिश्र समाज; हा असला विषय; व अगदीं मराठी भाषा! मला भीति वाटत होती! एकदा वाटलें प्रा. गोकाकांच्या प्रमाणें विषयाची रूपरेषा सांगून बाकीच्या विषयाला कलाटणी देतील.

परंतु त्यांनीं स्वच्छ शब्दांत सर्व विवरण केलें. त्या वेळेच्या समाजाच्या नीतिनियमाबद्दल उद्बोधक व्याख्यान दिलें व एकंदरीत मानवाच्या प्रगतीच्या इतिहासातील एक गोष्ट म्हणून त्याकडे पहावयास शिकविलें. समाजाकडे पाहून त्यांतील स्थित्यंतरें सखोल दृष्टीनें अभ्यासावयास जर तुम्ही शिकलां नाहींत तर मग माझे परिश्रम फुकट गेले असें मला म्हणावें लागेल, असें ते म्हणाले,

"मोरोपंतांचा श्रीकृष्ण फार लाडका आहे" असें माटे स्वतः म्हणत असत परंतु खरें पाहिलें असता माटयांची कृष्णभक्ती जशी अत्रे-माटे वादात त्यावर्षी दिसून आली तशीच मोरोपंतांचें आर्याभारत शिकवितांना दिसून येत असे. तुकाराम, रामदास, ज्ञानेश्वरादि कवींच्या वाङ्मयासंबंधीं बोलतांना ते जणू त्या काळांत आम्हांला नेऊन सोडीत. तुकारामाची वैचारिक जागृति, रामदासांचा अखंड कर्मयोग व ज्ञानेश्वरांची ज्ञानप्रवृत्ति पाहून जणू त्या काळच्या संस्कृतीचा कायमचा ठसा विद्यार्थी लोकांवर उमटून राही. जें योग्य 'दिसेल

त्याचा पुरस्कार करणें, जें अयोग्य दिसेल त्याचा प्रतिकार करण, व प्रत्येक अपेक्षिताला अन् उपेक्षिताला मदतीचा हात देणें हा जणू आमच्या सराचा देहधर्मच आहे.

आमच्या वेळेस एका विद्यार्थिनीचे नातेवाईकावर शिंतोडे उडतील असा लेख एका विद्यार्थ्यानें लिहिला तेव्हा सतापून जाऊन त्या मुलीनें त्या मुलाला शासन केलें त्या उलट कृतीबद्दल, कुठें उपहास, कुठें गर्भित टीकाही ऐकू येऊ लागली अशा तऱ्हेनें वागणें स्त्रीजातीला योग्य नव्हे असेंही कोणी स्त्री जातीचे कैवारी म्हणू लागले "आपण चुकलों का ?" अशा काहींशा बावरलेल्या मन स्थितीत ती असतानाच, माट्यानीं भर वर्गात तिच्या धैर्याची स्तुति करून आपल्या सर्व पुस्तकाचा सेट तिला बक्षिस दिला व म्हणाले," अन्यायाचें पारिपत्य करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे व त्या कर्तव्यासाठीं प्रत्यक्ष परमेश्वराला सुद्धा जन्म घ्यावा लागतो " आम्हा सर्वांनाच बरें वाटलें अशा वडिलकीच्या नात्यानें वागणारे गुरुजी अन् ही त्यांची शिकवण मी उभ्या आयुष्यात विसरणार नाहीं

एकदा एका विद्यार्थिनीवरही मोठा बिकट प्रसग आला होता एक समाजा तील प्रतिष्ठित गृहस्थ व बडे साहित्यिक ह्यांना त्या मुलीला आपलें खेळणें बनवायचें होतें गृहस्थाला स्वत त्याच वेवढ्या वयाची मुलगी होती तिला मोठा पचाईत पडली कीं त्याना शिक्षा केली तर त्याच्या साहित्य–शस्त्रांनें ते विनाकारण आपली नाचक्की करतील तेव्हा आम्हा सर्वानुमतें आम्ही प्रा माट्याच्याकडे जावयाचें ठरलें आमच्या अपेक्षेप्रमाणें माट्यानीं तिला यथायोग्य सल्ला दिला व परिणामाची जबाबदारी स्वत वर घेतली व अशा रीतीनें तिची सकटातून सहीसलामत सुटका झाली

आपल्या चारित्र्यानें धडा घालून देणारे, प्रत्येक गोष्टींचें अतरग हुडकून काढण्याला शिकविणारे, जीवन–कलहात धैर्यानें झगडण्यास सागणारे, धैर्य, न्यायनिष्ठा व कर्तव्यतत्परतेचे मूर्तिमत प्रतीक, नुसते प्रोफेसर नव्हेत तर सस्कृतीचें शिक्षण देणारे, धार्मिकतेच बीजारोपण करणारे व आयुर्रेषेप्रमाणें विद्यार्थ्यांच्या मनात कायमचे राहणारे हे गुरुजी नव्हे जणु पिताजीच आहेत असे गुरुजी सर्वांना मिळत गेल्यास आपल्या देशाचा ऊर्जित काळ येण्यास फारसा अवकाश लागणार नाहीं

# विज्ञानबोध-प्रस्तावना : : : २६

(ले. प्रा. रा. श. वाळिंबे, एम. ए.)

## काहीं महत्त्वाच्या सिद्धान्तांचा स्थूल परिचय—

'विज्ञानबोध' या १९३४ सालीं आपण प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाला प्रा. माटे यांनीं जी १९९ पृष्ठांची विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे तिचा अभ्यास करणें आवश्यक आहे. कारण, या प्रस्तावनेंत त्यांची नवीन विज्ञानयुगाकडे पाहण्याची वैचारिक भूमिका पूर्णपणें स्पष्ट झालेली आहे. आगरकरांच्या पद्धतीनें बुद्धिप्रामाण्य व वैचारिक स्वातंत्र्य यांची कास धरून प्रचलित यंत्रयुग व शास्त्रयुग यांच्या स्वरूपाचें सूक्ष्म विश्लेषण करून आतां समाजानें या गोष्टींकडे कोणत्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे याची मोठी मार्मिक चिकित्सा सदर प्रस्तावनेंत प्रा. माटे यांनीं केलली असल्यामुळें आपल्या जगांतील अगदीं नवीन विचाराचा परिचय करून घेऊं इच्छिणाऱ्या प्रत्येक जिज्ञासु मनुष्याला तिचा अभ्यास करणें उपयुक्त ठरेल. या लेखांत मी या उत्कृष्ट प्रस्तावनेंतील काहीं महत्त्वाच्या प्रमेयांचा फक्त स्थूल परिचय करून देणार आहें.

## आधिभौतिक शास्त्रांच्या अभ्यासाची आवश्यकता

आपल्या देशांतल्या नवीन सुशिक्षितांनीं आधिभौतिक शास्त्रांचा अभ्यास नेटानें सुरू करावयास हवा असा प्रा. माटे यांचा आग्रह आहे. आपली भूमिका शास्त्रवैराग्याची नसून आधिभौतिक शास्त्रांचा भरपूर अभ्यास व्हावयास पाहिजे या मताच्या प्रतिपादकाची आहे असें त्यांनीं आरंभीच सांगून टाकलें आहे. याचा अर्थ असा कीं, शास्त्रज्ञ ज्या भूमिकेवरून आपल्या कार्याचें महत्त्व वर्णितात ती भूमिका प्रा. माटे यांची नाहीं, तर, शास्त्रज्ञांनीं लाविलेल्या शोधांचा व्यावहारिक दृष्टीनें कोणता उपयोग करून घेतां येईल व त्यायोगें मानव

जातीचें ऐहिक सुख व मानसिक स्वातंत्र्य कसें वाढविता येईल याचीच प्रा. माटे यांना चर्चा करावयाची आहे. त्यांच्या मतें जगाची जी प्रगति होत आहे ती 'मुख्यत.' शास्त्राच्या अभ्यासानें होत आहे. अगदीं अलिकडेच लागलेल्या महत्त्वाच्या शास्त्रीय शोधाशीं ज्यांचा परिचय नाहीं ते लोक विद्वान् म्हणजे पढिक असले तरी खरोखर मागासलेलेच होत. पूर्वी केव्हा तरी शास्त्रीय शोध अकस्मात्, यदृच्छेनें लागले असतील, नाहीं असें नाहीं पण आता शास्त्रीय अभ्यासाचे मार्ग पक्के झाले आहेत. नवीन शोधामध्यें एक प्रकारचा अनुक्रम दिसून येत आहे. संशोधनाच्या पद्धतीहि बदलल्या आहेत.

या नवीन शास्त्रीय शोधामुळें भौतिक सुखसोयींमध्यें गेल्या काहीं वर्षात विलक्षण भर पडली असून रावापासून रंकापर्यंत आणि परिणतप्रज्ञ विद्वानापासून अगदीं अडाण्यापर्यंत सर्वच या सुखसोयींचा भरपूर उपभोग घेत आहेत व आपलीं आयुष्यें रसपूर्ण करीत आहेत. असें जर आहे तर कोणत्या गोष्टींच्या योगानें या सान्या सुखसोयी आपणास सहज प्राप्त होत आहेत हें पाहणें प्रत्येकाचें कर्तव्यच नव्हे काय? पाश्चात्य राष्ट्रें फार पुढें गेलीं असें जेव्हा आपण म्हणतों तेव्हा शास्त्रीय ज्ञानात त्यांनीं विलक्षण प्रगति केली व आपण हिंदुस्थानातील लोक शास्त्रीय ज्ञानाकडे पाठ फिरवून स्वस्थ बसलों असाच त्याचा अर्थ असतो. हें महत्त्वाचें सत्य प्रत्येकाला पटवून देणें व शास्त्रीय संशोधनाचें व त्यानें मानवी जीवनात घडवून आणलेल्या मोठ्या क्रातीचें स्वरूप समजावून सांगणें हें जाणत्या माणसाचें महत्त्वाचें कर्तव्य होय. पाश्चात्य लोक यदृच्छेनें पुढें गेले नसून अजस्र उद्योग व शास्त्रीय बुद्धि या दोन गुणांच्या जोरावरच ते पुढें गेले आहेत व नेमक्या याच गुणांचा अभाव असल्यामुळें आपण मात्र दुबळे व हीन राहिलों आहोंत हें जितक्या स्वकर आपल्यापैकीं प्रत्येकाला उमजेल तितकें बरें. ज्यांचीं शस्त्रें चागलीं म्हणजे अधिक घातक व मारक असतात तेच स्पर्धेमध्यें वरचढ ठरतात हें इतिहासावरून स्पष्ट दिसत आहे. पाश्चात्य राष्ट्रांतील लोक अधिक शूर होते व आपण भित्रे होतों असा अर्थ नसून त्यांचीं शस्त्रें आपल्या शस्त्रांपेक्षा अनंत पटींनीं अधिक प्रभावी होतीं आणि म्हणूनच आपला पराभव झाला व आपल्याला पारतंत्र्यात पडावें लागलें हा सिद्धात आपल्यापैकीं प्रत्येकाला उमजल्याखेरीज आपली भौतिक प्रगति होणें शक्य नाहीं.

पाश्चात्य लोकांनी या गोष्टी शास्त्रीय संशोधनाच्या साहाय्यानें केल्या हें उघड आहे. पण त्या शास्त्रज्ञानाच्या बळावर त्यांनी अत्यंत घातक व संहारक शस्त्रें शोधून काढली त्याच शास्त्रीय ज्ञानाच्या साहाय्यानें त्यांनी आपलें शरीर व एकदर मानवी जीवित पूर्वीच्या मानानें कितीतरी अधिक सुखाचें केलें आहे हें कोणीहि विसरू नये. शास्त्रीय ज्ञानाच्या योगानें मानवी जीवित कसें सुरसमय झालें आहे हें शोधावयास फारशी खटपट करावयास नको. आपल्या दैनंदिन जीवनातच आपल्याला याची वाटेल तेवढी उदाहरणें सापडतील. अनेक रोगावर संशोधकांनी व शास्त्रज्ञांनी आता मात केली आहे, वस्त्रप्रावरणाची सुबत्ता केली आहे, त्वरित प्रवासाची साधनें शोधून काढलीं आहेत आणि यायोगें सर्व जगातील लोकांना परस्पराच्या अगदी निकट सांनिध्यात आणून सोडलें आहे.

पण ज्ञानाचीं हीं साधनें उपलब्ध झालीं तीं सारीं पाश्चात्य देशात हें विसरता यावयाचें नाहीं. त्या ज्ञानाचीं फळें जरी आपल्याला भौतिक सुख सोयींच्या रूपानें आज भरपूर चाखावयास मिळत असलीं तरी तेवढ्यानें आपलें समाधान होणें चांगलें नाहीं. शास्त्रीय ज्ञानाचीं हीं साधनें आपल्या देशातच निर्माण व्हावयास पाहिजेत. पाश्चात्यांनीं लावलेले शोध समजावून घेणें हीच एक समाधानाची गोष्ट सध्या आपण समजतों हें खोटें समाधान शक्य तेवढ्या लवकर टाकून देऊन आपलें संशोधन स्वतंत्र रीतीनें आपणच या देशात करावें असा आग्रह जेव्हा इकडील शास्त्रीय ज्ञान असलेले लोक धरू लागतील तेव्हाच खऱ्या अर्थानें आपली प्रगति झाली असें होईल. तोंपर्यंत आपण परपुष्ट, परोपजीवी व परभृतच राहू.

यासाठीं, प्रथम ह्या काळात एकदर समाजातच भौतिक शास्त्राच्या अभ्यासाची आवड उत्पन्न करणें व यायोगें त्याच्या कल्पकतेला व स्वतंत्र बुद्धीच्या विकासाला अवसर प्राप्त करून देणें हे आपल्यातील बुद्धिमंताचें पहिलें कर्तव्य होय !

असें झालें तर जीं कामें पाश्चात्य लोक करितात तींच आम्हालाहि करिता येणें शक्य आहे असें आपल्याला जगाला दाखविता येईल व आपलें मोठेपण पटवून देता येईल. पाश्चात्य कवींपेक्षा श्रेष्ठ कवि आपणामध्ये निर्माण होण्यापेक्षा पाश्चात्य शास्त्रज्ञांकडून वाहवा मिळवील असा यो

जातिवंत शास्त्रज्ञ आपणांत निर्माण होणें ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. यासाठीं शास्त्राची महति प्रत्येकास पटवून देणें, तीं शास्त्रें कसकशीं निघालीं, त्याचे विस्तार कसे झाले, शुद्ध भौतिक शास्त्रविचार व धर्मकल्पना याचे झगडे आजवर कसे झाले आणि धर्मकल्पनाची पीछेहाट न होता त्याचीं स्वरूपें अधिकाधिक शुद्ध कशीं होत गेलीं आहेत याचें भरपूर ज्ञान सर्वांस होणें अगत्याचें आहे. शास्त्रीय ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांत प्रत्यहीं जें नवीन घडून येत आहे त्याची यथायोग्य माहिती आपल्याकडून सुशिक्षितांनाहि नसते. ही दुःस्थिति तावडतोब बंद व्हावी असें वाटत असेल तर आधिभौतिक शास्त्रांचा सर्वांगीण अभ्यास आपल्याकडे तावडतोब सुरू व्हावयास पाहिजे.

विश्वाच्या इतिहासात शतकांना किंमत नाहीं.

विश्वाची उत्पत्ति केव्हा झाली असेल ती असो. पण शतकांनीं हा कालखंड मोजता यावयाचा नाहीं. येवढें मात्र खरें. दशसहस्राचाच उपयोग यासाठीं करावयास हवा. येवढ्या विस्तृत, किंबहुना अमर्याद काळांत घडलेल्या घटनांचा उल्लेख करतांना खिस्तीं शक अथवा शालिवाहन शक या गोष्टी आपलें काम किंनपत करू शकतील याची जबर शंका वाटते. जेमजेम दोन हजार वर्षांची ही गणना आहे. पण याच्या पूर्वी कित्येक शतकें मानवी कर्तबगारीचा प्रकर्ष जगांतील अनेक देशांत झालेला होता हें इतिहासाचें स्थूल ज्ञान आपल्याला नसलें तरीहि सांगता येतें. खिस्तापूर्वी सहाव्या आणि सातव्या शतकांत नाइल, युफ्रेटिस, गंगा व ओहिओ या नद्यांच्या काठीं बलिष्ठ साम्राज्यें नांदत होतीं. अनेक प्रबळ धर्मविचार इतक्या जुन्या काळींहि रूढमूल झालेले होते. यावरून संस्कृतीचीं प्रगत रूपें खिस्तापूर्वी कित्येक शतकें स्पष्टपणें दिसू लागलीं होतीं असें अनुमान करावयास हरकत नाहीं. यामुळें खिस्ती शक अथवा शालिवाहन शक या परिमाणांत बोलणें कसें अर्धस्पष्टपणाचें आहे हें दिसून येईल. विश्वाचा इतिहासच फार फार जुना असल्यामुळें या कालगणना आपल्याला काळाच्या विस्ताराची योग्य कल्पना आणून देऊ शकत नाहींत इतकाच याचा अर्थ समजावा. अतिप्राचीन काळांत सुद्धां अनेक प्रबळ मानववंश इकडून तिकडे असे भटकत होते. यांच्यापैकीं कांहीं

वैद्य अर्थसंस्कृत असले तरी काही मात्र साम्राज्ये स्थापण्याइतपत व ती प्रबळ करण्याइतपत प्रगत होते यांत कसलीच शंका नाही. स्त्रिस्तपूर्व २००० इतक्या प्राचीन काळापर्यंत साम्राज्यस्थापनेचा हा इतिहास भिडवितां येतो. मानववंशांच्या या भ्रमंतीतहि काही उच्च शास्त्रीय ज्ञानाचे कण त्या त्या पिढ्यांच्या हाती लागले हें कबूल करावयास पाहिजे. अर्थात् 'विज्ञान' आणि 'शास्त्र' याचा खरा अंमल गेल्या तीनचारशे वर्षांतलाच आहे. पण प्राचीन काळी सुद्धां ज्ञान, संस्कृति, राज्यघटना, मनुष्यत्वाचे उन्नत विचार यांचे स्फुलिंग मधून मधून सारखे उठत असत; मानववंशांना स्थैर्य प्राप्त होण्यासारखी परिस्थिति तेव्हा नसल्यामुळे त्या स्फुलिंगाचें तेज पसरूं शकलें नाही इतकेंच. तात्पर्य, खिस्तापूर्वी कित्येक शतकें व सहस्रें अनेक उन्नत कल्पना निर्माण झालेल्या होत्या. म्हणून युगमानाला नवीन नांवें द्यावयाची झाली तर, सतराव्या शतकापासून पुढें 'भौतिक शास्त्राचें युगमान' मानावें; त्याच्या पूर्वीची २००० वर्षे 'धर्मकल्पनांचें युगमान' होय; व त्याच्याहि पूर्वीचे कित्येक सहस्र वर्षांचें युगमान हें 'कलहाचें युगमान' मानावयास हरकत नाही. अतिप्राचीन अशा या कलहयुगातहि काही साम्राज्यें निर्माण झालेली दिसतात. ही साम्राज्यें फार काळ टिकून मात्र राहिली नाहीत. त्यांच्या भरभराटीच्या काळांत शुद्ध ज्ञानाचें म्हणजे आधिभौतिक ज्ञानाचें संपादन थोडें तरी झालें असावें. पण शेकडो वंशांची बसावस हिंस्र प्रवृत्तीच्या जोरावरच सुरू असल्यामुळें जीवित हिंस्र कल्पनांनी युक्त बनतें.

## उच्च विचारांचा प्रादुर्भाव

अनेक शतकें याप्रमाणें हिंस्र प्रवृत्तीचा अवलंब करून झगडण्यात वाया गेल्यावर शांततेची कल्पना निर्माण झाली. एकमेकांच्या माना कापण्यात खरा पुरुषार्थ नसून काही उदात्त विचारांचें स्फुरण झालें पाहिजे हा विचार बलवत्तर झाला. या नवोदित विचाराची छाप ताबडतोब सर्वत्र बसली, लोभ करूं नये,संयम ठेवावा,विश्वाचा कोणी शास्ता आहे ही कल्पना मानावी, केव्हा तरी दुष्कृत्यांचा जाब द्यावा लागेल म्हणून उन्मत्त होऊं नये इत्यादि विचारांचा प्रादुर्भाव झाला. इतिहासपूर्व कालातील अनेक धर्मसंस्थापकांनी समाजधारणेला लागणारे नियम व परमार्थकल्पना समाजाला वेळोवेळी शिकविल्या. समाजाला

स्थैर्य कसें प्राप्त होईल याचें जें ज्ञान त्यांना होतें तें तर त्यांनी समाजाला सांगितलेंच; पण त्याच्या जोडीला त्यांनी परमार्थाच्या कल्पना मांडल्या व अशा रीतीनें सामाजिक नियम व पारमार्थिक कल्पना यांची त्यांनी सांगड घातली. वास्तविक, बुद्धाच्या पूर्वींहि इकडे सामाजिक नियम व पारमार्थिक कल्पना यांचा उदय झालेला होता. या ज्ञानाच्या जोरावर त्रैवर्णिक हिंदूंनी आपला विविध उत्कर्षहि करून घेतला होता व बरेंचसें आधिभौतिक ज्ञानहि संपादिलें होतें. पण इतिहासाचें संपूर्ण ज्ञान आपणांस अजून नसल्यामुळें बुद्धाच्या तत्त्वज्ञानाच्या स्वीकारासाठीं जनमनें इतकीं अनुकूल का झालीं हें नक्की सांगतां येत नाहीं. यज्ञातील पशुहिंसा हेंच एक कारण या मोठ्या सामाजिक परिवर्तनाला पुरेसें आहे असें वाटत नाहीं.

पण, धर्मकल्पनांच्या प्रवर्तकांनीं केवळ पारमार्थिक विचारांचाच पुरस्कार केला असें नसून सामाजिक स्थैर्याला कारण होणाऱ्या नियमांचाहि विचार भरपूर केला होता हें नेहमीं ध्यानात ठेवलें पाहिजे. येशू ख्रिस्तानेंहि हेंच केलें. त्यानें धार्मिक कल्पनांचा प्रसार केला हें खरें असलें तरी समाजाला उन्नत आणि संभावित स्वरूप प्राप्त व्हावें यासाठींहि त्यानें भरपूर खटपट केली. लोकांनीं भारीच हिंसा केली असेल म्हणूनच बुद्धाच्या अहिंसा तत्त्वाचा पगडा जनमतावर इतक्या सहज रीतीनें बसला असेल. ख्रिस्त तर बुद्धाच्याहि पुढें गेला व त्यानें अप्रतिकाराची कल्पना मांडली. हिंसेचा अप्रतिबद्ध जोर समाजात कित्येक शतकें निरंकुशपणें चाललेला असल्याशिवाय अहिंसेचा हा संदेश माणसांनीं पत्करला असेल असें वाटत नाहीं. तात्पर्य, धर्मकल्पनांचें प्राबल्य ज्या युगांत होतें, त्याच युगांत समाजाची स्थिरस्थावर हाहि विचार प्रबळ झालेला होता हें स्पष्टपणें दिसून येतें.

बुद्ध, ख्रिस्त इत्यादि महापुरुषाच्या संदेशामुळें समाजांत विलक्षण चलविचल झाली हें खरें आहे. पण समाजाची स्थिरस्थावर करणें हाच एक हेतु या महापुरुषाच्या मनांत होता असें नसून समाजानें ज्या देवतांचें ह्या वेळपर्यंत मनोभावें पूजन केलें होतें त्या देवतांचें अधिष्ठान लोकांच्या मनांतून कायमचें काढून टाकल्याशिवाय हे समाज संभावित मार्गावर यायचे नाहींत असाहि विचार त्यांच्या मनांत असला पाहिजे. आणि म्हणूनच त्यांनीं परमेश्वराचें परमकारुणिक, शांत, गंभीर व मंगल स्वरूप लोकांना दाखवून दिलें असलें

पाहिजे. देवाचें हें स्वरूप स्थिरता प्राप्त झालेल्या समाजाला तत्काळ पटलें असलें पाहिजे महापुरुषांनी मांडलेले हे नवीन विचार समाजानें विनतक्रार मान्य केले, कारण त्याच्या महानुभावत्वावर त्याचा दृढ विश्वास होता. कांहीं दैवी स्फुरण असल्यामुळेंच या मोठ्या लोकाना इतके महत्त्वाचे विचार मांडता आले असा समाजाचा दृढ समज होणें स्वाभाविक आहे पण यामुळ महापुरुषाच्या बोलण्याला एक प्रकारची निरंकुशता प्राप्त झाली हा मात्र मोठाच तोटा झाला कारण, हे महापुरुष इतराच्यापेक्षां अनेक बाबतींत वेगळ आणि मोठे असले तरी त्याना सर्वज्ञता प्राप्त झाली असल्याचा संभव नसल्यामुळें अज्ञानामुळें अथवा अपुऱ्या ज्ञानामुळें त्यांनी जे कांहीं भोळे सिद्धांत मांडले त्यानाहि निरंकुशत्व प्राप्त झालें आणि ह्याच समाजप्रगतीच्या दृष्टीनें मोठा तोटा झाला हें कबूल केलें पाहिजे. प्रसगविशेषीं या लोकांनीं केवळ अल कारिक भाषेचा आश्रय करून जे कांहीं विचार सांगितले त्यांनाहि सिद्धांताचें स्वरूप प्राप्त झालें समाजानें त्याचा प्रत्येक शब्द खरा मानला आणि अशा प्रकारें भोळेपणाला आणि शब्दप्रामाण्याला सुरुवात झाली याच्या मगर मिठींतून बाहेर पडावयास समाजाला कित्येक शतकें लागलीं व अजूनहि हें कार्य पूर्ण झालें आहे असें निखालस म्हणता यावयाचें नाहीं. महापुरुषाचा प्रत्येक शब्द वाच्यार्थानें घ्यावयाचा हा परिणाम आहे!

## क्षणिकत्वाच्या कल्पनेनें जगाचा तिरस्कार

निरनिराळ्या काळीं समाजाच्या मनावर जे संस्कार होतील, जे आघात होतील त्यातून सर्व तत्त्वज्ञानें निघतात वास्तव, कोणत्याहि सामाजिक तत्त्व ज्ञानाचा अथवा नियमाचा प्रारंभ शोधावयाचा असेल तर लगतच्या भूत काळात मानवी मनात जी चलबिचल झाली असेल तिचें स्वरूप पाहिलें पाहिजे जगताच्या नश्वरतेचा जो विचार प्रादुर्भूत झाला तो धार्मिक युगा तच झाला, आणि मानवी जीवित क्षणभंगुर आहे, सर्व कांहीं आभासमय आहे, माया आहे हा विचार दृढमूल झाला सामाजिक जीवनातील अस्थिरता व माणसाच्या जीवनाची क्षणिकता या दोन गोष्टी तत्त्वज्ञानीं पुनःपुन्हा मांडल्या त्याच्या बोलण्यातील खरा हेतु काय इकडे लोकांनीं लक्षच दिलें नाहीं पण उलट संसार खोटा, जग खोटें, हें सर्व बुडबुड्यासारखें आहे असा समज

समाजात दृढ झाला तात्पर्य, आधिभौतिक कल्पनांचा विचार अत्यंत गौण ठरून माणसें पारमार्थिक विचारात घुटमळू लागलीं

या औदासिन्याचा परिणाम सर्वत्र असा झाला की, गेल्या दीड दोन हजार वर्षांत शुद्ध आधिभौतिक शास्त्रांतील एकहि कल्पना जगांत निघाली नाहीं हिंदुस्थानांत तर हा आत्मविचार इतका 'चेकाळला' कीं, माणसांना प्रपंचाचा विसरच पडला यामुळे सबंध राष्ट्राचें मन गुदमरून गेलें आणि अजूनहि तें गुदमरलेलेंच आहे जगाच्या क्षणभंगुरत्वाच्या जाणिवेनें परमेश्वरानें संपादिलेली सृष्टिशानें माणसें अवहेलू लागलीं, आणि सामर्थ्यानें व सौंदर्यानें गडगंज भरलेल्या वस्तुजाताला क्षुद्र लेखू लागलीं

## जगताची अवहेलना करू नका

वस्तुजाताला 'जड' म्हणून त्याचा तिरस्कार करणें बरें नाहीं कारण, अस्तित्व जिला आहे ती प्रत्येक गोष्ट जडच असते ज वस्तु इंद्रियगोचर नाहीं ती जड नव्हे हें म्हणणें रास्त नाहीं. आपल्या इंद्रियांच्या शक्ति विशेष वाढल्या तर जें आज अत्यंत सूक्ष्म आहे व म्हणून गोचर नाहीं तेंच उद्या इंद्रियगोचर होणार नाहीं कशावरून ? अनेक सूक्ष्मतम गोष्टी आपल्या डोळ्यांना पूर्वी दिसत नव्हत्या त्या आज मायक्रोस्कोपमधून आपण पाहू शकतोंच ना ? पूर्वी डोळ्यांना न दिसणारे तारे आज दुर्बिणींतून पाहता येतातच ना ? इंद्रियांची शक्ति वाढली याचेंच हें प्रत्यंतर आहे तात्पर्य, याच न्यायानें जे रूपरसगंध आज आपल्याला प्रतीत होत नाहींत ते पुढें केव्हा तरी प्रतीत होणें हें अगदीं शक्य आहे अनेक सूक्ष्म गोष्टी जर इंद्रियगोचर ठरण्याचा संभव आहे तर एखादे वेळेस सूक्ष्मात सूक्ष्म असा आत्मासुद्धा त्याला अस्तित्व असलें तर इंद्रियगोचर ठरण्यास काय हरकत असावी ? आणि जें आत्म्याचें तेंच परमात्म्याचें म्हणजे, ईश्वर जर खरोखरच असेल तर तोसुद्धा केव्हा तरी *प्रत्यक्ष दिसण्याचा* संभव खास आहे जिला अस्तित्व आहे ती वस्तु असलीच पाहिजे, आणि ती केव्हा तरी गोचर झालीच पाहिजे तात्पर्य, सूक्ष्म असें कांहींहि नाहीं वस्तु इंद्रियगोचर झालेली *नसली तरी* आहे असें मानणें याचाच अर्थ ती आकलनाचा विषय होऊ शकते हें आकलन आजच्या इंद्रियांनीं होवो अथवा उद्याच्या

नव्या इंद्रियानें होवो. ती वस्तु आहे इतकें मानलें म्हणजे आत्मा व परमात्मा या दोन्ही गोष्टी जडच आहेत असें मानावयास हरकत राहणार नाही. शास्त्रानें सूक्ष्मत्वाच्या मर्यादा संकुचित होत चालल्या आहेत व उत्तरोत्तर जड असें काहीहि उरणार नाही. आत्मा आणि परमात्मा या जोडीलागुदा अस्तित्वाच्या मुद्यावर जड कोटींतच घालता येण्यासारखे आहे. तात्पर्य, 'जड' या शब्दानें मनात जी अवहेलनाबुद्धि निर्माण होते ती होऊं देणें बरोबर नाही; व 'सूक्ष्म' या शब्दानें जी पावित्र्याची कल्पना उत्पन्न होते तीहि होण्याचें काही कारण नाही. 'जड' व 'सूक्ष्म' या कल्पना केवळ इंद्रियशक्तीच्या मोजेनें बसविल्या आहेत. विज्ञानाच्या योगानें जें आज सूक्ष्म आहे तें उद्या जड होऊं शकेल यात कसलीच शंका नाही!

## ब्रह्माच्या विचारांत आधिभौतिक

'ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या' या वाक्याचा विचार करतां असें दिसतें कीं, ज्यात ब्रह्माचें अस्तित्व पत्करलें आहे असे तीन स्वतंत्र पक्ष संभवतात. (१) ब्रह्महि आहे व जगतहि आहे. हीं दोन्ही खरीं आहेत. (२) ब्रह्म हेंच शाश्वत सत्य व जगत् आभासरूप आणि असत्य. (३) ब्रह्म हेंच शाश्वत सत्य व जगत् हें आकारवैशिष्ट्यापुरतें खोटें असून त्याचें मूळचें सूक्ष्म रूप खरें आहे. या तीनहि पक्षात ब्रह्म ही गोष्ट समान आहे. याबाबतींत आणखीहि दोन पक्ष संभवतात. (४) ब्रह्म मानण्याची जरूरी नाही; जगत् मात्र सत्य आहे (५) ब्रह्महि नाही व जगतहि नाही. पहिला पक्ष व पाचवा पक्ष एकमेकांच्या अगदीं विरुद्ध आहेत.

यातील काहींच्या मतें ब्रह्म हेंच शाश्वत सत्य असून जगत् हें स्वप्न म्हणून किंवा विघटनक्षम म्हणून असत्य. स्वप्नातील वस्तूंना ज्याप्रमाणें अस्तित्वच नसतें त्याप्रमाणें जगतालाहि अस्तित्व नाही असें यांचें मत आहे. काहींच्या मतें जगत् असत्य म्हणजे विघटनक्षम आहे. म्हणजे विश्वात कणमात्री राहील पण त्याचे आजचे आकार बदलतील इतकेंच. या मताप्रमाणें विश्व उत्पन्न करावयास लागणारी जी मूळची सामुग्री तिचें मूळरूप सत्य आहे. चवथें मत ब्रह्म मानीत नाही पण जगत् मात्र मानतें, व तें विघटनक्षम आहे असेंहि मानतें. सध्याच्या भौतिकशास्त्रांत हें मत रूढ आहे.

### भौतिकशास्त्राचे मत

जगत् कसें निर्माण झालें हें आपणास माहीत नाहीं, हें वस्तुजात विकसतें, रूपांतर पावतें व त्याचें विघटनहि होण्याचा संभव आहे या जगाचें वयोमान फारच मोठें असून त्याचें विकसन व रूपांतर या गोष्टी इतक्या सूक्ष्म आहेत कीं, या मतानुसार परमेश्वर नावाची कोणी सर्वसाक्षी व सर्वव्यापी व्यक्ति माना वयाचें कारण नाहीं ज्या जगाला अब्जावधि वर्षे झालीं त्याचें आदिकारण शोधण्यात काहीं मतलब नाहीं नग हें आपोआपच निर्माण झालें, त्याचा आपोआपच विकास होतो, तें आपोआपच रूपांतर पावतें व त्याची आपो आपच विघटना होते यासाठीं परमेश्वररूपी एखादा स्वतंत्र 'कर्ता' मानण्याचें कारण नाहीं इश्वर मूळचाच आहे असें मानण्याऐवजीं हें जगच मूळचें आहे असें मानावें म्हणजे झालें

### जगत् असत्य मानणारांनीं काय मिळवलें ?

ब्रह्मवेत्त्यानें जें काहीं साधलें तें इतकेंच कीं, त्याला स्वत ची ओळख पटली, तो मायाजालातून मुक्त झाला व ब्रह्मात विलीन झाला आणि त्याला शाश्वत आनद प्राप्त झाला ही सारी त्याच्या स्वानुभवाची गोष्ट आहे हें इतरांना कळणें शक्य नाहीं शका अशी कीं, आपल्याला ब्रह्माचा साक्षात्कार झाला असें जें ब्रह्मवेत्त्याला वाटतें ती त्याची फसवणूक तर नसेल ना ? सामान्य लोकांपेक्षा त्यांना जो थोडासा निराळा प्रत्यय आला असेल त्यालाच ते अंतिम ज्ञान मानू लागले नसावेत ना ? साक्षात्कार झाला याचा अर्थ विश्वाचा प्रश्न पूर्णपणें सुटला असा धरावयाचा काय ? तात्पर्य, ब्रह्मवेत्त्याची आत्मवचना झाली काय ? जें झालें तें इतकेंच कीं त्यांना आनद प्राप्त झाला पण विश्वाचा प्रश्न त्यांना उलगडला असा मात्र याचा अर्थ होत नाहीं त्यांनीं मलतेंच ओझें आपल्या शिरावर का घ्यावें ? स्वत च्या आनदात मग्न होऊन राहणें इतकेंच त्यांनीं केलें असतें तर त्यात काहीं बिघडलें नसतें पण ते लोकांना उपदेश करतात, शिष्यशाखा वाढवितात आणि यामुळेंच त्यांना काहीं प्रश्न विचारणें भाग पडतें

ब्रह्मसाक्षात्काराच्या बाबतींत निरनिराळ्या ब्रह्मवेत्त्यांचें एकमेकांशीं का

जमत नाही ? देवाचें रूप जर एकच असलें तर तद्विषयक ज्ञानें ही सुद्धा एकरूपच असावयास नकोत काय ? ज्ञानाचे मार्ग निराळे मानले तरी जेथें आत्म्याचें तें परमज्ञान तरी एकरूपच असावयास नको काय ? पण निरनिराळ्या थोर आचार्यांचें ब्रह्मस्वरूपवर्णन मात्र एकमेकांशीं मुळींच जमत नाहीं.

विशेषतः हें सारें साक्षात्काररूपानें पुढें येतें. आणि अशा परस्परविसदृश साक्षात्काराच्या मांडवलावर आज हजारों वर्षें ब्रह्मवेत्त्यांनीं मनुष्यजातीला झुलविलें आहे. या ब्रह्मज्ञानी लोकांनीं शुद्ध तत्त्वजिज्ञासेची भूमिका बाजूस ठेवून साक्षात्कारवादाची भूमिका घेतल्यामुळें तत्त्वसंशोधन बाजूला राहून अहंकार मात्र वाढविले. तात्पर्य, हे साक्षात्कारच मानवजातीला बाधले असें म्हटलें तरी चालेल. मोठमोठ्या ब्रह्मवेत्त्यांच्या बाबतींत हें झालें. मग त्यांच्या शिष्यांच्या बाबतींत काय झालें असेल तें सहज समजेल. एवंच मानव जातीला उपदेश करूं इच्छिणाऱ्या या ब्रह्मवेत्त्यांचें खरें सामर्थ्य काय मतीचें आहे हें पाहणें जरूर झालें आहे.

हें जगत् ज्या वेळीं विनाशाप्रत जावयाचें आहे त्या वेळीं तें बेलाशक जावो. पण शास्त्रज्ञाच्या मतें याला काहीं कोटि वर्षें लास लागतील; तोंपर्यंत मानवांना या पृथ्वीवर ब्रह्मवेत्त्यांनीं सुखानें राहूं द्यावें; त्यांना उगाच जाच करूं नये.

ब्रह्म हें खरें कसें आहे याचा प्रत्यय कोणाहि संशयी माणसाला नाहीं. ब्रह्म अनादि मानून ब्रह्मवेत्ते एका मोठ्या अडचणींतून निसटतात. पण वस्तूंचीं मूलतत्त्वें शोधणें हा तर शास्त्रज्ञांच्या मनाचा मुख्य धर्म आहे. म्हणून ब्रह्म हें स्वयंभूच आहे या विधानानें शास्त्रज्ञाच्या मनाचें समाधान कसें होणार ? पण जगाच्या मुळाशीं कोणीतरी असलाच पाहिजे ही मानवाची इच्छा इतकी प्रबळ आहे कीं, हें जाणूनच शंकराचार्यांनीं कोणत्याहि उपाधीचा संपर्क लागणार नाहीं असें अद्वितत्त्वाचें स्वरूप कल्पिलें. उपाधींचा निरास केल्यानंतर शेवटीं केवळ ज्ञानच उरलें. शंकराचार्यांनीं अद्वितबुद्धि कायम ठेवून अद्वितत्त्वाचें निर्मल रूप कल्पिलें; व याभोगें नास्तिकपर्हि घुश्रविलें व सगुणोपासनेंतील तार्किक संकटेंहि घुश्रविलीं हेंच त्यांचें बुद्धिवैभव होय.

खरें म्हटलें तर ब्रह्मवेत्ता व शास्त्रज्ञ या दोघांचीहि जिज्ञासाहि एकच

आहे. दोघांनाहि Research करावयाचा असतो. यामुळें दोघांचें वैर असा-यास यथार्थ कारणच नाहीं. फरक इतकाच कीं, एकाचें मनोविश्लेषण असतें तर दुसऱ्याचें वस्तुविश्लेषण असतें. शास्त्रज्ञसुद्धां ब्रह्मवेत्त्याप्रमाणेंच भौतिकजगाच्या वस्तुजाताकडे न्याहाळून पहातो व त्यांच्यामागें काय आहे हें शोधण्याची खटपट करतो. तोहि अशा प्रकारें नानात्वांतून एकत्व शोधून काढण्याच्या मार्गे असतो.

या कामात शास्त्रज्ञाला अनंत अडचणी येतात. म्हणून आपल्याला अतिमानस ज्ञान झालें आहे व विश्वाचें कोडें उलगडलें आहे असा दावा करणाऱ्या ब्रह्मवेत्त्यांनीं शास्त्रज्ञाच्या अडचणींचा परिहार का करूं नये ? त्यांच्या साक्षात्कार बुद्धीचा शास्त्रज्ञास आपल्या संशोधनात मोठाच उपयोग करून घेतां येईल व त्याचें काम कितीतरी सोपें होईल. तेव्हां वस्तुजाताचें खरें स्वरूप काय आहे तें ब्रह्मज्ञानी लोकांनीं एकदा स्वच्छ सांगून टाकावें. या असत्य जगांतच ते रहातात ना ? मग शास्त्रसंशोधकाला जगत्स्वरूपाचें आकलन करण्याच्या महत्कार्यांत त्यांनीं मदत का करूं नये ? पण त्यांना हें शक्यच नसावें असा जबर संशय वाटतो. जर त्यांना हें शक्य असेल तर त्यांनीं शास्त्रशोधकाच्या मदतीला अवश्य यावें व जगाचें मूळ कारण शोधून काढण्यास त्याला साहाय्य करावें. पण ते असें करूं इच्छीत नाहींत हें आपल्याला स्पष्ट दिसत असल्यामुळें जग ही माया आहे या त्यांच्या बोलण्याकडे लक्ष देण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं.

## सामाजिक तत्त्वज्ञान हाच धर्म

धर्मानें समाजाची घडी बसविली हें खरें. पण हा पारमार्थिक धर्म नसून समाजाच्या स्थैर्यासाठीं जीं शुद्ध ज्ञानें माणसानें कालक्रमानें हस्तगत केलीं तीं सामाजिक ज्ञानें हाच धर्म होय. हीं ज्ञानें अनुभवांतूनच निघालीं आहेत. ज्ञानार्जनाची ही शास्त्रीय पद्धति आहे हें मान्य केलेंच पाहिजे. कालांतरानें या ज्ञानालाच 'धर्म' ही संज्ञा प्राप्त झाली व त्यानेंच समाजाला व्यवस्था व स्थैर्य या गोष्टी प्राप्त करून दिल्या. या नियमांचें पालन करणें म्हणजेच धर्म आचरणें होय. पण झालें असें कीं, पार्थिव परिस्थिति अवलोकून जे नियम केले त्यांच्या सातत्याची तजवीज मात्र परमार्थाच्या आश्रयानें केली.

अमुक धर्म पाळला तर माणूस स्वर्गाला जातो असें म्हणणें हाच परमार्थाचा अर्थ होत नाहीं, पार्थिवाच्या अवलोकनानें समाजधर्म बनतात व या धर्माच्या पालनानें स्वर्ग मिळावयाचा असतो अर्थात् परमार्थसाधन शुद्ध पार्थिव अनुभवावर आधारलेल्या धर्मानें साधतें. मग जडाची लाज वाटण्याचें कारणच काय! आणि ब्रह्मज्ञानी माणसाचा भौतिकशास्त्र्याशीं वाद तो कोठें उरला! भौतिकशास्त्री मग नास्तिक तरी कसा!

## अवघाचि संसार सुखाचा करीन

संसाराची आपली आसक्ति अनावर आहे हें जर खरें आहे तर मग तो संसार शक्य तेवढा सुखाचा करण्याची धडपड आपण करावी यांत काहींच चुकलें नाहीं. षड्रिपु हे आपले शत्रु नसून खरोखर मित्र आहेत. काम, क्रोध इत्यादींचा अतिरेक झाला नाहीं तर जीवितांतील यशाचीं व सुखाचीं तीं साधनें आहेत. संसारी माणसाचे हे रिपु नाहींत. विरक्त माणसाचे कदाचित् असतील

## मानवी नीतीच्या मर्यादा

अनेक वेळां भलत्याच कार्यांचें भलतेंच कारण मानल्यामुळें मोठ्याच आपत्ति ओढवतात. मनुष्यकृत नीतीचें सृष्टीवर नियमन चालावें अशी जी माणसाची अपेक्षा असते ती या चुकीच्या कार्यकारणभावांतूनच जन्मलेली असते. खरें असें आहे कीं, नीति आपल्या मार्गानें जात असते आणि सृष्टीचे नियम आपल्या मार्गानें जात असतात. पण आपलें चुकलें हें कळूनहि माणसें एकदा कल्पिलेला कार्यकारणभाव सोडून देत नाहींत. असले कार्यकारणभाव म्हणजे केवळ लोकभ्रमच होत.

तात्पर्य असें कीं, धर्मबुद्धि जर अधिक शुद्ध करावयाची असेल तर वेळो वेळीं उपरत झालेल्या धार्मिक कल्पना आपण सोडून दिल्या पाहिजेत. हा कांहीं धर्माचा पराभव मानण्याचें कारण नाहीं. समाजाच्या धारणेसाठीं केवळ धर्मनियम व शुद्ध धर्मबुद्धि या गोष्टी अगदीं वेगळ्या आहेत हें कधींहि विसरूं नये. धर्मनियमांनाच आपण शाश्वत धर्मतत्त्वें मानलीं हा खरोखर मोठा प्रमाद होय. दुसरें असें कीं, धर्मकल्पना या कधींहि शाश्वत,

अपरिवर्तनीय नसतात. धर्म हा परिपूर्ण असू शकत नाही. प्रगतिशील ज्ञानाहून अधिक प्रभावी ज्ञान पुढे येण्याचा संभव असतो, हें ध्यानात ठेविलें पाहिजे. धर्म आणि व्यावहारिक नीति यांच्या या मर्यादा व त्यांचें परस्परांतील नातें स्पष्ट ठेवलें तर अनेक भ्रांति टळतील !

म्हणून आपल्याला सर्व गूढ उलगडलें असा गर्व मिरवून महापुरुषानें स्वतःची वंचना करून घेऊ नये व मानवमात्रांनाहि भलत्या मार्गानें नेऊ नये. ज्ञानाची वाढ सतत होत राहणार हें लक्षात घेऊन त्यांनी आपलें तोंड भविष्यकाळाकडे वळवावें. म्हणजेच खरें तत्त्वशोधन होईल !

## संशोधक हा ब्रह्मज्ञच आहे

'कोऽहम् !' अशी जिज्ञासा ज्याच्या मनात सतत जागृत आहे असा ब्रह्मज्ञ व एखादा शास्त्रीय संशोधक यांच्यात खरें म्हणजे काहीच फरक नाहीं. शास्त्रज्ञ हे ब्रह्मज्ञाप्रमाणेंच जगत्स्वरूपाच्या व जगत्कारणाच्या बाबतींत जिज्ञासु असतो. 'कोऽहम्' असा नुसता प्रश्न विचारूनच ब्रह्मज्ञ थांबत असले तर शास्त्रज्ञ ज्ञानावर विजय मिळवीत असतात. यामुळें दररोज ज्ञानाचीं नवीं नवीं दालनें त्यांना माहीत होतात. आणि विश्वाचें मूळ कारण व त्याचें स्वरूप याचें ज्ञान हें जर ब्रह्म मानिलें तर शास्त्रज्ञहि या ब्रह्माचीच प्राप्ति करून घेऊ इच्छितात असें दिसून येईल. म्हणून नवीन ज्ञान हस्तगत कसें करावें व त्याचा सुखाचा कसा करावा यांच्याच खटपटीला प्रत्येकानें प्रथम लागलें पाहिजे.

## आधुनिक शास्त्रांचें स्वागत करा

यासाठीं युरोपात चाललेलें शास्त्रसंशोधन आत्मसात् करून त्याच्याप्रमाणें ज्ञानाचीं नवीन क्षेत्रें हस्तगत करण्यासाठीं झटणें हें पहिलें कर्तव्य होय. पूर्वी आपल्याकडे उत्कृष्ट शास्त्रज्ञ झाले होते हें खरें असलें तरी आज आपण मागें रेंगाळल्यामुळें आधिभौतिक शास्त्रांच्या उपासनेचा आग्रह धरणें भाग आहे. शुद्ध शास्त्रीय ज्ञानें पूर्वी आपल्या देशात उद्भवलीं असलीं तरी मध्यंतरीं कित्येक शतकें भोळसरपणाचेंच प्राबल्य होतें हें नाकबूल करण्यात कांहीं अर्थ नाहीं. पण आतां तो भोळसरपणा टाकून देऊन पुन्हा शास्त्रीय ज्ञाना-

कदेच वळलें पाहिजे. या नवीन शास्त्रीय ज्ञानाच्या लोंढ्यांत धर्म वाहून जाईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. एक धर्म जाऊन दुसरा धर्म येईल इतकेंच. हा नवीन धर्म चांगला तपासून घ्यावा म्हणजे झालें. या नवीन धर्माला समाजाला आपल्या पृष्ठावर तोलून धरण्याचें सामर्थ्य आहे म्हणजे झालें.

## शास्त्र अपराधी नाहीं.

नवीन शास्त्रीय शोधाच्या योगें घात झाला असें आपण नेहमीं म्हणतों. पण हा शास्त्राचा अपराध नाहीं. संहारक शस्त्रें शोधून काढणें ही गोष्ट शास्त्रीय शोधामुळें शक्य झाली असली तरी त्याच शास्त्रीय शोधांनीं मानवावर अगणित उपकारहि केले नाहींत काय ? अनेक भयंकर रोगांचें बीज शास्त्रीय शोधांनीच नाहींसें केलें नाहीं काय? मग शास्त्राला दोष देण्यात काय मतलब आहे. शास्त्रीय शोध बिचारे खरोखरच उदासीन असतात. शोधकानें आपल्या ज्ञानाचा वाईट उपयोग केला तर त्यात तें ज्ञान अपराधी कसें ठरतें ?

शास्त्रानें वेळोवेळीं समाजाची घडी विसकटली हें खरें असलें तरी त्यायोगें मानवजातीचें नुकसान झालें हें म्हणणें बरोबर नाहीं. समाजाची घडी अति-प्राचीन काळापासून अनंत वेळा विसकटलेली आहे. धनोत्पादनाचे मार्ग बदलतांना त्या त्या काळीं समाजाची घडी बदलणें अपरिहार्य असतें असें अनेक देशांतील निरनिराळ्या कालखंडाच्या इतिहासावरून दिसून येईल. पण यांत तक्रार करण्याचें काहीं कारण नाहीं. हा सृष्टीचा क्रमच आहे. तात्पर्य, यंत्रानें अनेक सामाजिक स्थित्यंतरें झालीं असलीं तरी यंत्रानें सर्व लोकांच्या फायद्याची बनून देण्याची समाजानें व्यवस्था केली तर मनुष्य जास्त सुखीच होईल यात कसलीच शंका नाहीं. यंत्र हा शाप आहे असें न मानतां त्याच्यापासून मानवसमाज अधिक सुखी कसा होईल हें पाहणें हेंच आपलें खरें कर्तव्य होय !

## कालचक्राकडे लक्ष द्यावें

या ठिकाणीं प्रा. माटे यांनीं प्रमुख प्रश्नेयें संपली. यानंतर त्यांनीं हिंदुस्थानांत अतिप्राचीन काळापासून ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांत मोठ्या

लोकांनी कोणती कामगिरी करून ठेवली आहे याचें विस्तृत विवेचन केलें आहे. नंतर शास्त्राचे सर्व कायदे सांगून त्यांनी संशोधनशाळांच्या कार्याचें महत्त्व वर्णिलें आहे. यानंतर भावी काळात शास्त्रीय शोधाची अपरिमित वाढ होणार हें निश्चित असल्यामुळें जगात आपल्याला कांहीं मानाचें स्थान हवें असल्यास कालचक्राकडे सतत लक्ष देऊन आपणास वागावयास पाहिजे असा त्यांनी आग्रह केला आहे. नवीन शोध आत्मसात् करून संशोधन आपल्या देशातच केलें पाहिजे असा त्यांचा सिद्धांत आहे.

## शास्त्रज्ञांचें औदासीन्य

पण, शास्त्रज्ञानें ज्ञानाचा कितीहि प्रसार दाखविला तरी दिक्काल, अति सूक्ष्म व अतिस्थूल वस्तुजात यांच्या स्वरूपाचा विचार करतां करतां मानव हा एकंदर विश्वाच्या पसाऱ्यात किती क्षुद्र आहे हें पटल्यावर वेदांत्या मनाला जी मरगळ यावयाची तीच मरगळ शास्त्रज्ञांच्याहि मनाला येणें अपरिहार्य आहे. प्रा. माटे यांना ही गोष्ट कबूल करणें भाग झालें आहे. ते म्हणतात, "आधिभौतिक शास्त्री झाला काय किंवा बुद्धिदृष्ट्या जगाचा विचार करणारा वेदांती झाला काय, दोघेहि दोरीशीं एकाच मुक्कामाला येतात." वेदांती निदान सर्वसाक्षी परमेश्वर जगाचें कारण आहे असें मानून समाधान पावतो. पण 'इकडे हा प्रकार मात्र कधींची जी असद्वस्थिति पूर्वीपासून तिच्यातच राहणार व जर कर्ता मानला तर त्याचा तरी कर्ता कोण या अनवस्थेत सापडून अनिश्चयाच्या भावनेनें व्यग्र होऊन गप्प बसणार म्हणजे दोघांचा हिशेब एकच झाला!"

## फलश्रुति

प्रा. माटे यांनी प्रस्तुत ग्रंथात महज्ञान व आधुनिक शास्त्रीय संशोधन यांच्या स्वरूपाविषयीं व कार्याविषयीं जें उत्कृष्ट शास्त्रीय पद्धतीचें विवेचन अत्यंत सुबोध भाषेत आकर्षक रीतीनें केलें आहे त्याचा केवळ सामान्य परिचय करून देणें इतकाच माझा या लेखाचा उद्देश आहे. प्रा. माटे यांनी मांडलेल्या सिद्धांतांचें खंडन करणें अथवा त्याचें समर्थन करणें या गोष्टी प्रस्तुत लेखाच्या कक्षेबाहेर आहेत. माझ्या माहितीप्रमाणें मराठीत

तरी वहंज्ञान व आधुनिक शास्त्रीय ज्ञान यांच्या कार्यक्षेत्राची व उपयुक्ततेची इतकी रसाळ चर्चा अन्यत्र कोठेहि नाही. वकिली बाणा न मिरवितां प्रा. माटे यांनी ब्रह्मज्ञानी माणसाची भूमिकाहि अगदी योग्य रीतीनें मांडलेली आहे व शास्त्राची तरफदारी करतां करता वेदान्त्याला जाणूनबुजून अन्याय करण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला नाहीं. त्यांच्या सिद्धान्तासंबंधीं मतभेद होणें स्वाभाविक असलें तरी त्यांचें सर्वच विवेचन फार उच्च, तात्त्विक आणि शास्त्रीय भूमिकेवरून झालेलें असल्यामुळें ही प्रस्तावना या बाबतीत आदर्श-भूत झाली आहे हें मान्य केलेंच पाहिजे. आपल्या विवेचनासंबंधीं स्वतः प्रा. माटे यांनीच कांहीं शंका उपस्थित केल्या आहेत व त्यांना उत्तरेंहि दिलीं आहेत. १६४ ते १७० हीं पृष्ठें यासाठीं मुळांतून जिज्ञासूंनी अवश्य वाचावीं.

शेवटीं, अर्वाचीन जगांत शास्त्राची भूमिका कोणती, शास्त्रांची वाढ कोठपर्यंत होत राहणार आहे, शास्त्रावर पूर्णपणें अवलंबून असलेल्या समाजाचें पुढें काय होणार आहे इत्यादि ज्या नाना प्रकारच्या शंका आपल्या मनात नेहमीं थैमान घालतात त्यांची शास्त्रीय पद्धतीनें केलेली चर्चा वाचावयाची असल्यास जिज्ञासूंनी Whither Mankind या प्रसिद्ध पुस्तकांतील बर्ट्रंड रसेल या थोर शास्त्रज्ञाचा Science हा निबंध व त्याच ग्रंथाला C. A. Beard यांनीं लिहिलेली प्रस्तावना अवश्य वाचावी. स्थलाभावामुळें यांचा केवळ उल्लेख करण्यापलीकडे कांहींहि करता येणें शक्य नाहीं.

---